|| श्री हरि: ||

# प्रार्थना आणि निवेदन

नवजलधरवर्णं चम्पकोद्भासिकर्णं
विकसितनलिनास्यं विस्फुरन्मन्दहास्यम् ।
कनक-रुचि-दुकूलं चारुबर्हावचूलं
कमपि निखिलसारं नौमि गोपी-कुमारम् ॥१॥

मुखजित-शरदिन्दुः केलि-लावण्य-सिन्धुः ।
कर-विनिहत-कंदुः वल्लवी-प्राण-बन्धुः ।
वपुरुपसृतरेणुः कक्ष-निक्षिप्त-वेणु-
र्वचन-वशग-धेनुः पातु मां नन्द-सूनुः ॥२॥

त्वां च वृन्दावनाधीश त्वां च वृन्दावनेश्वरि ।
काकुभिर्वन्दमानोऽयं मन्दः प्रार्थयते जनः ॥३॥

योग्यता मे न काचिद् वां कृपालाभाय यद्यपि ।
महाकृपालुमौलित्वात् तथापि कुरुतं कृपाम् ॥४॥

अयोग्ये सापराधेऽपि दृश्यन्ते कृपयाकुलाः ।
महाकृपालवो हन्त लोके लोकेश-वन्दितौ ॥५॥

भक्तेर्वां करुणाहेतोर्लेशाभासोऽपि नास्ति मे ।
महालीलेश्वरतया तथाप्यत्र प्रसीदतम् ॥६॥

यदक्षम्यं नु युवयोः सकृद् भक्तिलवादपि ।
तदागः क्वापि नास्त्येव कृत्वाशां प्रार्थये ततः ॥७॥

एष पापी रुदन्नुच्चैरादाय रदनैस्तृणम् ।

हा नाथौ नाथति प्राणी सीदत्यत्र प्रसीदतम् ॥८॥
हाहारवमसौ कुर्वन् दुर्भगो भिक्षते जनः ।
एतां मे शृणुत काकुं काकुं श्रृणुतमीश्वरौ ॥९॥
वाचेह दीनया याचे साक्रन्दमतिमन्दधीः ।
किरत करुणस्वान्तौ करुणोर्मिच्छटामपि ॥१०॥
मधुराः सान्ति यावन्तो भावाः सर्वत्र चेतसः ।
तेभ्योऽपि प्रेम मधुरं प्रसादीकुरुतं निजम् ॥११॥
नाथितं परमेवेदमनाथजनवत्सलौ ।
स्वं साक्षाद् दास्यमेवास्मिन् प्रसादीकुरुतं जने ॥१२॥
अञ्जलिं मूर्ध्नि विन्यस्य दीनोऽयं भिक्षते जनः ।
अस्य सिद्धिरभीष्टस्य सकृदप्युपपाद्यताम् ॥१३॥
(स्तवपुष्पाञ्जलि)

इसवी सन १९१६ मध्ये बंगाली लिपीमध्ये छापलेले, देवर्षी नारदांच्या सूत्रांचे एक पुस्तक मी सर्वप्रथम पाहिले होते. त्यावेळी मी एकांतवासात होतो. भगवंतांच्या कृपेने परमार्थसाधनाकडे माझे मन थोडे लागत होते, त्यास देवर्षींच्या सूत्रांनी खूप सहायता मिळाली. तेथेच सूत्रांवर विचार करता करता त्यांचा भावार्थ लिहिण्याची इच्छा झाली आणि काही काळानंतर भावार्थ लिहिलासुद्धा गेला. त्यावेळी तो छापण्याची इच्छाही नव्हती, तसेच सोयही नव्हती. इसवी सन १९२० च्या सुमारास मी मुंबईत होतो; तेथे एके दिवशी श्रीवेंकटेश्वर प्रेसचे मालक स्वत: सेठ खेमराजजी यांचे बरोबर बोलता बोलतानाच सूत्रांची चर्चा चालू झाली. मोठ्या आग्रहाने त्यांनी माझ्याकडून मूळ हस्तलिखित मागून घेतले आणि ते छापण्यासाठी प्रेसमध्ये दिले; परंतु असावधानतेमुळे ते हस्तलिखित तेथे पडून राहिले. माझा काही विशेष आग्रह नव्हता; त्यामुळे मी काही तगादा केला नाही. पुढे शेटजींचा स्वर्गवास झाला. त्यानंतर काही वर्षांचे नंतर मी ती हस्तलिखित प्रत तेथून मागून परत आणली. ती छापण्याकडे मन लागत नव्हते. भक्तिशास्त्रावर टीका लिहिणारा

मी कोण, असा संकोच मला वाटत होता. परंतु जसजशी प्रसिद्धी वाढू लागली, तसतसा तो सात्त्विक संकोच दूर होऊ लागला, आणि शेवटी छापण्याची गोष्ट निश्चित झाली. मी पुन: एकदा ते हस्तलिखित वाचले; त्यात काही ठिकाणी बदल आणि वाढ करण्याची आवश्यकता वाटली; यामुळे छापण्याचे काम थांबले. यावेळी भगवंताच्या प्रेरणेने पुन: त्या हस्तलिखिताची पाहणी आणि काही सुधारणा आणि गाळागाळ केल्यानंतर, कल्याण मासिकात सर्व सूत्रे क्रमाने छापली गेली. त्यांचेच थोडेसे बदललेले आणि वाढविलेले स्वरूप या पुस्तकात आहे.

इसवी सन १९१६ मध्ये ज्यावेळी या सूत्रांचा भावार्थ लिहिला गेला होता, त्यावेळी त्यांच्यावर एक दोन टीका हिंदीमध्ये झालेल्या असतील, आता तर अनेक टीका झाल्या आहेत. इतके सारे झाले असतानासुद्धा ही टीका छापण्याची दोनच कारणे असू शकतात. पहिले कारण म्हणजे सुप्त अशी मोठेपणा वाढण्याची इच्छा, आणि दुसरे कारण म्हणजे भक्तिशास्त्राच्या विचाराने येणारी स्वत:च्या कल्याणाची इच्छा. वस्तुत: भक्तीची जितकी चर्चा होईल तितकी ती मंगलकारक आहे. कारण भगवत्प्रेमाच्या प्राप्तीसाठी भक्ती सर्वात प्रधान साधन आहे. आणि साध्य रूपात भक्तीच भगवत्प्रेम आहे, असा विचार करून भक्त तसेच विद्वान वाचकवर्ग हे माझ्या या कार्याला अत्यंत निंद्य समजणार नाहीत आणि माझ्या धृष्टतेला क्षमा करतील, तसेच माझ्या चुकांसाठी मला क्षमा करतील, अशी मला आशा आहे. प्रेमामध्ये भाषेच्या अपेक्षेने भावाचेच विशेष मूल्य होत असते. जरी भक्तिशास्त्रावर व्याख्या-रूपाने काहीही लेखन करण्याचा माझा अधिकार नाही, तरी या कार्यात माझी जी प्रवृत्ती झाली ती म्हणजे भगवंताची प्रेरणा आणि भगवंताची कृपा आहे असे समजून, जाणते महानुभाव लोक माझ्यावर प्रसन्न होतील, अशी मला आशा आहे. कारण असे की भगवंताच्या कृपेशिवाय माणसाची उत्तम कार्यात प्रवृत्ती होतच नाही. भक्तिशास्त्राचा विचार-विमर्श हे उत्तमापेक्षा उत्तम असे कार्य आहेच. कारण असे की यात भगवंताचे दिव्य गुण, भगवंताचे अलौकिक प्रेम, भगवंताची भक्ती, भगवंताच्या प्रेमाच्या

प्राप्तीची साधने आणि शेवटी भगवंताच्या पवित्र नामांची चर्चा हे तर आलेले आहेत. यामुळे नक्कीच माझ्या नीरस आणि भक्तिरहित हृदयात थोडासा रसाचा तसेच भक्तीचा संचार झाला असणार. भगवंताच्या पवित्र नामाचे आणि गुणांचे स्मरण आणि कीर्तन याद्वारे मनुष्याचे गढूळ हृदय क्रमश: पवित्र होऊन लहान मुलाच्या मनाप्रमाणे सरळ होऊन जाते, या एका महात्म्या भक्ताच्या वचनावर आपण दृढ विश्वास ठेवायला हवा. भगवंताचे गुण आणि भगवंताच्या नामांचे कीर्तन हे हृदयातील सर्व काळ्याकुट्ट गोष्टींना संपूर्णपणे धुऊन टाकतात, आणि प्रेमावेशाच्या कारणामुळे शुद्ध आणि शांतिमय दिव्य भावांची उत्पत्ती होऊन त्या माणसाचा जन्म आणि जीवन यांना सफल करून टाकतात.

महापातकयुक्तोऽपि ध्यायन्निमिषमच्युतम् ।
पुनस्तपस्वी भवति पङ्क्ति-पावन-पावन: ॥

"जर एक निमिषभर महापातकी व्यक्तीनेसुद्धा श्रीभगवंताचे ध्यान केले तर तो पुन्हा पवित्र होऊन, पवित्र करणाऱ्यांना सुद्धा पवित्र करू शकतो."

आणखी असे की या ग्रंथात व्याख्यारूपाने जे काही लिहिले गेले आहे, ते सर्व सकल संतांचा उत्तम प्रसाद आहे. यात वस्तुत: माझे काहीही नाही. म्हणून वाचकांनी माझ्याकडे लक्ष न देता, सूत्रकार, सूत्र, व सूत्राचे व्याख्यारूप लेखन यांतील शास्त्रांचे आणि संतांचे भाव यांकडे लक्ष द्यावयास हवे. षड्दर्शनांप्रमाणे भक्तिसूत्र हे सुद्धा एक दर्शन मानले गेले आहे. याला भक्तगण सातवे दर्शन म्हणतात. ज्ञान आणि विज्ञान यांनी संपन्न असे पुरुषच खरे म्हणजे भगवंताच्या प्रेमाचे प्रकृत अधिकारी होतात. चौऱ्यांशी सूत्रांमध्ये देवर्षींने भक्तितत्त्वाची व्याख्या, भक्तीतील अडथळे, भक्तीची साधने, भक्तीचा महिमा आणि भक्तांचे महत्त्व या गोष्टी चांगल्या प्रकारे प्रकट करून दिल्या आहेत. यामध्ये भगवंताच्या सगुण साकार दिव्य स्वरूपाच्या भक्तीचे वर्णन निश्चितपणे आहे; परंतु असे समजण्याची गरज नाही की या भक्तीचा ज्ञानाशी काही विरोध आहे. उलट स्वत: देवर्षींनि व्रज-गोपिकांचे उदाहरण देऊन, त्यांच्या मनात श्रीभगवंताच्या माहात्म्याचे ज्ञान होते, हे सिद्ध

केले आहे. जर श्रीभगवंताचे ज्ञानच नसेल तर प्रेम कुणावर असणार ? आणि हे तत्त्व सत्य आहे की अभिन्न, अखंड, अनन्य, अविकारी असे प्रेम असतानाच हृदयातील खऱ्या तत्त्वाचा - प्रियतमाच्या मनातील गोष्टीचा- पत्ता लागतो. म्हणूनच ज्ञान आणि भक्ती यांमध्ये काही विरोध नाही, असेच समजावयास हवे. याचप्रमाणे भक्तीशी कर्माचासुद्धा विरोध नाही, भगवंतासाठी निष्काम कर्म करण्याची तर आज्ञासुद्धा दिली गेलेली आहे. तसेच, कर्मांचा सर्वथा त्याग करणारा भक्त हासुद्धा अहर्निशी भगवंताच्या प्रेमामध्ये दंग होऊन, भगवंताचे चिंतन करणे हे कर्म तर सोडू शकत नाही. म्हणून देवर्षीने सांगितलेल्या भक्तीमध्ये ज्ञान अणि कर्म हे दोन्हीही आहेत. भक्तीला अनुकूल असणारे ते दोन्हीही अवश्य असावयास हवेत. शुष्क कोरडे ज्ञान आणि कर्म यांना या भक्तीमध्ये स्थान नाही. हिच्यामध्ये वर-खाली, आत-बाहेर सर्वत्र रसच रस आहे. भगवंत हा रसमय आहेच, आणि त्या रसात परम आनंद आहे. श्रुतीसुद्धा हेच सांगते-

"रसौ वै सः । रसं ह्येवायं लब्ध्वानंदी भवति।"

भक्तीमुळेच त्या रसमय भगवंताचे प्रत्यक्ष दर्शन होते. भक्तीमुळेच ऋषी, मुनी आणि देव यांना दुर्लभ असणारा तो परमानंद प्राप्त होतो. म्हणूनच सर्वांनी भक्तीचाच आश्रय घ्यावयास हवा. श्रीमद् भागवतामध्ये सांगितले गेले आहे-

"भगवान् सूर्य हे दररोज उदय-अस्त पावत असतात; त्यांमध्ये माणसांचे आयुष्य फुकटच नष्ट होऊन जात असते. खरे म्हणजे जितक्या काळात हरीची चर्चा केली जाते, तितकाच काळ सफल होत असतो. संसारात जिवंत राहाणे आणि खाणे-पिणे या काही महत्त्वाच्या गोष्टी नाहीत. जशी माणसे जिवंत राहतात, तसेच अचेतन वृक्ष जिवंत राहात नाहीत काय ? माणसाप्रमाणेच लोहाराचा भाता सुद्धा श्वास घेत नाही काय ? गावागावातील पशू, कुत्रे, डुक्कर इत्यादी प्राणी काय भोजन करीत नाहीत आणि मल-मूत्राचा त्याग करीत नाहीत काय ? ज्या प्रकारे कुत्री दारोदार भटकत मार खातात, ज्या प्रकारे गावातील डुकरे घाणेरड्या वस्तू ग्रहण करतात, ज्या प्रमाणे उंट काटे खातो, आणि गाढव जसे केवळ ओझे

वाहाते, बरोबर त्याचप्रमाणे भगवंतांच्या भक्तीने रहित असलेला माणूस कुत्र्याप्रमाणे सगळीकडून तिरस्कारास पात्र होतो, डुकराप्रमाणे असार अशा विषयांचे ग्रहण करतो, उंटाप्रमाणे दु:खाने भरलेले विषयरूपी काटे खाऊन खाऊन नेहमी दु:खी राहतो, आणि गाढवाप्रमाणे संसाराचा भार वाहातो, आणि रडत राहतो. ज्या कानांमध्ये भगवान् श्रीकृष्णाची लीला आत जाऊन शिरत नाही, ते माणसाचे कान हे सापाच्या बिळांप्रमाणे आहेत, आणि त्यांमध्ये विषयांची वार्ता हेच साप शिरतात. जी जीभ भगवंताचे नाम व गुण गात नाही, ती जीभ बेडकाच्या जिभेप्रमाणे आहे. जे मस्तक श्रीहरीच्या पुढे झुकत नाही, ते मस्तक सुंदर केस व दागिने यांनी शोभिवंत असले तरीसुद्धा ते भारस्वरूप असते. जे हात सोन्याच्या अलंकारांनी विभूषित असूनसुद्धा कधीही श्रीहरीची सेवा करीत नाहीत, ते हात मुडद्याच्या हातांप्रमाणे आहेत. जे डोळे भगवंताच्या पवित्र मूर्तीचे दर्शन घेत नाहीत,ते माणसाचे डोळे हे मोराच्या पिसावर दिसणाऱ्या डोळ्यांप्रमाणे फुकट आहेत. जे पाय भगवंताच्या पवित्रस्थानी -मंदिरात तसेच तीर्थक्षेत्रात -जात नाहीत, ते पाय वृक्षाप्रमाणे व्यर्थ आहेत. जो माणूस श्रीभगवंताच्या पायाची धूळ मस्तकावर धारण करीत नाही, किंवा भगवंताच्या चरणांवर वाहिलेल्या तुळशीचा वास हुंगत नाहीत, तो मनुष्य जिवंत असूनही मेल्यासारखाच आहे. आणि ते हृदय तर वज्राचेच असते की जे श्रीहरीची नावे ऐकल्यावर प्रेमाने भरून ओसंडून जात नाही, गद्‌गद होत नाही, ज्यामुळे रोमांच उभे राहात नाहीत आणि डोळे आनंदाच्या आसवांनी भरून जात नाहीत."

भगवंताच्या सर्व प्रेमी भक्तांच्या चरणकमळी मी अत्यंत विनम्र भावाने शेवटी हीच प्रार्थना करितो की आपण सर्वजण मिळून कृपापूर्वक मला असा आशीर्वाद द्या की ज्यामुळे माझा मन-रूपी भ्रमर सदैव श्रीभगवंताच्या चरण - कमळावरच भ्रमण करणारा बनून जाईल. कारण जोपर्यंत एखादा मनुष्य भगवंताच्या चरणांचा आश्रय घेत नाहीत तोपर्यंत त्या मनुष्याचे ठायी भय, शोक, स्पृहा आणि पराभव, अपमान किंवा लोभ हे ठिय्या देऊन राहात असतात.

तावद् भयं द्रविण-गेह- सुहृन्निमित्तं
शोक: स्पृहा परिभवो विपुलश्च लोभ: ।
तावन्ममेत्यसदवग्रह आर्तिमूलं
यावन्न तेऽङ्घ्रिप्रभयं प्रवृणीत लोक: ॥

(श्रीमद्भागवत ३/९/६)

भक्तांच्या चरणरजाचा दासानुदास

हनुमानप्रसाद पोद्दार

* - * - *

# देवर्षि नारद

अहो देवर्षिर्धन्योऽयं यत्कीर्तिं शार्ङ्गधन्वनः।
गायन् माद्यन्निदं तन्त्र्या रमयत्यातुरं जगत्॥

(श्रीमद्भागवत १/६/३९)

"अहो ! जे वीणा वाजवतात, हरीचे गुण गातात, आणि मस्त होऊन या दुःखी जगाला आनंदित करीत असतात, ते हे देवर्षी नारदजी धन्य आहेत."

ज्याप्रमाणे स्वतः भगवान् या जगात अवतीर्ण होतात, त्याप्रमाणेच लोकांचे कल्याणासाठी कल्याणकारी पुरुष या जगातच येतात आणि वावरतात. श्रीभगवंताच्या पवित्र लीलांसाठी भूमी तयार करून देणे, तसेच त्याच्या लीलेसाठी लीलांना उपयोगी पडणाऱ्या तशाच उपकरणांचा संग्रह करणे, व लीलांमध्ये सहाय्यक होणे, हे त्यांचे स्वाभाविक कार्य असते. असले महापुरुष मुक्त होऊन गेले तरी सुद्धा, मुक्त न होता, ते जगात जीवांच्या बरोबर त्यांच्या कल्याणासाठी विराजमान असतात. अशा प्रकारे तर यांचे कार्य नेहमीच अबाधितपणे चालू राहाते; परंतु भगवंतांच्या कोणत्या तरी खास अवताराचे वेळी यांचे कार्य विशिष्ट रूपाने वाढत जाते. यांचे मंगलमय जीवन हे जगाच्या महान् मंगलासाठी होत असते. अविद्या, अहंकार, ममत्व, आसक्ती इत्यादींनी संपूर्णपणे रहित असे हे महापुरुष यंत्र-चालक भगवंताच्या हातांमधील यंत्राप्रमाणे कार्य करीत असतात. यांची सगळी कार्ये ही भगवंताचीच कार्ये असतात. अशाच महापुरुषांमध्ये देवर्षी नारदजी एक आहेत. सर्वच युगांमध्ये, सर्वही लोकांत, समस्तही शास्त्रांमध्ये, सगळ्याच समाजांत आणि साऱ्याच कार्यांमध्ये त्या नारदजींचा प्रवेश आहे. हे नारदजी सत्य-युगातसुद्धा होते; त्रेता, द्वापर युगांतसुद्धा, तसेच या घोर कलिकाळातसुद्धा ते आहेत. असे

म्हणतात की अधिकारी भक्तांना त्यांचे शुभ दर्शन होत असते. गो-लोक, वैकुंठ-लोक, ब्रह्म-लोक इत्यादींपासून ते थेट तल, अतल, इत्यादी पाताल लोकांपर्यंत सर्वत्र त्यांचा प्रवेश असतो; आणि योगाच्या सामर्थ्याने मनात येताच ते त्वरित कोठूनही कोठेही पोहोचतात. वेद, स्मृती, पुराण, संहिता, ज्योतिष, संगीत इत्यादी सर्वच शास्त्रांमध्ये ते दृष्टिगोचर होतात. प्रत्यक्ष भगवान् विष्णू, शिव इत्यादींपासून ते थेट घोर राक्षसांपर्यंत त्यांचा सन्मान, विश्वास आणि आदर केला जातो. देवराज इंद्रसुद्धा त्यांच्या वचनांचा आदर करतो आणि देवांचा शत्रू जो हिरण्यकशिपू त्याची पत्नी कयाधूसुद्धा त्यांच्या वचनांवर विश्वास ठेवून, त्यांच्या आश्रमामध्ये स्वत:ला सुरक्षित समजत असे. व्यास, वाल्मीकी, शुकदेव यांच्यासारख्या महापुरुषांना परम तत्त्वाचा उपदेश करताना ते कधी दिसून येतात, तर कधी दोन पक्षांत कलह आणि वाद निर्माण करण्याच्या कामी प्रयास करण्यात गुंतलेले दिसून येतात. खरे सांगायचे झाल्यास, हे नारद स्वत:साठी काहीही करीत नाहीत, तर ज्या कार्यामुळे ज्यांचे मंगल होईल असे त्यांना दिसते, तसेच ज्या कार्यामुळे भगवंताच्या लीलेचे एक सुंदर दृश्य त्यांच्यासमोर त्यांना दिसून येते, ते कार्य ते करू लागतात. विवाद आणि कलह करवून घेणे ही त्यांची गोष्टसुद्धा लोकांच्या हितासाठी तसेच भगवंताच्या लीलेच्या साधनासाठी होत असते. कारण त्यांची प्रत्येक कृती ही भगवंताचीच कृती असते. खरे म्हणजे या नारदांना तर भगवंताचे मनच समजावयास हवे; गंभीर दृष्टीने विचार केला तर भगवंताच्या कृपेने ही गोष्ट स्पष्टपणे दिसून येते. काही लोक म्हणतात की नारद नावाच्या कित्येक भिन्न भिन्न व्यक्ती होत्या. त्यांमध्ये सात जणांना मुख्य मानतात. १. ब्रह्मदेवाचा मानसपुत्र २. पर्वत (नामक) ऋषींचा मामा ३. वसिष्ठाच्या अरुंधती (नामक) पत्नीचा भाऊ अथवा सत्यवती नावाच्या स्त्रीचा पती ४. इकडचे तिकडे करून आपसात लोकांना भांडण्यास प्रवृत्त करणारा ५. कुबेराचा सभासद ६. भगवान् श्रीरामाच्या सभेतील आठ धर्मशास्त्रवेत्त्यांपैकी एक ७. जनमेजयाच्या सर्प-

यज्ञातील एक सदस्य.

नारद एक होता की अनेक होते, या विवादात आम्हाला येथे मुळीच पडावयाचे नाही. तसेच वादविवाद करून या प्रश्नाचा निर्णय करण्याची योग्यताही आमच्यामध्ये नाही. होय, आमच्या दृष्टीने तर आम्हाला एकच नारद दिसून येतो की ज्याने भिन्न भिन्न कल्प आणि युगे यांमध्ये भगवंताचे 'यंत्र' या नात्याने विभिन्न कार्ये केली आहेत, आणि आजही करीत आहे. ज्या कार्याचा संबंध भक्तीशी आहे त्या कार्याशी नारदजींचा जो संबंध आहे, त्या कार्याविषयी आम्हाला येथे काही सांगावयाचे आहे, आणि वास्तविक हेच नारदजींचे प्रधान कार्य आहे. समस्त शास्त्रांचे उत्तम पंडित तसेच समस्त तत्त्वांचे ज्ञाते आणि व्याख्यान करणारे असे ते नारदजी असूनसुद्धा शेवटी नारदजी हे भगवंताच्या भक्तीचा उपदेश करतात. वाल्मीकी, व्यास, शुकदेव, प्रल्हाद, ध्रुव इत्यादी श्रेष्ठ महात्म्यांना त्यांनी भगवद्भक्तीला लावले. इतकेच नव्हे तर स्वत: हातात वीणा घेऊन, सर्व युगांमध्ये आणि सकल समाजामध्ये निर्भय आणि निश्चिंत होऊन, सदा सर्वदा भगवंताच्या पवित्र नामांचे गायन करीत, साऱ्या विश्वातील नर-नारींना पवित्र करीत आणि भगवंताकडे सन्मुख करीत, ते राहातात. या भगवान् नारदांनी आपल्या दोन कल्पातील चरित्राचे स्वत:च वर्णन केलेले आहे. भागवत पुराणामध्ये उक्त प्रसंग फारच सुंदर आहे. आमच्या आणि वाचकांच्या मनोरंजनासाठी त्या प्रसंगातील काही मार्मिक गोष्टी पुढे दिल्या जात आहेत.

दिव्य दृष्टीने संपन्न असणाऱ्या महर्षी व्यासांनी लोकांच्या कल्याणासाठी वेदांचे चार भाग केले. त्यांनी पंचम वेदस्वरूप आणि नाना आख्यानांनी पूर्ण अशा महाभारताची रचना केली, आणि पुराणे निर्माण केली. अशा प्रकारे सर्व प्राण्यांच्या कल्याणासाठी प्रवृत्त होऊनसुद्धा भगवान व्यासांना समाधान झाले नाही; त्यांच्या मनाला पूर्ण शांती लाभली नाही; आपल्यामध्ये काहीतरी कमी आहे, असे त्यांना वाटत राहिले; तेव्हा ते थोडेसे उदास होऊन,

सरस्वती नदीच्या तीरावर बसून विचार करू लागले:- "मी सर्व काही केले. तथापि आपल्यामध्ये काहीतरी अभाव असल्यासारखा अनुभव मला का बरे येत आहे ? भागवत धर्मांचे विस्ताराने निरूपण मी केले नाही काय ? कारण भागवत धर्म हाच परमेश्वर आणि परमहंस अशा भक्तांना प्रिय आहे." अशा प्रकारे ते जेव्हा विचार करीत होते तेव्हा हरीचे गुण गात गात, प्रसन्नमुख असणारे श्रीनारदजी तेथे येऊन पोहोचले. आदर-सत्कार आणि कुशल-समाचार विचारणे आणि सांगणे हे झाल्यानंतर श्रीव्यासांनी आपली स्थिती सांगून, तिच्या निरसनासाठी देवर्षींना उपाय विचारला. तेव्हा श्रीनारदजी सांगू लागले:-

"हे मुनिश्रेष्ठ, आपण आपल्या ग्रंथांत ज्या प्रकारे भिन्न भिन्न धर्मांचे वर्णन केले आहे, त्या प्रकारे भगवंताच्या कीर्तीचे कीर्तन केले नाही. म्हणून आपल्या मनात उदासीनता भरली आहे. ज्या वाणीमध्ये- ज्या काव्यामध्ये- जगाला पवित्र करणाऱ्या अशा भगवान् श्रीवासुदेवाचा महिमा आणि कीर्ती यांचे वर्णन केलेले नाही, ती वाणी किंवा कविता ही मृदू, मधुर आणि चित्रविचित्र शब्दांनी युक्त (काव्य-गुण-संपन्न) असूनसुद्धा, तिला सारासार जाणणारे ज्ञानी लोक 'काकतीर्थ' या नावाने संबोधतात. म्हणजे असे:- विष्ठेवर चोच मारणाऱ्या कावळ्याप्रमाणे असणाऱ्या, मलिन असणाऱ्या व विषयांचे भोग घेणाऱ्या अशा कामी मनुष्यांचे मन ज्याप्रमाणे त्या काव्यात रमते, त्याप्रमाणे मानस सरोवरात विहार करणाऱ्या राजहंसाप्रमाणे असणाऱ्या, परमहंस अशा भागवतांचे मन त्यामध्ये कधीही रमत नाही. परंतु ज्या वाणीमध्ये भगवंताचे नाम आणि भगवंताच्या गुणांची चर्चा भरलेली असते, ती वाणी ऐकण्यास कठोर, व काव्यालंकार इत्यादींनी रहित, तसेच शब्दाशब्दात व्याकरण इत्यादींच्या दृष्टीने अशुद्ध असली, तरी सुद्धा ती वाणी अतिशय रम्य आणि जन-समूहाच्या पापांचा नाश करणारी असते. म्हणून भगवंताचे गुण व नाम यांनी पूर्ण भरलेली ती वाणी साधू आणि महात्मे ऐकतात, ऐकवितात, आणि तिचे कीर्तन करतात. हे मुनिवर, आपण अमोघ-दर्शी आहात;

आपल्यापासून काहीही दडून राहात नाही. या कारणास्तव आता आपण जगाच्या कल्याणाचे साठी श्रीहरीच्या लीलांचे वर्णन करावे. माणसाचे तप, श्रवण, नित्य धर्म आणि तीक्ष्ण बुद्धी इत्यादींचे श्रेष्ठ फळ हे केवळ, एक मात्र, भक्तिपूर्वक श्रीहरीच्या गुणांचे वर्णन करणे हेच आहे, असे विद्‌वानांनी सांगितले आहे. माझा पूर्वजन्मीचा इतिहास ऐकून, तुम्ही त्याचा विचार करावा की श्रीहरीच्या गुणांच्या श्रवणाने मी कोण होतो व काय बनून गेलो.

" हे महामुनी, पूर्व काळी मी एका दासीचा पुत्र होतो. एके वेळी चातुर्मास व्यतीत करण्यासाठी वर्षाकाळात आमच्या गावी पुष्कळसे महात्मे लोक आले. मी त्यावेळी लहान बालक होतो. माझ्या मातेने मला त्या महापुरुषांची सेवा करण्याचे काम लावून दिले. त्या महात्म्यांच्या समोर मी कोणत्याही प्रकारचा पोरकटपणा करीत नसे, तर सर्व खेळ सोडून, मी शांतपणे त्यांच्या पायांजवळ बसून राहात होतो आणि फारच कमी बोलत होतो. या सर्व कारणांनी ते महात्मे सम-दृष्टी असूनही माझ्यावर प्रसन्न झाले आणि मजवर विशेष कृपा करू लागले. त्या मुनींच्या आज्ञेने मी त्यांच्या भोजनपात्रांत शिल्लक राहिलेले उष्टे अन्न खात असे. त्याच्याच प्रभावामुळे माझी संपूर्ण पापे नष्ट होऊन गेली. असे करता करता काही काळाने माझे चित्त शुद्ध होऊन गेले, आणि त्यामुळे त्यांच्या धर्मामध्ये (भागवत-धर्मामध्ये) मला रुची उत्पन्न झाली. तेथे ते लोक श्रीकृष्णाच्या कथा नित्य गात होते आणि त्या महात्म्यांच्या अनुग्रहामुळे, त्या मनोहर कथा मी श्रद्धापूर्वक ऐकत होतो. असे करता करता श्रीभगवंताचे ठिकाणी माझी भक्ती निर्माण झाली. हे महामुने, प्रथम भगवंतांबद्दल मला आवड उत्पन्न झाली आणि नंतर माझी मती स्थिर व दृढ झाली. त्या विशुद्ध दृढ बुद्धीच्या सामर्थ्याने, स्व-मायेने रहित, शुद्ध अशा परब्रह्म-रूपाचे ठिकाणी सर्व सत्-असत् प्रपंच हा मायेने कल्पिलेला आहे, असे मी पाहू लागलो. अशाप्रकारे वर्षा व शरद या दोन्ही संपूर्ण ऋतूंमध्ये ते महात्मे दररोज भगवंताच्या निर्मल यशाचे गायन करीत राहिले; ते ऐकण्यामुळे

माझ्या हृदयात रजोगुण आणि तमोगुण यांचा नाश करणारी सात्त्विक भक्ती उत्पन्न झाली. मी प्रेम करणारा, आश्रित, जितेंद्रिय, श्रद्धाळू, पापरहित असा बालक-रूपातील दास आहे, असे समजून, दीनांवर दया करणाऱ्या त्या महात्म्यांनी गावातून जातेवेळी माझ्यावर परम कृपा करून, प्रत्यक्ष भगवंताने सांगितलेले गुह्य ज्ञान त्यांनी मला सांगितले. आणि त्या ज्ञानाचे द्वारा भगवान् वासुदेवाच्या मायेचा प्रभाव मला कळून आला की जो जाणल्यामुळे एखादा पुरुष परमात्म्याचे परम पद प्राप्त करून घेतो.*

"याच्यानंतर मला ज्ञानाचा उपदेश करणारे ते महात्मे तर दुसऱ्या स्थळाकडे निघून गेले. त्यांच्या सांगण्यानुसार मी भजन करीत राहिलो. माझ्या आईचा मी एकमात्र पुत्र होतो; त्यामुळे आईचे माझ्यावर फार प्रेम होते. ती मलाच अनन्यगती आधार समजत होती. एके दिवशी मृत्यूने प्रेरणा केलेल्या एका सापाने माझ्या प्रेममयी मातेला दंश केला; त्यामुळे तिचा मृत्यू घडून

---

* गीतेचे प्रसिद्ध टीकाकार, महात्मे, श्रीमधुसूदन सरस्वतीजी यांनी आपल्या भक्तिरसायन नावाच्या ग्रंथात, देवर्षी नारदजींच्या या क्रमाचे अनुसरण करीत भक्तीच्या अकरा भूमिका सांगितल्या आहेत:-

**प्रथमं महतां सेवा तद्दयापात्रता ततः।**
**श्रद्धाऽथ तेषां धर्मेषु ततो हरिगुणश्रुतिः॥**
**ततो रत्यङ्कुरोत्पत्तिः स्वरूपाधिगतिस्ततः।**
**प्रेमवृद्धिः परानन्दे तस्याथ स्फुरणं ततः॥**
**भगवद्धर्मनिष्ठातः स्वस्मिंस्तद्गुणशालिता।**
**प्रेम्णोऽथ परमा काष्ठेत्युदिता भक्तिभूमिकाः॥**

१. प्रथम महापुरुषांची सेवा २. तदनंतर त्यांच्या दयेला पात्र होणे ३. त्यामुळे त्यांच्या धर्मावर श्रद्धा ४. श्रद्धेने हरि-गुणांचे श्रवण ५. श्रवणामुळे प्रेमाच्या अंकुराची उत्पत्ती ६. प्रेमाने स्वरूप-प्राप्ती ७. तिच्यामुळे परानंद-स्वरूपात प्रेमाची वृद्धी ८. प्रेमाच्या वृद्धीमुळे परम आनंदाचे स्फुरण ९. त्यामुळे भागवत धर्मावर निष्ठा १०. त्यामुळे स्वतःचे ठिकाणी त्या गुणांचे प्रकटीकरण, आणि ११. त्यामुळे प्रेमाची पराकाष्ठा. अशा प्रकारे भक्तीच्या भूमिका सांगितलेल्या आहेत.

आला. तेव्हा भक्तांचे कल्याण इच्छिणाऱ्या भगवंताने माझ्यावर कृपा केली, असे समजून, मी उत्तर दिशेकडे चालू लागलो आणि तेथे एका घनदाट वनामध्ये पोहोचल्यावर, नदीच्या किनाऱ्यावर एका पिंपळ वृक्षाच्या मुळाशी बसून, मी भगवंताचे चिंतन सुरू केले, आणि चित्त एकाग्र करून, भक्तिपूर्वक भगवंताच्या चरण-कमलांचे ध्यान मी करू लागलो. त्या वेळी प्रेमावेशामुळे माझ्या डोळ्यांत आनंदाचे अश्रू भरून आले आणि मला दिसले की माझ्या हृदयात भगवान् श्रीहरी प्रकट झालेले आहेत. भगवंताचे दर्शन होताच प्रेमाला जणू पूर लोटला. माझ्या अंगावर रोमांच उभे राहिले. मी आनंदाच्या सागरात बुडून गेलो आणि जगासकट मी स्वत:लाही विसरून गेलो.

" अचानकपणे भगवंताचे ते मनमोहन, परमसुंदर, रूप अदृश्य होऊन गेले. तेव्हा मला फार दु:ख झाले. पुन: दर्शन व्हावे म्हणून मी जेव्हा काही प्रयत्न करू लागलो, तेव्हा मला आकाशवाणी ऐकू आली, "हे बालका, या जन्मामध्ये तुला माझे दर्शन होणार नाही. केवळ तुझे प्रेम वाढावे यासाठी मी तुला एकदाच दर्शन दिले आहे. अल्प काळात सत्संगाच्या प्रभावामुळे तुझी माझ्या ठिकाणी दृढ भक्ती झालेली आहे. या शरीराचा त्याग केल्यावर, तू माझा निज-जन होशील, माझ्या ठिकाणी तुझी निश्चल बुद्धी होईल, आणि माझ्या कृपेने कल्पांतातसुद्धा तुला या जन्माच्या गोष्टी आठवणीत राहतील." तेव्हा भगवंताच्या कृपेला मी स्वत: पात्र आहे हे मला कळले आणि मी वाकून प्रणाम केला व लज्जेचा त्याग करून, निरिच्छ होऊन, मी जगांत संचार करू लागलो. श्रीकृष्णाचे ठिकाणी मन लावून, मी ससारातील संगाचा त्याग केला. योग्य वेळी ते माझे शरीर नष्ट होऊन गेले आणि मला शुद्ध , दिव्य अशा पार्षद देहाची प्राप्ती झाली.

" त्यानंतर त्या कल्पाच्या शेवटी, स्वत:मध्ये विश्वाला लीन करून, प्रलयकालीन समुद्रात शयन करणाऱ्या ब्रह्माजींच्या श्वासाबरोबर मी त्यांच्या हृदयांत प्रवेश केला. सहस्र युगे लोटल्यानंतर जेव्हा ब्रह्माजी पुन: जगाची

रचना करू लागले, तेव्हा त्यांच्या श्वासापासून मरीची इत्यादी ऋषींच्यासह मी उत्पन्न झालो.

"तेव्हापासून अखंड ब्रह्मचर्याचे व्रत धारण करून, मी तिन्ही लोकांत आत-बाहेर, इच्छा असेल तिकडे फिरत आहे. भगवंताच्या कृपेमुळे मला कोठेही अडथळा येत नाही. स्वत: भगवंताने दिलेली ही स्वरमय व ब्रह्माने विभूषित अशी वीणा वाजवून, हरीचे गुण गात मी सर्वत्र संचार करीत आहे. भगवंताची माझ्यावर इतकी अपार कृपा आहे की जेव्हा मी प्रेमाने सद्‌गदित होऊन, भगवंताच्या लीलेचे गायन करतो, तेव्हा त्याच क्षणी मंगलकीर्ती व पूज्यपाद असे भगवंत प्रगट होऊन मला असे दर्शन देतात की जणू काही कुणीतरी हाक मारताच एखादा येतो.

" भोगांच्या प्राप्तीच्या इच्छेने जे लोक वारंवार व्यग्रचित्त होऊन, संसारातील विषयांच्या उपभोगांमध्ये आसक्त असतात, त्यांच्यासाठी संसारसागरातून तरून जाण्यासाठी फक्त हरि-चर्चा हीच बळकट नौका आहे. म्हणूनच स्वत:च्या आणि इतर लोकांच्या कल्याणासाठी, मी सदा सर्वदा हरीच्या गुणांचे गायन करीत संचार करतो. विषयांत रमणाऱ्या पुरुषांचे चित्त हे भगवान् श्रीहरीच्या भजनाने जितके लौकर शांत होते, तितके योग, इत्यादींच्या द्‌वारा होत नाही." इतके सांगून हरि-गुण गात श्रीनारदजी तेथून निघून गेले.

देवर्षी नारदजी हे सर्व वेदांचे तत्त्व जाणणारे, देवतांना पूज्य, इतिहास आणि पुराणे यांचे विशेष जाणकार, भूतकालीन कल्पांतील गोष्टी जाणणारे, धर्मतत्त्वांचे ज्ञाता, शिक्षा-कल्प-व्याकरण यांचे असाधारण पंडित, संगीतविशारद, परस्पर-विरोधी असणाऱ्या विधि-वाक्यांची मीमांसा जाणणारे, वाक्यांचे पृथक्करण करण्यास पूर्णपणे योग्य, प्रभावशाली, व्याख्यान देणारे, बुद्धिमान, स्मृतीने युक्त, नीति-शील, कवी, ज्ञानी, सर्व प्रमाणांच्या द्‌वारा वस्तूंचा विचार करण्यास समर्थ, बृहस्पतीप्रमाणे विद्वानांच्या शंकांचे

समाधान करणारे, योगाच्या सामर्थ्याने सकल दिशांतील परिपूर्ण असे भूमंडळ प्रत्यक्ष पाहणारे, मोक्षाधिकाराचे तज्ज्ञ, कल्याणासाठी कलह, विवाद उत्पन्न करणारे, संधी व विग्रह यांच्या सिद्धांताचे जाणते, अनुमानानेच कोणत्याही कार्याचे तत्त्व जाणणारे, समस्त शास्त्रांचे पूर्ण पंडित, विधीचा उपदेश देणारे, सकल सद्‌गुणांचा आधार, आणि अपार तेजस्वी असे होते, असे महाभारतामध्ये सांगितले आहे. ते नारदजी ज्ञानाचे स्वरूप, विद्यांचे भांडार, आनंदांचा समूह, सदाचाराचा आधार, सर्व प्राण्यांवर अकारण प्रेम करणारे, विश्वाचे हित सहजच करणारे, भक्तीचे महान् स्वरूप, आणि आचार्य असेही होते.

अशा देवर्षी नारदजींनी सगळा उपदेश करून झाल्यावर, "अथातो भक्तिं व्याख्यास्याम:" असे म्हणून, शेवटी भक्तितत्त्वाचा उपदेश केला आहे. यावरून हे सिद्ध होते की भक्तीचा दर्जा फारच उच्च आहे.

अशा प्रकारे लोकांवर अकारण कृपेचे कारण असणारे, हरिगुण गात गात त्रैलोक्यामध्ये फिरणारे असे जे देवर्षी नारद त्यांच्या चरणांना प्रणाम करून, त्यांना परमप्रिय असणाऱ्या भक्तीचा आम्हा लोकांना त्यांनी केलेला अनुपम उपदेश लक्षपूर्वक वाचून, आपण तदनुसार जीवन बनविण्याची कृती करावयास हवी.

* * *

॥ श्रीहरिः ॥

# प्रेम-दर्शन

(देवर्षी नारद-रचित भक्तिसूत्र)

## प्रेमस्वरूप अशा भक्तीचे स्वरूप

**अथातो भक्तिं व्याख्यास्यामः ॥१॥**

**१. आता आम्ही भक्तीचे स्पष्टीकरण करणार आहोत.**

या सूत्रातील 'अथ' आणि 'अतः' या शब्दांवरून असे प्रतीत होते की भक्तिमार्गाचे आचार्य, परम भक्तशिरोमणी, सर्व भूतांच्या हितामध्ये रत, दयानिधी अशा देवर्षी नारदजींनी इतर अन्य सिद्धांतांचे स्पष्टीकरण अगोदरच करून दिले आहे; आता ते जीवांच्या कल्याणासाठी परम कल्याणमय अशा भक्तीचे स्वरूप आणि साधने यांचे विवरण करण्यास प्रारंभ करीत आहेत. नारदजी म्हणतात-

**सा त्वस्मिन्* परम-प्रेम-रूपा ॥२॥**

**२. ती (भक्ती ही) ईश्वराचे बाबतीत परम प्रेमस्वरूप अशी आहे.**

भक्तीचे अनेक प्रकार सांगितले गेलेले आहेत; परंतु नारदजी ज्या भक्तीचे स्पष्टीकरण करीत आहेत, ती भक्ती प्रेम-स्वरूप आहे. भगवंताचे ठिकाणी अनन्य प्रेम असणे म्हणजेच भक्ती आहे. ज्ञान, कर्म, इत्यादी साधनांच्या आश्रयाने रहित आणि सगळीकडून इच्छारहित होऊन, जेव्हा चित्ताची वृत्ती अनन्य भावाने फक्त भगवंताचे ठिकाणी चिकटून राहाते, जगातील

---

* पाठभेद "कस्मै"

समस्त पदार्थांपासून तसेच परलोकातील सकल सुख-सामुग्री पासून, इतकेच काय मोक्ष- सुखापासूनसुद्धा चित्त निवृत्त होऊन, ते एकमात्र आपले परम प्रेमास्पद अशा भगवंतामध्ये लागून राहते, सर्व पदार्थांपासून संपूर्णपणे दूर होऊन सारी ममता आणि आसक्ती हे एकमात्र प्रियतम अशा भगवंताचे बाबतीत होऊन जातात, तेव्हा त्या स्थितीला "अनन्य प्रेम" असे म्हणतात.

**अमृतस्वरूपा च ॥३॥**

**३. आणि (ती भक्ती ) अमृत-स्वरूप (सुद्धा) आहे.**

भगवंताचे ठिकाणी अनन्य प्रेम हेच वास्तविकपणे अमृत आहे. ते सर्वांत जास्त मधुर आहे; आणि ज्या माणसाला हे प्रेमामृत प्राप्त होते, तो त्याचे पान करून अमर होऊन जातो. लौकिक वासना हीच मृत्यू आहे. अनन्य, प्रेमयुक्त अशा भक्ताच्या हृदयामध्ये भगवत् प्रेमाच्या एका नित्य नवीन, पवित्र वासनेखेरीज दुसरी कोणतीही वासना शिल्लक राहात नाही. या अतिशय दुर्लभ अशा वासनेमुळे तो भक्त मुनिमनांचे हरण करणाऱ्या भगवंताच्या लीलेचे एक साधन बनून, कर्मबंधनाने युक्त जन्ममरणाच्या चक्रातून संपूर्णपणे सुटून जातो. तो भक्त सदा भगवंताचे समीप निवास करतो आणि भगवंत त्याच्या समीप राहतो. प्रेमयुक्त भक्त आणि प्रेमास्पद असा भगवंत यांचा हा नित्य व अटळ असा संयोग म्हणजेच वास्तविक अमरत्व आहे. या कारणानेच भक्तजन हे मुक्तीची इच्छा न करता भक्तीची इच्छा करतात.

**अस बिचारि हरि भगत सयाने । मुक्ति निरादर भगति लुभाने ॥**

**(हरिभक्त असा विचार करून भक्तीवर लुब्ध होतात व मुक्तीची उपेक्षा करतात.)**

**यल्लब्ध्वा पुमान् सिद्धो भवति, अमृतो भवति, तृप्तो भवति ॥४॥**

**४-(परम प्रेमरूप आणि अमृतरूप भक्ती) जिला प्राप्त करून घेऊन मनुष्य सिद्ध होऊन जातो, अमर होऊन जातो, आणि तृप्त होऊन जातो.**

ज्या माणसाने भगवंताच्या प्रेमामृताचे पान केले आहे, तोच सिद्ध होय. "सिद्ध" या शब्दाने येथे अणिमा इत्यादी सिद्धींची अपेक्षा नाही. या सिद्धींची गोष्ट ती काय पण मोक्षरूप सिद्धिसुद्धा प्रेमी भक्त इच्छीत नाही. या सिद्धी तर अशा प्रेमी भक्ताच्या सेवेसाठी संधी शोधीत असतात. परंतु तो भक्त भगवत्प्रेमापुढे या सिद्धींना अत्यंत तुच्छ समजून, त्यांचा स्वीकार करीत नाही. स्वतः भगवान् सांगतात-

**न पारमेष्ठ्यं न महेन्द्रधिष्ण्यं**
**न सार्वभौमं न रसाधिपत्यम्॥**
**न योगसिद्धीरपुनर्भवं वा**
**मय्यर्पितात्मेच्छति मद्विनान्यत्॥**

(श्रीमद्भा. ११/१४/१४)

"माझ्या ठिकाणी चित्त लावून ठेवणारे माझे प्रेमी भक्त हे मला सोडून, ब्रह्मदेवाचे पद, इंद्राचे आसन, चक्रवर्ती राज्य, भिन्न भिन्न लोकांचे आधिपत्य, योगाच्या सर्व सिद्धी आणि सायुज्य मोक्ष इत्यादी कशाचीही इच्छा करीत नाहीत."

एक भक्त तर सांगतो-

**रोमाञ्चेन चमत्कृता तनुरियं भक्त्या मनो नन्दितं**
**प्रेमाश्रूणि विभूषयन्ति वदनं कण्ठं गिरो गद्गदाः।**
**नास्माकं क्षणमात्रमप्यवसरः कृष्णार्चनं कुर्वतां**
**मुक्तिर्द्वारि चतुर्विधापि किमियं दास्याय लोलायते ॥**

(बोधसार)

"प्रियतम अशा श्रीकृष्णाची पूजा करते वेळी शरीर पुलकित होऊन गेले. भक्तीने मन प्रफुल्लित झाले. प्रेमाच्या अश्रूंनी मुखाला आणि गद्गद वाणीने कंठाला सुशोभित केले. आता तर आम्हांला एका क्षणासाठीसुद्धा फुरसत नाही की ज्या वेळी आम्ही दुसऱ्या विषयाचा स्वीकार करू. याच्यापेक्षाही

अधिक म्हणजे सायुज्य इत्यादी चारी प्रकारच्या मुक्ती आमच्या दरवाजाशी उभ्या राहून आमची दासी बनण्यास का आतुर होत आहेत, हे कळत नाही."

जर एखाद्या भक्ताने भक्ति आणि मुक्ती यांचा स्वीकार केला, तर ती गोष्ट म्हणजे आपले परम सौभाग्य, असे त्या सिद्धी मानतात; परंतु भक्त असे करीत नाहीत.

**हरिभक्तिमहादेव्याः सर्वा मुक्त्यादिसिद्धयः।**
**भुक्तयश्चाद्भुतास्तस्याश्चेटिकावदनुव्रताः ॥**

(नारदपाञ्चरात्र)

"मुक्ती इत्यादी सिद्धी आणि अनेक प्रकारच्या आश्चर्यकारक भुक्ती (भोग) या दासीप्रमाणे हरिभक्तिरूपी महाराणीच्या सेवेमध्ये चिकटून राहातात."

काकभुशुंडिजी महाराज सांगतात-

**जिमि थल बिनु जल रहि न सकाई। कोटि भाँति कोउ करै उपाई।**
**तथा मोच्छ सुख सुनु खगराई। रहि न सकइ हरि भगति बिहाई॥**

(ज्या प्रमाणे कुणी कोट्यवधी उपाय केले तरी पाणी हे जमिनीशिवाय राहू शकत नाही, त्याप्रमाणे हे गरुडराज, भगवंताच्या भक्तीशिवाय मोक्षाचे सुख राहू शकत नाही.)

म्हणून येथे सिद्धी या शब्दाचा अर्थ 'कृतकृत्यता' असा घ्यावयास हवा. भक्ताला कोणत्याही वस्तूच्या अभावाचे ज्ञान राहात नाही. तो प्रियतम अशा भगवंताचे प्रेम प्राप्त करून घेऊन, सर्वप्रकारे पूर्णकाम होऊन जातो. येथे पूर्णकामता हेच त्याचे अमर होणे होय. जोपर्यंत मनुष्य कृतकृत्य किंवा पूर्णकाम होत नाही, तोपर्यंत त्याला वारंवार कर्माला वश होऊन गमन-आगमन करणे भाग पडते. पूर्णकाम असा भक्त उत्पत्ती आणि नाश या दोन्हींमध्ये भगवंताच्या लीलेचा प्रत्यक्ष अनुभव घेऊन, मृत्यूला खेळ समजतो. वास्तविकपणे त्याच्या बाबतीत मृत्यूचाच मृत्यू होऊन जातो. प्रभूच्या लीलेशिवाय मृत्यू हे नाव

असणारी कोणती तरी भयदायक वस्तू त्याच्या ज्ञानामध्ये शिल्लक राहात नाही. आणि म्हणूनच तो तृप्त होऊन जातो. जोपर्यंत ईश्वराच्या लीलांपेक्षा वेगळे असे जगातील पदार्थांचे अस्तित्व शिल्लक राहते, तोपर्यंत त्या पदार्थांना सुखकारक किंवा दु:खकारक समजून माणूस निरंतर नवनवीन सुखदायक पदार्थांची इच्छा करीत अतृप्त राहतो. परंतु जेव्हा सर्वांचा मूलस्रोत, सर्वांचे यथार्थ पूर्ण स्वरूप त्या माणसाला प्राप्त होते, तेव्हा त्या अखंड नसणाऱ्या आणि अपूर्ण असणाऱ्या पदार्थांच्याकडे त्याचे मन जात नाही. 'पूर्ण' प्राप्त करून घेऊन, तो भक्त तृप्त होऊन जातो.

**यत्प्राप्य न किञ्चिद्वाञ्छति न शोचति न द्वेष्टि न रमते नोत्साही भवति ।।५।।**

**५. जी (प्रेमस्वरूप भक्ती ) प्राप्त झाल्यानंतर मनुष्य कोणत्याही वस्तूची इच्छा करीत नाही, शोक करीत नाही, द्वेष करीत नाही, कोणत्याही वस्तूमध्ये आसक्त होत नाही, आणि त्याला (विषय-भोगांची प्राप्ती करून घेण्याचा) उत्साह राहात नाही.**

जी मिळाल्यावर साऱ्या इच्छा नष्ट होऊन जातात, अशी ती परम महान् वस्तू तो प्रेमी भक्त प्राप्त करून घेतो. ज्यांच्यासाठी भोगी तसेच त्यागी असे सर्व मानव आपापल्या आवडीनुसार नेहमी हाव धरून असतात, ते जगातील प्रेम, ऐश्वर्य, सौंदर्य, बल, यश, ज्ञान, वैराग्य इत्यादी समस्त पदार्थ हे भगवत्-प्रेमरूपी दुर्लभ अशा पदार्थाचे पुढे अत्यंत तुच्छ आहेत. संपूर्ण विश्वभर पसरून असणारे उपर्युक्त समस्त पदार्थ जरी एकत्रित केले गेले तरीसुद्धा ते सर्व मिळून ज्या भगवान्रूपी समुद्राच्या एका जलकणासमान असतात, तो भगवान् स्वत:च ज्या प्रेमाच्या आकर्षणाने नेहमी खेचला जातो, त्या प्रेमाच्या पुढे संसारातील पदार्थांची काय गणती आहे?

श्रीशुकदेव मुनी सांगतात -

**यस्य भक्तिर्भगवति हरौ नि:श्रेयसेश्वरे।**

**विक्रीडतोऽमृताम्भोधौ किं क्षुद्रैः खातकोदकैः ॥**

(श्रीमद्भा. ६/१२/२२)

" परम कल्याणाचा स्वामी अशा भगवान् श्रीहरीची भक्ती जो कोणी करतो, तो अमृताच्या सागरात क्रीडा करतो. खड्ड्यात भरलेल्या फडतूस घाणेरड्या पाण्याप्रमाणे असणाऱ्या कोणत्याही भोगामध्ये अथवा स्वर्ग इत्यादींमध्ये त्याचे मन लोभ बाळगत नाही."

प्रेमामृताच्या समुद्रात बुडालेला भक्त हा अन्य पदार्थांची इच्छा का बरे करू लागेल ? ज्याप्रमाणे भोग, मोक्ष इत्यादींची इच्छा भक्त करीत नाही, त्याप्रमाणेच ते नष्ट होऊन गेले तरी तो शोकसुद्धा करीत नाही. भोगांचा नाश ही परमात्म्याची इच्छा आहे, असे तो भक्त समजतो; त्यामुळे तो सदा- कोणत्याही परिस्थितीमध्ये- आनंदातच राहात असतो. परंतु भगवंताच्या प्रेमाचे सेवन करताना जरी सायुज्य मोक्षाच्या साधनात उणेपणा आला, तरी तो त्यासाठीसुद्धा शोक करीत नाही; याउलट तो नेहमी अशी इच्छा करतो की माझे भगवत्प्रेम वाढत राहो, मग त्यासाठी कितीही कष्ट घ्यावे लागले तरी हरकत नाही.

या प्रकारे तो भक्त कोणत्याही जीवाचा किंवा लौकिक दृष्टीने प्रतिकूल मानल्या जाणाऱ्या पदार्थांचा किंवा स्थितीचा कधीही द्वेष करीत नाही. सर्व जीवांचे ठिकाणी आपल्या प्रभूला, आणि सर्व पदार्थ आणि सर्व स्थिती यांमध्ये प्रभूची लीला पाहात पाहात तो भक्त क्षणोक्षणी आनंदित होत असतो.

प्रभूच्या प्रेमामध्ये भक्ताचे मन नेहमी असे तल्लीन होऊन जाते की अर्धा क्षणसुद्धा तो अन्य कोणत्याही पदार्थांचे ठिकाणी रमत नाही. गोपी उद्धवाला सांगतात :-

**ऊधौ, मन न भए दस बीस ।**
**एक हुतो सो गयो स्याम सँग, को आराधै ईस ॥**

(उद्धवा, मने काही दहा-वीस नाहीत. एक होते ते कृष्णाबरोबर गेले;

आता दुसऱ्याची आराधना कशी करायची?)

मन त्या भक्ताच्या स्वत:जवळ राहातच नाही; तेव्हा मग ते दुसऱ्या गोष्टीत कसे बरे रमेल? म्हणून तर भगवंताच्या प्रेमी लोकांसाठी भगवंताचे नाव 'मनचोर' पडले आहे.

**मधुकर स्याम हमारे चोर।**
**मन हर लियो माधुरी मूरति, निरख नयनकी कोर।।**

(उद्धवा, आमचा कृष्ण हा चोर आहे. आपल्या मधुर मूर्तीने व नेत्रकटाक्षाने त्याने आमचे मन चोरले आहे.)

प्रेमी भक्ताचे चित्त तो भगवंत अशा चतुराईने चोरून आपला कब्जा करतो की त्याच्यावर दुसऱ्याची नजरसुद्धा कधीही पडू शकत नाही. दुसरा कोणी पाहील तरच ना कुठे त्याचे ठिकाणी आसक्ती किंवा प्रीती होईल? परंतु जिथे मनामध्ये दुसऱ्या कल्पनेलासुद्धा स्थान मिळत नाही, तेथे कशामध्ये कसली आसक्ती किंवा आवड निर्माण होईल?

एक सर्वात प्रिय असा श्रीकृष्ण सोडला तर जर दुसऱ्या कुणाचाही भक्ताच्या मनामध्ये प्रवेशच निषिद्ध आहे, तर दुसऱ्या कोणत्या तरी गोष्टीच्या प्राप्तीसाठी उत्साह तरी कसा बरे असेल ? जर कुणी अन्य कुणाला तरी पाहील व ऐकेल तर त्यासाठी मनामध्ये इच्छा उत्पन्न होईल आणि तेव्हा त्यासाठी प्रयत्न केला जाईल ना ! जर मन हे अन्य कुणाच्या ठायी रमत असेल तरच ते मिळविण्यासाठी उत्साह असेल ना ! प्रथमपासूनच मन हे तर कुण्या एका भगवंताचे होऊन गेले; त्याने मनावर आपला पूर्ण अधिकार प्रस्थापित केला आणि स्वत: त्या मनामध्ये येऊन तो भगवंत कायमचा वसला आहे. अशा स्थितीत अन्य कुणासाठीही कोणताही अवकाशच राहिला नाही; जर कुणी समजा येतच असेल, तर त्याला लांबूनच परत जाणे भाग पडते. काय करावे, जागाच शिल्लक राहिली नाही.

**रोम रोम हरि रमि रहे, रही न तनिकौ ठौर।**

(हरी हा रोम-रोमात रमून राहिला आहे. जराही मोकळे स्थान उरले नाही.)

मनाच्या अनुमतीविना बिचारे नेत्र कुणाकडे पाहणार ? जेव्हा कुठेही कोणीही दिसतच नाही, तेव्हा त्याला प्राप्त करून घेण्यासाठी उत्साहाची गोष्टच शिल्लक राहात नाही.

दुसरी गोष्ट अशी की माणसाला उत्साह वाटतो, तो कोणत्या तरी सुखाच्या इच्छेने. जेव्हा सकल सुखांचा खजिनाच आपल्याजवळ असेल, तेव्हा क्षुद्र सुखासाठी कसा बरे उत्साह असेल ? म्हणून प्रेमोत्साहाचे पुतळे असणारे भगवंत-प्रेमी असे जे पुरुष असतात, त्यांना लौकिक कार्यांबद्दल-विषयांबद्दल- कसलाही उत्साह दिसून येत नाही.

भगवंतांनी स्वत:च सांगितले आहे-

**यो न हृष्यति न द्वेष्टि न शोचति न काङ्क्षति ।**
**शुभाशुभपरित्यागी भक्तिमान् य: स मे प्रिय: ॥**

(श्रीमद्‌भगवद्‌गीता १२/१७)

“जो कधी आनंदित होत नाही, द्वेष करीत नाही, शोक करीत नाही, कामना, इच्छा करीत नाही, तसेच जो शुभ-अशुभ अशा सर्वांचा त्याग करतो, तो भक्तिमान् पुरुष मला प्रिय आहे.”

**यज्ज्ञात्वा मत्तो भवति स्तब्धो भवति आत्मारामो भवति ॥६॥**

**६. जिला (परम-प्रेम-रूप भक्तीला) जाणून (प्राप्त करून घेऊन), मनुष्य उन्मत्त होऊन जातो, स्तब्ध (शांत) होऊन जातो, (आणि) आत्माराम बनून जातो.**

भगवंतांचे प्रेम प्रकट झाल्याबरोबरच ते भगवत्प्रेम माणसाला वेडा करते; म्हणून प्रेमी असा भक्त सदा प्रेमाच्या नशेत चूर होऊन, रात्रंदिवस प्रभूचे गुण गात, ऐकत आणि चिंतन करीत राहातो. बाहेरच्या दुसऱ्या कोणत्याही गोष्टींची जाणीवसुद्धा त्याला राहात नाही. ज्याप्रमाणे वेडा मनुष्य मनात येईल

ते बोलतो आणि करतो, त्याप्रमाणे तो प्रेमाने उन्मत्त झालेला भक्तसुद्धा प्रभूची चर्चा करण्यामध्येच तल्लीन होऊन राहातो; कारण त्याच्या मनाला तेच चांगले वाटते. भागवतामध्ये सांगितले आहे :-

श्रृण्वन् सुभद्राणि रथाङ्गपाणे-
जन्मानि कर्माणि च यानि लोके।
गीतानि नामानि तदर्थकानि
गायन् विलज्जो विचरेदसङ्गः ॥
एवंव्रतः स्वप्रियनामकीर्त्या
जातानुरागो द्रुतचित्त उच्चैः ।
हसत्यथो रोदिति रौति गाय-
त्युन्मादवन्नृत्यति लोकबाह्यः ॥

(११/२/३९-४०)

"चक्रपाणी अशा भगवंताचे कल्याणकारक तसेच लोकप्रसिद्ध असे जन्म आणि कर्मे ऐकत त्यांना अनुसरून ठेवल्या गेलेल्या नावांचे लज्जा सोडून गायन करीत व संसारात अनासक्त होऊन, भक्त वावरत असतो. अशा प्रकारचे व्रत धारण करून, आपल्याला प्रियतम असणाऱ्या प्रभूच्या नाम-संकीर्तनामध्ये प्रेम असल्या कारणाने, ज्याचे चित्त विरघळले आहे, असा तो भक्त वेड्या माणसाप्रमाणे कधी अलौकिक भावनेने मोठमोठ्यांदा हसतो, कधी रडतो, कधी उच्च स्वराने गाऊ लागतो, आणि कधी नाचू लागतो."

सुतीक्ष्णाची अवस्था सांगताना तुलसीदासांनी सांगितले आहे-

मुनि मग माझ अचल होइ बैसा । पुलक सरीर पनस फल जैसा ॥

(सुतीक्ष्ण मुनी मार्गातच बसून राहिला. त्याचे शरीर फणसासारखे पुलकित होऊन गेले.)

नृत्य करीत करीत प्रभुमय बनून गेल्यावर, अशीच अवस्था येते. त्या भक्ताचे चित्त आणि शरीर संपूर्णपणे स्तब्ध, शांत होऊन जाते. आत्मा आनंदमय

होऊन जातो. यालाच आत्माराम असे म्हणतात. या "आत्माराम- स्थिती" मध्ये विषयांची तृष्णा तर कुठेही उरतच नाही.

**न हि स्वात्मारामं विषयमृगतृष्णा भ्रमयति ॥**

(स्वत:चे ठिकाणी आत्माराम झालेल्या भक्ताला विषयांचे मृगजळ इकडे तिकडे भटकावयास लावत नाही.)

तसेच भक्ताला अन्य कशाचेही ज्ञान राहात नाही. हेच प्रेमाद्वैत किंवा रसाद्वैत होय. आपल्या प्रियतमाशी एकरूप होऊन गेल्यावर प्रेमी भक्ताच्या पृथक् अशा अस्तित्वाचाच लोप होऊन जातो.

* * *

# प्रेमातील अनन्यता

**सा न कामयमाना निरोधरूपत्वात् ॥७॥**

**७– ती (प्रेम-स्वरूप भक्ती ही) कामनेने युक्त नसते; कारण ती निरोधाच्या स्वरूपाची आहे.**

ही प्रेम भक्ती संपूर्णपणे त्यागाच्याच स्वरूपाची आहे. त्या भक्तीमध्ये धन, संतान, कीर्ती, स्वर्ग इत्यादीची गोष्ट तर सोडा, मोक्षाची सुद्धा इच्छा राहू शकत नाही. ज्या भक्तीच्या बदल्यात काहीतरी मागितले जाते किंवा काही प्राप्त करून घेण्याची आशा किंवा आकांक्षा असते, ती भक्ती कामनेने युक्त असते; तो स्वार्थाचा व्यापार होतो. प्रेमरूप भक्तीमध्ये भक्त आपला प्रियतम असा जो भगवान् आणि त्याची सेवा या दोन गोष्टी सोडून आणखी कशाचीही अपेक्षा करीतच नाही. श्रीमद्भागवतात भगवान् कपिलदेव सांगतात की "माझे प्रेमी भक्तगण माझी सेवा सोडून, सालोक्य, सार्ष्टी, सामीप्य, सारूप्य आणि सायुज्य या पाच प्रकारच्या* मुक्ती दिल्या गेल्या तरी सुद्धा त्या मुक्ती ते भक्त घेत नाहीत." यथार्थ भक्ती उदयास आल्यावर, कामना तर नष्टच होऊन जातात; कारण ती भक्ती निरोध या स्वरूपाची म्हणजे त्यागाने युक्त आहे. आता तो निरोध म्हणजे काय आहे ? याचे उत्तर पुढील सूत्रात आहे.

**निरोधस्तु लोकवेदव्यापारन्यासः ॥८॥**

---

* पाच प्रकारच्या मुक्ती अशा आहेत.-

सालोक्य – भगवंताच्या समान लोकाची प्राप्ती.

सार्ष्टी – भगवंताप्रमाणे ऐश्वर्यप्राप्ती.

सामीप्य – भगवंताच्या जवळ स्थान-प्राप्ती.

सारूप्य – भगवंताप्रमाणे स्वरूप-प्राप्ती .

सायुज्य – भगवंतामध्ये लय-प्राप्ती.

८-लौकिक आणि वैदिक (अशा सर्व) कर्मांच्या त्यागाला निरोध असे म्हणतात.

प्रेमाभक्तीमध्ये हा कर्म-त्याग आपोआपच घडून येतो. प्रेमामध्ये मदोन्मत्त असणारा भक्त आपल्या प्रियतम भगवंताला सोडून, दुसरी कोणतीही गोष्ट जाणत नाही; त्याचे मन सदा श्रीकृष्णाकार बनून राहाते; त्याच्या डोळ्यांसमोर सदा सर्वत्र प्रियतम अशा भगवंताची मूर्तीच राहात असते. त्याचे मन दुसऱ्या वस्तूकडे जातच नाही. श्रीगोपींनी भगवंताला सांगितले होते-

**चित्तं सुखेन भवतापहृतं गृहेषु**
**यन्निर्विशत्युत करावपि गृह्यकृत्ये ।**
**पादौ पदं न चलतस्तव पादमूलाद्**
**यामः कथं व्रजमथो करवाम किं वा ॥**

(श्रीमद्भा. १०/२९/३४)

" हे प्रियतम, आमचे चित्त आनंदाने घरातील कामांमध्ये आसक्त होऊन राहात होते, ते तू चोरून घेतलेस. आमचे हात घरातील कामांमध्ये लागले होते, तेसुद्धा क्रियारहित होऊन गेले. आणि आमचे पायसुद्धा तुझ्या पादपद्मांना सोडून एक पाऊलसुद्धा मागे हटण्याची इच्छा करीत नाहीत. आता आम्ही घरी कसे जावे आणि जाऊन करावे तरी काय ? "

जगाचे चित्र चित्तातून नष्ट होऊन गेल्यामुळे, तो भक्त कोणतेही लौकिक (स्मार्त) अथवा वैदिक (श्रौत) कार्य करण्यास लायक राहात नाही. यामुळे ती सर्व कर्मे आपोआपच सुटून जातात.

**तस्मिन्ननन्यता तद्विरोधिषूदासीनता च ॥९॥**

**९ - त्या प्रियतम अशा भगवंताचे ठिकाणी अनन्यता, आणि त्याला प्रतिकूल असणाऱ्या विषयांमध्ये उदासीनता यांनासुद्धा निरोध असे म्हणतात.**

बाह्य ज्ञान होत आहे अशा स्थितीमध्येसुद्धा प्रेमी भक्त हा आपल्याला

प्रियतम असणाऱ्या भगवंताचे बाबतीत अनन्य भाव ठेवीत, त्याला प्रतिकूल असणाऱ्या कार्यांमध्ये संपूर्णपणे उदासीन राहात असतो. अशा प्रकारे सावधपणे होणाऱ्या कर्मांना सुद्धा निरोध असे म्हटले जाते.

प्रेमी भक्ताचे द्वारा होणारी प्रत्येक क्रिया ही आपल्या प्रियतम भगवंताला अनुकूल अशी होत असते, आणि अनन्य भावाने त्याच्या सेवेसाठीच होत असते. ज्याप्रमाणे सूर्याच्या द्वारा कुठेही अंधार होत नाही किंवा अमृताच्या मार्फत मृत्यू होऊ शकत नाही; त्याप्रमाणे त्या भक्ताच्या द्वारा प्रतिकूल क्रिया तर होतच नाही.

**अन्याश्रयाणां त्यागोऽनन्यता ॥१०॥**

**१०- (आपल्या प्रियतम असलेल्या भगवंताला सोडून) दुसऱ्या आश्रयाच्या त्यागाचे नाव अनन्यता होय.**

प्रेमी असलेल्या भक्ताच्या मनात, आपला प्रियतम जो भगवान त्याचेशिवाय अन्य कुणी आहे, अशी कल्पनाही येत नाही; तेव्हा त्या स्थितीत तो दुसऱ्या कुणाचे भजन कसे बरे करील ? तो तर चराचर विश्व हे आपल्या भगवंताचे शरीर आहे, असे जाणत असतो; त्याला दुसरे काही दिसतच नाही.

जर कोणी त्या भक्ताला दुसऱ्या कुणाची तरी गोष्ट सांगू लागला, तर तो ती ऐकण्याची इच्छाही करीत नाही अथवा ती त्याला ऐकूही येत नाही. जर कुठे जबरदस्तीने ऐकणे भाग पडले तरी सुद्धा त्याचे मन तर तिकडे आकर्षित होतच नाही. महादेवाची अनन्य उपासक अशी जी पार्वती, तिला सप्तर्षींनी महादेवाचे अनेक दोष सांगून, तिला सांगितले की तू शिवापासून तुझे मन दूर हटव, आणि सकल सद्गुणांनी संपन्न अशा भगवान् विष्णूकडे मन लाव. त्यावेळी शिव-प्रेमाची मूर्ति अशा भगवती पार्वतीने उत्तर दिले की शिव हे जर मला वर म्हणून मिळाले नाहीत, तर कोट्यवधी जन्म झाले तरी मी कुमारी राहीन.

याच प्रकारे गोपींनीसुद्धा उद्धवाला सांगितले-

**ऊधौ ! मन मानेकी बात ।**

**दाख छोहारा छाडि अमृतफल बिषकीरा बिष खात ॥**

(उद्धवा, हे सर्व मनाच्या मानण्यावर आहे. विष-कीटक हा द्राक्षे, खारीक अशी गोड फळे सोडून देऊन विषच खातो.)

अशाप्रकारे प्रेमी भक्त आपल्याला प्रियतम असणाऱ्या एकमात्र भगवंतालाच जाणून, त्याला सर्वस्व मानून- जसे माशाला फक्त पाण्याचा आश्रय असतो त्याप्रमाणेच - फक्त भगवंताचाच आश्रय घेऊन, तो भक्त सर्व क्रिया त्या भगवंताचे साठीच करतो.

**एक भरोसो एक बल, एक आस बिस्वास ।**

**एक राम घनस्याम हित चातक तुलसीदास ॥**

चातक पक्ष्याच्या हट्टाप्रमाणे तो भक्त फक्त भगवंताचे ठिकाणीच चित्त लावून, संपूर्णपणे त्या भगवंतावर अवलंबून राहातो, त्या भगवंतासाठी शरीर धारण करतो. त्याचे खाणे-पिणे, झोपणे-बसणे, चालणे-फिरणे, देणे- घेणे, दान-पुण्य करणे हे सर्व काही त्या भगवंताचे साठीच होत असते. म्हणून त्याची सर्व कर्मे ही भगवंताच्या बाबतीतच अनन्य प्रेमभावाने संपन्न होत असल्या- कारणाने ती कर्मे स्वाभाविकपणेच कल्याणमय होतात.

**लोके वेदेषु तदनुकूलाचरणं तद्विरोधिषूदासीनता ॥११॥**

**११- लौकिक आणि वैदिक कर्मांच्या मधील भगवंताला अनुकूल असलेले कर्म करणे म्हणजेच त्याला प्रतिकूल असणाऱ्या विषयांमध्ये उदासीनता होय.**

अनन्य भावाने भगवंतासाठी कर्म करणाऱ्या भक्ताचे बाबतीत भगवंताला प्रतिकूल असणाऱ्या कर्मांचा आपोआपच त्याग होऊन जातो. वैदिक किंवा लौकिक - श्रौत किंवा स्मार्त - यापैकी जे भगवंताला अनुकूल असणार नाही म्हणजे ज्या कर्मामुळे प्रेमभक्तीच्या वाढीमध्ये साहाय्य मिळणार नसेल, असे कोणतेही कर्म तो करणार नाही.

वेद आणि लोक-धर्म यांना अनुसरून, पुत्राने मातापित्यांची, स्त्रीने पतीची, शिष्याने गुरूची आज्ञा पाळणे हे त्यांचेसाठी सर्व प्रकारे कर्तव्यच आहे; परंतु त्यांची आज्ञासुद्धा जर भगवत्-प्रेमाच्या विरुद्ध असेल तर तो प्रेमी भक्त कष्ट सहन करूनसुद्धा त्या आज्ञेचा त्याग करतो. कारण त्या भक्ताकडून आपल्याला प्रिय असणाऱ्या भगवंताच्या प्रतिकूल आचरण करणे, हे असंभवनीय आहे.

गोस्वामी तुलसीदासांनी उदाहरण देताना सांगितले आहे-

**जाके प्रिय न राम-वैदेही ।**

**तजिए ताहि कोटि बैरी सम, जद्यपि परम सनेही ॥**

ज्याला राम-सीता हे प्रिय नसतील, तो कितीही प्रिय असला तरी त्याचा अत्यंत वैऱ्याप्रमाणे त्याग करावा.

भगवंताला प्रतिकूल असणारी पित्याची आज्ञा प्रह्लादाने मानली नाही. बिभीषणाने भावाची संगत सोडून दिली. भरताने आईची आज्ञा टाळली. राजा बळीने शुक्राचार्य गुरूची गोष्ट ऐकली नाही. आणि व्रज-वनितांना पतीच्या आज्ञेकडे लक्ष दिले नाही. आणि हे सर्वजण जगताला कल्याणकारी ठरले.

कर्मे चार प्रकारची असतात- नित्य, नैमित्तिक, काम्य आणि निषिद्ध. यांमध्ये मद्य व मांस यांचे सेवन, चोरी, व्यभिचार, इत्यादी निषिद्ध कर्मे ही तर सर्वांच्या दृष्टीने त्याज्य होत. शास्त्रीय काम्य (सकाम) कर्मे ही बंधनकारक तसेच जन्ममृत्यूच्या चक्रात टाकणारी असल्यामुळे "**काम्यानां कर्मणां न्यासम्**" या भगवान् कृष्णाच्या वचनानुसार त्याज्य आहेत. उरली नित्य आणि नैमित्तिक कर्मे. ही कर्मे लौकिक आणि वैदिक विधीला अनुसरून, फळांची आसक्ती सोडून, फक्त भगवंताच्या आज्ञेनुसार, भगवंताच्या प्रीत्यर्थ करावयास हवीत. जी कर्मे भगवंताचे ठिकाणी प्रेम वाढविणारी असतील, तीच कर्मे भगवंताच्या प्रीत्यर्थ करावयाची कर्मे होत. गीतेला अनुसरून, आसक्ती आणि फळाची आशा सोडून, मन-वाणी आणि शरीर यांचेद्वारा

भगवंताला अनुकूल असणारी कर्मे करणे व भगवंताला प्रतिकूल असणाऱ्या कर्मांचा त्याग करणे म्हणजेच विरोधी कर्मांविषयीची उदासीनता होय. प्रेमाभक्तीची उन्मादमय स्थिती प्राप्त होईपर्यंत अशा प्रकारची भगवंताला अनुकूल असणारी कर्मे भक्ताकडून स्वाभाविकपणेच होत असतात.

**भवतु निश्चयदार्ढ्यादूर्ध्वं शास्त्ररक्षणम् ॥१२॥**

**१२ - (विधि-निषेधाच्या पलीकडील अलौकिक प्रेमाची प्राप्ती करून घेण्याचा मनातील) दृढ निश्चय झाल्यानंतर सुद्धा शास्त्राचे रक्षण केले पाहिजे. म्हणजे भगवंताला अनुकूल अशी शास्त्रोक्त कर्मे करावयास हवीत.**

बाह्य-ज्ञान-रहित व विधी आणि निषेध यांच्या पलीकडील अशा प्रेमाच्या सिद्धावस्थेमध्ये लौकिक आणि वैदिक कर्मांचा त्याग आपोआपच घडतो. तो जाणून बुजून केला जात नाही.

म्हणून जोपर्यंत प्रेमाची तशा प्रकारची- म्हणजे सर्व काही विसरून टाकावयास लावणारी- स्थिती प्राप्त होत नाही, तोपर्यंत प्रेमाच्या नावावर शास्त्राने विहित केलेल्या कर्मांचा त्याग कधीही करता कामा नये. शास्त्राला अनुसरून भगवंताला सर्व अर्पण आहे या बुद्धीने भगवंताला अनुकूल अशी नित्य-नैमित्तिक कर्मे आणि श्रवण- कीर्तन- स्वरूप भजन हे करीत करीतच, भगवंताचे ते परमोच्च प्रेम भक्ताला प्राप्त होते. भगवान् स्वत: आज्ञा करतात-

**तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्यव्यवस्थितौ ।**
**ज्ञात्वा शास्त्रविधानोक्तं कर्म कर्तुमिहार्हसि ॥**

(गीता १६/२४)

"म्हणून तुझ्या बाबतीत काय करावयास हवे आणि काय करावयास नको याची व्यवस्था करण्यास शास्त्रच प्रमाण आहे; हे जाणून शास्त्राच्या विधीला अनुसरूनच तुला कर्मे करावयास हवीत."

**अन्यथा पातित्याशङ्कया ॥१३॥**

**१३- नाहीतर पतित होण्याची शक्यता असते.**

जो माणूस जाणून बुजून शास्त्रांच्या आज्ञेचे पालन न करता, शास्त्राला प्रतिकूल असे उच्छृंखल कार्य करतो, आणि त्याला प्रेम हे नाव देऊन, दोष-मुक्त होण्याची इच्छा करतो, तो मनुष्य निश्चितपणेच पतित होऊन जातो. भगवंताने स्वत:च सांगितले आहे -

**य: शास्त्रविधिमुत्सृज्य वर्तते कामकारत: ।**
**न स सिद्धिमवाप्नोति न सुखं न परां गतिम् ॥**

(गीता १६/२३)

"जो माणूस शास्त्राचा विधी सोडून, मनाला येईल तसा स्वेच्छाचार करतो, त्याला सिद्धी प्राप्त होत नाही, त्याला परमगती प्राप्त होत नाही, आणि त्याला सुखाची प्राप्ती होत नाही." जाणून बुजून शास्त्राने विहित केलेल्या कर्मांचा त्याग करणे हा प्रेमाचा आदर्श नव्हे, तर तो मोह आहे, तो म्हणजे उच्छृंखलता आणि स्वेच्छाचार आहे. असे करणारा पुरुष हा परिणामी आसुरी योनी, नरक, आणि दु:ख हेच प्राप्त करून घेतो.

**लोकोऽपि तावदेव किन्तु भोजनादिव्यापारस्त्वाशरीर-धारणावधि ॥१४॥**

**१४- लौकिक कर्मेसुद्धा तोपर्यंत (म्हणजे बाह्य ज्ञान असेल तोपर्यंत विधिपूर्वक करावयास हवीत.) परंतु जोपर्यंत शरीर आहे तोपर्यंत भोजन, इत्यादी कार्ये होतच राहतील.**

वैदिक कर्मांच्या बरोबरच लौकिक उदरनिर्वाह, गृहस्थाश्रमाचे पालन, इत्यादींसाठीची कार्येसुद्धा सावधपणे भगवंताला अनुकूल अशा प्रकारे करावयास हवीत. नंतर एक अशी स्थिती अवश्य येते की जिच्यामध्ये वैदिक व लौकिक कर्मे विनासायास सुटून जातात; परंतु ती स्थिती प्राप्त होईपर्यंत दोन्ही प्रकारची (म्हणजे वैदिक आणि लौकिक) कर्मे विधीला अनुसरूनच अवश्य करावयास हवीत. नंतर ती कर्मे आपोआपच सुटतील. तथापि आहार

इत्यादी कर्मे त्या अवस्थेतसुद्धा राहतील. कारण ती कर्मे शरीर टिकण्यासाठी आवश्यक आहेत. जरी प्रेमाच्या नशेत चूर असणारा भक्त हा आहार इत्यादीसाठी कशाचीही इच्छा करीत नाही, तसेच काही क्रियाही करीत नाही, तरी आहार इत्यादी प्राप्त झाल्यावर, सवयीनुसार अनायासे त्या भक्ताचे द्वारा आहार केला जातो. आणि तोसुद्धा निश्चितपणेच भगवंताचा प्रसादच बनतो.

* * *

# प्रेमरूप अशा भक्तीचे लक्षण आणि उदाहरण

तल्लक्षणानि वाच्यन्ते नानामत-भेदात् ॥१५॥

**१५- आता नाना मतांना अनुसरून त्या भक्तीची लक्षणे सांगतात.**

विभिन्न आचार्यांनी भक्तीचे स्वरूप भिन्न भिन्न स्वरूपात सांगितले आहे; प्रथम त्यांचे वर्णन करून मग देवर्षी नारद स्वत:चे मत दाखवून देऊ इच्छितात.

पूजादिष्वनुराग इति पाराशर्य : ॥१६॥

**१६ - पराशराचे पुत्र श्रीव्यासजी यांचे मतानुसार, भगवंताच्या पूजा, इत्यादीमध्ये अनुराग असणे म्हणजे भक्ती होय.**

आपल्या तन-मन-धनास भगवंताच्या पूजनाची सामग्री समजणे आणि परम श्रद्धेने विधीनुसार त्या तिन्हींच्या द्वारा भगवंताच्या प्रतिमेची किंवा विश्वरूप अशा भगवंताची पूजा करावयास हवी. भगवंताच्या पूजेमध्ये मन गुंतल्यामुळे संसारातील बंधनकारक अशा विषयांतून मन हे आपणहून स्वत:च परावृत्त होते. बाह्य आणि मानस अशा दोन्हीही प्रकारांनी भगवंताची पूजा व्हावयास हवी. भगवंताच्या पूजेने भगवंताचे परम पद प्राप्त होते–

श्रीविष्णोरर्चनं ये तु प्रकुर्वन्ति नरा भुवि ।
ते यान्ति शाश्वतं विष्णोरानन्दं परमं पदम् ॥

(विष्णुरहस्य)

"या पृथ्वीतलावर जे लोक भगवंताची पूजा करतात, ते सनातन व

आनंदमय अशा परम पदाप्रत पोचतात.''

**कथादिष्विति गर्ग: ॥१७॥**

**१७- श्रीगर्गाचार्य यांच्या मते, भगवंताची कथा, इत्यादींमध्ये अनुराग असणे हीच भक्ती आहे.**

श्रीभगवंताची दिव्य लीला, महिमा, त्याचे गुण आणि त्याच्या नामांचे कीर्तन तसेच श्रवण यांमध्ये मन लावणे ही गोष्ट नि:संदेहपणे भक्तीचे प्रधान लक्षण आहे. जगात अधिकांश माणसे तर अशी असतात की त्यांना भगवंत आणि भगवंताची कथा यांच्याशी काहीसुद्धा प्रयोजनच असत नाही. रात्रंदिवस विषयांच्या चर्चेमध्येच त्यांचे जीवन व्यतीत होत असते. ते तर कधीही भगवंताचे गुणगान करीत नाहीत, तसेच त्यांना भगवंताची चर्चा सुखकारक वाटत नाही.

अशा परिस्थितीमध्ये ज्या माणसांचे मन भगवंताचे गुणानुवाद ऐकणे आणि सांगणे यांमध्ये लागून राहाते, ते निश्चितपणेच भक्त होत. सूत्रकार आचार्य श्रीनारदांनी स्वत:च महर्षी वेद व्यास यांना सांगितले आहे-

**इदं हि पुंसस्तपस: श्रुतस्य वा**
**स्विष्टस्य सूक्तस्य च बुद्धिदत्तयो: ।**
**अविच्युतोऽर्थ: कविभिर्निरूपितो**
**यदुत्तमश्लोकगुणानुवर्णनम् ॥**

(श्रीमद्भागवत १/५/२२)

'विद्वानांनी असेच सांगितले आहे की भगवंताच्या गुणानुवादाचे कीर्तन हेच तप, वेदाध्ययन, चांगल्याप्रकारे केलेले यज्ञ, मंत्र, ज्ञान आणि दान इत्यादी सर्वांचे अविनाशी फळ आहे.'

म्हणूनच श्रीहरिकथेमध्ये यथार्थ अनुराग असणे ही भक्ति होय, आणि या भक्तीमुळे भगवंताची प्राप्ती निश्तिपणे होऊन जाते.

**आत्मरत्यविरोधेनेति शाण्डिल्य: ॥१८॥**

**१८- शांडिल्य ऋषींच्या मते आत्मरतीला विरोधी नसणाऱ्या विषयांमध्ये अनुराग असणे हीच भक्ती आहे.**

अखंडितपणे शुद्ध अशा आत्मस्वरूपामध्ये रत राहाणे हीच आत्मरती होय. या आत्मरतीमध्ये नित्य स्थित राहाणे, यालाच अव्यक्ताचे उपासक असणारे असे महानुभाव पुरुष भक्ती असे म्हणतात. श्रीशंकराचार्यांनी सांगितले आहे-

**मोक्षकारणसामग्र्यां भक्तिरेव गरीयसी ।**
**स्वस्वरूपानुसन्धानं भक्तिरित्यभिधीयते ।।**

आत्मा या स्वरूपात प्रत्येक प्राण्यामध्ये श्रीभगवंतच विराजमान आहे; म्हणून त्या सर्वात्मा अशा भगवंतामध्ये रती (आवड, प्रेम) असणे हीच वस्तुत: भगवंताची भक्तीच आहे, आणि अशी भक्ती करणाऱ्याला मुक्ती प्राप्त होते यात काहीही संदेह नाही.

**नारदस्तु तदर्पिताखिलाचारिता तद्विस्मरणे परम-व्याकुलतेति ।।१९।।**

**१९- परंतु देवर्षी नारदाच्या मते, आपली कर्मे भगवंताला अर्पण करणे आणि भगवंताचे थोडेसे जरी विस्मरण झाले तरी अतिशय व्याकुळ होणे म्हणजेच भक्ती होय.**

महर्षी व्यास, गर्ग आणि शांडिल्य यांनी सांगितलेल्या भक्तीच्या लक्षणांशी नारदजींचा कोणताही विरोध नाही. भगवंताची पूजा करणे, भगवंताचे गुणगान करणे आणि सर्वात्म-रूप अशा भगवंताचेवर प्रेम करणे, हे उचित आणि आवश्यक आहे. श्रीनारदांनीच व्यासांना तर भगवंताच्या गुणगानामध्ये लावले होते. म्हणून या लक्षणांचे खंडन करणे अथवा त्यांना तुच्छ लेखणे यासाठी नव्हे तर त्यांनाच आणखी पुष्ट करण्यासाठी या सर्व लक्षणांनी युक्त असे एक सर्वांगपूर्ण भक्तीचे लक्षण निर्दिष्ट करताना, नारदजी सांगतात की आपले सर्व कर्म (वैदिक आणि लौकिक) हे भगवंताचे ठिकाणी

अर्पण करून, प्रियतम भगवंताचे अखंड स्मरण करणे, आणि पळभरासाठीसुद्धा जर त्या भगवंताचे विस्मरण झाले (म्हणजे प्रियतम भगवंताचा विसर पडला ) तर अतिशय व्याकुळ होऊन जाणे, हीच सर्व लक्षणांनी युक्त अशी भक्ती आहे. या भक्तीमध्ये पूजा-कथा यांमध्ये अनुराग आणि विश्वात्मा अशा भगवंताचे ठिकाणी रती हे तर राहातच असतात. श्रीमद्‌भगवद्‌गीतेमध्ये सर्व प्रकारच्या योग्यांमध्ये, याच लक्षणांनी युक्त अशा भक्ति-योग्याला भगवंताने सर्वश्रेष्ठ असे म्हटले आहे-

**तपस्विभ्योऽधिको योगी ज्ञानिभ्योऽपि मतोऽधिकः ।**
**कर्मिभ्यश्चाधिको योगी तस्माद्योगी भवार्जुन ॥**
**योगिनामपि सर्वेषां मद्गतेनान्तरात्मना ।**
**श्रद्धावान् भजते यो मां स मे युक्ततमो मतः ॥**

(६/४६-४७)

"तपस्व्यांपेक्षा, शास्त्रज्ञानी पुरुषांपेक्षा, आणि सकाम कर्मे करणाऱ्या माणसांपेक्षासुद्धा योगी श्रेष्ठ आहे; म्हणून, हे अर्जुना, तू योगी बन. परंतु संपूर्ण योगी लोकांमध्ये सुद्धा तो भक्तियोगी माझ्या मते श्रेष्ठ आहे की जो माझ्या ठिकाणी श्रद्धायुक्त आहे, आणि जो आपल्या अंतरात्म्याला माझ्या ठिकाणी लावून निरंतर माझे भजन करतो.

भगवंताने पुन्हा आज्ञा केली आहे -

**तस्मात् सर्वेषु कालेषु मामनुस्मर युध्य च ।**
**मय्यर्पितमनोबुद्धिर्मामेवैष्यस्यसंशयम् ॥**

(गीता ८/७)

"म्हणून हे, अर्जुना, तू सर्व काळी (न थांबता) माझे स्मरण कर आणि (स्मरण करत असतानासुद्धा माझ्यासाठीच) युद्ध कर. अशा प्रकारे माझ्या ठिकाणीच मन आणि बुद्धी अर्पण करून, तू निःसंदेहपणे मलाच प्राप्त करून घेशील."

मान-अपमान, लाभ-हानी, जय-पराजय, सुख-दुःख इत्यादींची पर्वा न करता, आसक्ती आणि फळाची इच्छा सोडून, शरीर आणि संसार यांमध्ये स्वत:बद्दलची अहंता व ममता यांनी रहित होऊन, एकमेव परम, प्रियतम अशा श्रीभगवंतालाच आपला परम आश्रय, परम गती, परम सुहृद् मानून, अनन्य भावाने अत्यंत श्रद्धेसहित, प्रेमपूर्वक निरंतर अशा तेलाच्या धारेप्रमाणे, त्या भगवंताचे नाम, गुण, प्रभाव आणि स्वरूप यांचे चिंतन करीत, परमानंदात मग्न राहाणे आणि अशा प्रकारे चिंतन-परायण राहातच केवळ त्या परम प्रिय भगवंतासाठी, त्याची रुची आणि इच्छा यांना अनुसरून, त्याच्या प्राप्तीसाठी, त्यालाच सुख देण्यासाठी, दृढ आणि परम स्वार्थाने प्रेरित होऊन, सर्व प्रकारे, नि:स्वार्थ भावनेने, देहाची, वाचेची आणि मनाची समस्त कर्मे आचरणात आणणे म्हणजे भक्ती होय. जर कोणत्या तरी कारणाने क्षणभरासाठीसुद्धा त्याचे चिंतन व स्मरण सुटले तर पाण्यातून बाहेर काढलेल्या मासळीपेक्षाही अनंत पटीने अधिक व्याकुळतेचा अनुभव घेणे, हीच सर्वोच्च भक्ती होय.

या प्रकारे पूर्णपणे समर्पण करणारा असा प्रेमी भक्त हा त्रैलोक्याच्या राज्य-सुखाची तर गोष्ट सोडाच, तर अपुनरावृत्ति-स्वरूप अशा मोक्षासाठी सुद्धा कोणत्याही स्थितीमध्ये आपल्या प्रियतम भगवंताचे स्मरण सोडण्याची इच्छा करीत नाही. अशा भक्ताची प्रशंसा करताना भगवंत हे भक्त उद्धवाला सांगतात-

न तथा मे प्रियतम आत्मयोनिर्न शङ्करः ।
न च सङ्कर्षणो न श्रीर्नैवात्मा च यथा भवान् ॥
निरपेक्षं मुनिं शान्तं निर्वैरं समदर्शनम् ।
अनुव्रजाम्यहं नित्यं पूयेयेत्यङ्घ्रिरेणुभिः ॥
निष्किञ्चना मय्यनुरक्तचेतसः
शान्ता महान्तोऽखिलजीववत्सलाः ।

कामैरनालब्धधियो जुषन्ति यत्
तन्नैरपेक्ष्यं न विदुः सुखं मम ॥

(श्रीमद्भा. ११/१४/१५-१७)

"हे उद्धवा, अशा प्रकारचे तुम्ही भक्त जसे मला प्रिय आहात, तसे प्रिय ब्रह्मा, शंकर, बलराम, लक्ष्मी आणि आपला आत्मासुद्धा मला (प्रिय) नाही. अशा प्रकारचे, कोणत्याही वस्तूची इच्छा न बाळगणारे, शांत चित्त, निर्वैर, सर्वत्र सम-भावाने मला पाहाणारे आणि निरंतर माझे मनन करणारे असे जे प्रेमी भक्त असतात, त्यांच्या चरण-धूळीने स्वत:ला पवित्र करण्यासाठी मी सदा सर्वदा त्यांच्या मागे मागे फिरत असतो. माझ्या ठिकाणी आपले चित्त अनुरक्त करून राहाणारे, मला सर्वस्व अर्पण करून अकिंचन बनलेले असे शांत, आणि माझ्या नात्यामुळे सर्व जीवांचेवर स्नेह करणारे, तसेच सर्व प्रकारच्या कामनांनी रहित असे हृदय असणारे महात्मे भक्त ज्या परम सुखाचा अनुभव घेतात, तो निरपेक्ष परमानंद दुसऱ्या लोकांना कळतच नाही." बस्स, श्रीनारदांच्या मतानुसार हीच भक्ती आहे. असा भक्त आपले सर्व आचरण श्री- भगवंताला अर्पण करून, अखंडितपणाने भगवंताचे स्मरण करीत राहातो आणि कधी थोडे जरी विस्मरण झाले तर तो अतिशय व्याकुळ होऊन जातो.

**अस्त्येवमेवम् ॥२०॥**

**२०- ठीक असेच आहे.**

मागील सूत्रात सांगितलेल्या सिद्धांताचे दृढीकरण करण्यास देवर्षी नारद सांगतात की वस्तुत: भक्तीचे हेच स्वरूप आहे.

**यथा व्रजगोपिकानाम् ॥२१॥**

**२१- जशी व्रजगोपिकांची (भक्ती)**

भक्तीचे लक्षण सांगून झाल्यावर, आता देवर्षी नारद हे उदाहरण म्हणून प्रेमिकांच्या शिरोमणी, प्रात:स्मरणीय, अशा श्रीगोपिकांचे नाव घेत आहेत. खरे तर गोपींचा असाच महिमा आहे. जगात असा कोण आहे की जो गोपींच्या

प्रेमाच्या तत्त्वाचे वर्णन करू शकेल ? त्यांचे तन, मन, धन, लोक, परलोक हे सर्व श्रीकृष्णाला अर्पण केलेले होते. त्या रात्रंदिवस श्रीकृष्णाचेच चिंतन करीत, गद्‌गद वाणीने सतत श्रीकृष्णाचेच गुणगान करीत, आणि सर्वत्र सदा श्रीकृष्णालाच पाहात असत. स्वत: भगवान् श्रीकृष्णाने त्यांना सांगितले आहे-

न पारयेऽहं निरवद्यसंयुजां
स्वसाधुकृत्यं विबुधायुषापि व: ।
या माभजन् दुर्जरगेहशृङ्खला:
संवृश्च्य तद्व: प्रतियातु साधुना ॥

(श्रीमद्भा० १०/३२/२२)

"हे गोपिकांनो, माझ्यासाठी तुम्ही गृहस्थाश्रमाच्या कठीण बेड्या तोडून माझे भजन केले आहे. तुमचे हे कार्य संपूर्णपणे निर्दोष आहे. देवतांचे आयुष्य असेपर्यंतसुद्धा मी तुमच्या या उपकारांची परतफेड करू शकत नाही. आपल्या उदाहरणानेच तुम्ही मला तुमच्या ऋणातून मुक्त करावे."

उद्धवाजवळ गोपिकांच्यासाठी संदेश देऊन पाठविते वेळी उद्धवाला भगवान् श्रीकृष्णाने प्रेमाश्रू ढाळीत गद्‌गद वाणीने सांगितले होते-

ता मन्मनस्का मत्प्राणा मदर्थे त्यक्तदैहिका: ।
ये त्यक्तलोकधर्माश्च मदर्थे तान् बिभर्म्यहम् ॥
मयि ता: प्रेयसां प्रेष्ठे दूरस्थे गोकुलस्त्रिय: ।
स्मरन्त्योऽङ्ग विमुह्यन्ति विरहौत्कण्ठ्यविह्वला: ॥
धारयन्त्यतिकृच्छ्रेण प्राय: प्राणान् कथञ्चन ।
प्रत्यागमनसन्देशैर्बल्लव्यो मे मदात्मिका: ॥

(श्रीमद्भा० १०/४६/४-६)

"हे उद्धवा, गोपींनी आपले मन मला समर्पण करून टाकले आहे; मीच त्यांचा प्राण आहे; माझ्यासाठी त्यांनी आपल्या देहाचे सारे व्यवहार सोडून दिले आहेत. जे लोक माझ्यासाठी सर्व लौकिक धर्म सोडून देतात,

त्यांना मी सुख देतो. त्या गोपी मला प्रियापेक्षा अति प्रिय समजतात. मी दूर राहात असताना, माझे स्मरण करून त्या दारुण अशा विरहाच्या वेदनेने व्याकुळ होऊन, आपल्या देहाची शुद्ध विसरून जातात. माझ्याशिवाय त्या फारच कष्टाने कसेतरी प्राण धारण करून आहेत; मी पुन: ब्रजभूमीकडे येईन या निरोपाच्या भरंवशावर त्या जगत आहेत. मी त्या गोपींचा आत्मा आहे आणि त्या माझा आत्मा आहेत."

ब्रजभूमीमध्ये जाऊन उद्धवाने जेव्हा प्रेममय अशा त्या गोपींची दशा पाहिली, आणि जेव्हा त्याला दिसले की त्या गोपी सर्व बाजूंनी, आत-बाहेर त्या श्रीकृष्णाचे दर्शन घेत आहेत, आणि जेव्हा त्याने त्यांच्या मुखांतून ऐकले-

**ऊधौ, जोग जोग हम नाहीं ।**

गोपी म्हणाल्या, "हे उद्धवजी, त्या माणसांचे कडे जाऊन त्यांना योग शिकवा की जेथे श्यामसुंदर कृष्णाचा वियोग आहे. येथे तर पाहा, सदाच संयोग आहे. आमचा लाडका कृष्ण सदा सर्वदा आमच्या बरोबरच राहात आहे." तेव्हा उद्धवाचे डोळे उघडले, आणि तो गोपींच्या शुद्ध प्रेमाच्या प्रवाहाच्या प्रवाहात वाहून गेला. त्या उद्धवाने भक्तीने प्रणत अशा चित्ताने म्हटले-

**एता: परं तनुभृतो भुवि गोपवध्वो**
**गोविंद एव निखिलात्मनि रूढभावा: ।**
**वाञ्छन्ति यद्भवभियो मुनयो वयं च**
**किं ब्रह्मजन्मभिरनन्तकथारसस्य ॥**
**नायं श्रियोऽङ्ग उ नितान्तरते: प्रसाद:**
**स्वर्योषितां नलिनगन्धरुचां कुतोऽन्या: ।**
**रासोत्सवेऽस्य भुजदण्डगृहीतकण्ठ-**
**लब्धाशिषां य उदगाद् ब्रजवल्लवीनाम् ॥**
**आसामहो चरणेणुजुषामहं स्यां**

वृंदावने किमपि गुल्मलतौषधीनाम् ।
या दुस्त्यजं स्वजनमार्यपथं च हित्वा
भेजुर्मुकुन्दपदवीं श्रुतिभिर्विमृग्याम् ।।

(श्रीद्भा- १०/४७/५८, ६०-६१)

"जगामध्ये या गोपाल स्त्रियांचेच देह धारण करणे हे सफल होय. कारण भवाच्या भयाने भ्यालेले मुनि- समूह तसेच आम्ही सर्व लोकही ज्या गोविंदाची इच्छा धरतो, अशा त्या विश्वात्म्या भगवान् श्रीगोविंदाचे ठिकाणी या गोपींचे चित्त लागलेले आहे. हे खरे आहे की श्रीअनंत कृष्णाच्या लीला-कथांचे जे रसिक आहेत त्यांना ब्राह्मणांच्या तीन जन्मांची (= जन्म, यज्ञोपवीत, आणि यज्ञदीक्षा यांची) काय आवश्यकता आहे ? रासक्रीडेच्या वेळी, भगवान् श्रीहरीच्या भुजदंडाला आपल्या कंठातील हार बनवून, पूर्णकाम झालेल्या या व्रजबालांना श्रीहरीचा जो प्रसाद प्राप्त झालेला आहे, तसा प्रसाद हा, श्रीहरीच्या हृदयात सतत राहाणारी श्रीलक्ष्मी आणि कमलाप्रमाणे कांती आणि सुगंध यांनी युक्त अशा सुरसुंदरी यांनासुद्धा मिळाला नाही; मग इतरांची गोष्ट ती काय ? मोठ्या कष्टाने सोडले जाऊ शकणारे असे बंधू व आर्यधर्म यांचा त्याग करून, वेद जिचा शोध करतात, अशा त्या मुकुंद-पदवीचे अनुसरण या महाभाग अशा गोपींनी केलेले आहे. अहो ! जर मी पुढील जन्मी या वृंदावनातील लता, औषधी किंवा झुडूप असे काहीतरी व्हावे की, ज्यांचेवर या गोपींची चरण धूळ पडली आहे, तर किती उत्तम होईल."

गोपींची दशा वर्णन करून, त्यांचे जीवन धन्य आहे असे सांगत असताना, मथुरेतील कुलीन स्त्रियांनी म्हटले आहे-

या दोहनेऽवहनने मथनोपलेप-
प्रेङ्खेङ्खनार्भरुदितोक्षणमार्जनादौ ।
गायन्ति चैवमनुरक्तधियोऽश्रुकण्ठ्यो
धन्या व्रजस्त्रिय उरुक्रमचित्तयानाः ।।

(श्रीमद्भा- १०/४४)

" गाईंचे दूध काढते वेळी, धान्य इत्यादी कुटण्याच्या वेळी, दही घुसळण्याच्या समयी, अंगणात सडा घालण्याचे वेळी, बालकांना झोका देण्याचे समयी, रडणाऱ्या मुलांचे साठी अंगाई- गीत गाण्याच्या काळी, घरामध्ये शिंपण करताना तसेच केर काढताना, ज्या गोपी प्रेमपूर्ण चित्ताने, डोळे अश्रूंनी भरले असताना, गद्‌गदवाणीने, श्रीकृष्णाचे गुणगान करण्याची क्रिया करतात, त्या श्रीकृष्णाचे ठायी चित्त प्रविष्ट करणाऱ्या त्या गोप-रमणी धन्य धन्य होत."

या गोपींचा महिमा जितका गावा तितकासुद्धा थोडाच आहे. सर्व-त्यागी अशा व्रजवासी भक्तांनी तर गोपींच्या चरणकमलांचे परागच होण्याची इच्छा केली आहे.

हे जे सांगितले गेले आहे ते सत्यच आहे-

**गोपी प्रेम की धुजा ।**

**जिन घनश्याम किये बस अपने उर धरि स्यामभुजा ॥**

"ज्यांनी घनश्याम कृष्णाला वश केले आहे आणि ज्यांनी कृष्णाच्या भुजा आपल्या वक्ष:स्थळी धरल्या आहेत, त्या गोपी या प्रेमाची ध्वजा होत."

महाप्रभु श्रीचैतन्यदेव यासारख्या महान् त्यागी पुरुषांनी तर गोपींना प्रेममार्गाचा गुरू मानले आहे.

जेव्हा साधक हा विषयांमध्ये परम वैराग्य धारण करून, प्रेम-मार्गावर काहीसा पुढे जातो तेव्हाच त्याला गोपींचा महिमा थोडासा समजू लागतो.

**तत्रापि न माहात्म्य-ज्ञान-विस्मृत्यपवाद: ॥२२॥**

**२२- या अवस्थेमध्येसुद्धा (गोपींच्या ठिकाणी) माहात्म्य ज्ञानाच्या विस्मृतीचा अपवाद नाही.**

म्हणजे भगवान श्रीकृष्णाचा प्रभाव, रहस्य आणि गुण हे गोपी जाणत होत्याच. काही लोकांचे म्हणणे असे आहे की प्रेमामध्ये माहात्म्याचे ज्ञान राहात नाही. माहात्म्याचे ज्ञान असेल, तर प्रेम असणार नाही. परंतु गोपींच्या

बाबतीत असे नव्हते. श्रीकृष्ण हा साक्षात् पुरुषोत्तम भगवान् आहे, हे जाणत असूनसुद्धा तो कृष्ण आपला प्रियतम आहे, असे त्या गोपी समजत होत्या. लौकिक प्रेम आणि भगवंतावरील प्रेम यांमध्ये हाच विशिष्ट असा फरक आहे. भगवंतावरील प्रेमामध्ये वस्तुत: असेच होते. जे लोक म्हणतात की गोपी या श्रीकृष्णाला भगवान् म्हणून जाणत नव्हत्या, त्या लोकांनी श्रीमद् भागवतातील पुढे दिलेल्या श्लोकांचे मनन करावे .

मैवं विभोऽर्हति भगवान् गदितुं नृशंसं
संत्यज्य सर्वविषयांस्तव पादमूलम् ।
भक्ता भजस्व दुरवग्रह मा त्यजास्मान्
देवो यथाऽऽदिपुरुषो भजते मुमुक्षून् ॥
यत्पत्यपत्यसुहृदामनुवृत्तिरङ्ग
स्त्रीणां स्वधर्म इति धर्मविदा त्वयोक्तम् ।
अस्त्वेवमेतदुपदेशपदे त्वयीशे
प्रेष्ठो भवांस्तनुभृतां किल बन्धुरात्मा ॥
यर्ह्यम्बुजाक्ष तव पादतलं रमाया
दत्तक्षणं क्वचिदरण्यजनप्रियस्य ।
अस्प्राक्ष्म तत्प्रभृति नान्यसमक्षमङ्ग
स्थातुं त्वयाभिरमिता बत पारयाम: ॥
श्रीर्यत्पदाम्बुजरजश्चकमे तुलस्या
लब्ध्वापि वक्षसि पदं किल भृत्यजुष्टम् ।
यस्या: स्ववीक्षणकृतेऽन्यसुरप्रयास-
स्तद्वद् वयं च तव पादरज: प्रपन्ना: ॥
(१०/२९/३१-३२, ३६-३७)

व्यक्तं भवान् व्रजभयार्तिहरोऽभिजातो
देवो यथाऽदिपुरुष: सुरलोकगोप्ता ।
(१०/२९/४१)

न खलु गोपिकानन्दनो भवा-
नखिलदेहिनामन्तरात्मदृक् ।
विखनसार्थितो विश्वगुप्तये
सख उदेयिवान् सात्वतां कुले ॥
(१०/३१/४)

"हे विभो, आपण असे कठोर शब्द (परत जाण्याची गोष्ट) आम्हाला सांगू नये. इतर सर्व विषय टाकून देऊन, आम्ही एकमेव आपल्याच चरण-कमलांचा आश्रय घेतला आहे. हे स्वच्छंदा, ज्या प्रकारे आदिपुरुष श्रीनारायण मुमुक्षूंना भजतात (म्हणजे त्यांच्याच इच्छेनुसार त्यांचा स्वीकार करतात), त्याच प्रकारे आपण आमचा अंगीकार करावा, त्याग करू नये. हे हरी, आपण धर्म जाणणारे आहात ( तर मग आम्हाला असे कसे म्हणता की तुम्ही परत जा; आपल्याला शरण आल्यावरसुद्धा कोणी परत कधी जातो काय ? ) आपण जे सांगितले की पती, पुत्र, आणि बंधु-बांधव यांची सेवा करणे हाच स्त्रियांचा श्रेष्ठ धर्म आहे, तो हा उपदेश उपदेशाचे स्थान असणाऱ्या अशा आपल्या- ईश्वराच्या- विषयांमध्येच राहू दे ; कारण सर्व देहधारी प्राण्यांचा प्रियतम बंधू आणि आत्मा तर आपणच आहात. हे कमललोचना, ज्यावेळी (श्रीविष्णूच्या रूपात ) श्रीलक्ष्मीला कधी कधी आनंदित करणाऱ्या अशा आपल्या चरण कमलांना आम्ही स्पर्श केला होता आणि वनात राहाणाऱ्या तपस्व्यांना प्रिय असणाऱ्या अशा तुम्ही आम्हाला आनंदित केले होते, तेव्हापासून आमच्या बाबतीत इतरत्र कुठे तरी राहाणे, हे असंभवनीय होऊन गेले आहे. ज्यांची कृपादृष्टी प्राप्त करून घेण्यासाठी देवगण हे अतिशय प्रयास करतात, ते आपले चरण-रज, कोणत्याही प्रतिस्पर्ध्यांविना आपल्या वक्ष:स्थळावर स्थान प्राप्त करून घेऊनसुद्धा जी लक्ष्मी तुलसीसह अन्य भक्ताकडून सेविले गेलेल्या आपल्या चरण-रजाची इच्छा करते, त्याच आपल्या चरणरजांनाच आम्ही सुद्धा शरण आलो आहोत. कारण देवतांचे

रक्षण करणारे आपणच -आदिपुरुष परमात्माच- व्रजमंडळाचे भय आणि दुःख दूर करण्यासाठी प्रगट होऊन अवतीर्ण झाला आहात. आपण केवळ यशोदेचेच पुत्र नाही, तर समस्त देहधारी प्राण्यांच्या अंतरात्म्याचे साक्षी आहात हे निश्चित. हे सखे, ब्रह्मदेवाच्या प्रार्थनेमुळेच आपण संपूर्ण जगाचे रक्षण करण्यासाठी यदुकुळात अवतार घेतला आहे."

अशा अनेक प्रमाणांनी तसेच युक्तिवादांनी हे सर्व प्रकारे सिद्ध होते की श्रीकृष्णाला साक्षात सच्चिदानंदघन भगवान् मानूनच गोपींनी त्याला आत्मसमर्पण केले होते.

**तद्विहीनं जाराणामिव ॥२३॥**

**२३- त्याच्या विना (भगवंताला भगवंत म्हणून जाणल्या-शिवाय केले जाणारे प्रेम हे) जारांच्या (प्रेमा) समान होते.**

(भगवंताच्या) माहात्म्याचे ज्ञान नसताना, स्त्रियांचे द्वारा कोणत्या तरी पुरुषाच्या बाबतीत केले जाणारे प्रेम हे जारांच्या प्रेमाप्रमाणे असते. ज्या प्रेमामध्ये सर्वस्वाचे अर्पण आहे, ज्या प्रेमात लौकिक स्वार्थाचा थोडासुद्धा गंधही नाही, असे प्रेम केवळ भगवंताचे बाबतीतच होऊ शकते. जरी जाणतेपणी किंवा अजाणतेपणी कोणत्याही प्रकारे भगवंतावर केले जाणारे प्रेम हे निष्फळ होत नाही, तरी भगवंताला जाणून होणाऱ्या प्रेमात वैशिष्ट्य असते. भगवंत आपला प्रियतम आहे, या कल्पनेतच किती अपार आनंद आहे. तर मग ज्यांना तो भगवंत परम प्रियतम अशा स्वरूपात प्राप्त झालेला आहे, त्यांच्या सुखाच्या संदर्भात सांगायचे ते काय ? या परम पवित्र दिव्य सुखाचा भोग घेणाऱ्या गोपी होत्या. याच कारणाने जीवन्मुक्त अशा महात्म्या शुकदेव मुनींने मृत्यूसाठी तयार झालेल्या राजा परीक्षिताला ही गोपींची पवित्र प्रेमलीला ऐकवली होती. म्हणूनच हे प्रेम भगवंताच्या माहात्म्याच्या ज्ञानाने युक्त व परम पवित्र असे होते.

**नास्त्येव तस्मिंस्तत्सुखसुखित्वम् ॥ २४॥**

२४- त्या (जारा) च्या प्रेमामध्ये प्रियतमाच्या सुखाने सुखी होणे (ही गोष्ट) नसते.

व्यभिचारी माणसे कामाला वश होऊन, केवळ आपल्या सुखासाठी, आपल्या इंद्रियांच्या तृप्तीसाठी प्रीती करीत असतात; आपल्या प्रेमास्पदाच्या सुखाने ती व्यभिचारी माणसे सुखी होत नाहीत. गोपींच्या प्रेमामध्ये हा भाव नव्हता. जगातील काम-जनित प्रीतीमध्ये प्रेमास्पद पुरुष हा जार असतो, आणि त्याच्या अंगसंगाची इच्छा स्त्रियांना होते. पण येथे प्रेमास्पद हा साक्षात् विश्वात्मा भगवंत होता, आणि गोपींच्या मनामध्ये अंग-संगाची इच्छा नव्हती. गोपी या केवळ श्रीकृष्णाच्या सुखाची इच्छा करणाऱ्या होत्या. त्यांनी आपले तन, मन, बुद्धी, रूप, यौवन, धन, प्राण, इत्यादी सर्व वस्तूंना प्रियतम अशा श्रीकृष्णाची पूजन-सामग्री बनविलेले होते. आपले सर्वस्व देऊन, श्रीकृष्णाला सुख देण्याची त्या इच्छा करीत होत्या. ज्या गोष्टींत श्रीकृष्णाला प्रसन्नता वाटे त्या गोष्टीच करणे हा त्यांचा धर्म होता. त्यामध्ये त्यांना श्रेष्ठ सुखाची अनुभूती येत होती. याखेरीज त्यांच्या मनामध्ये अन्य प्रकाराने होणाऱ्या सुखाची इच्छा तर दूर राहू दे, त्याची कल्पनासुद्धा नव्हती. हेच तर काम आणि प्रेम यांमधील अंतर आहे. कामाची अपेक्षा असते की दुसऱ्याचे मार्फत आपण सुखी व्हावे, आणि प्रेमाची अपेक्षा असते की आपल्या मार्फत प्रियतमाला सुखी करणे, आणि तो सुखी आहे हे पाहूनच स्वत: सुखी होणे.

भगवान श्रीकृष्णाला सर्वस्वाचे समर्पण, पळभरसुद्धा त्याचे विस्मरण झाले तर अतिशय व्याकुळता, श्रीकृष्णाचा प्रभाव आणि माहात्म्य यांचे सम्यक् ज्ञान आणि श्रीकृष्णाच्या सुखातच आपण स्वत: सुखी होणे , या चार गोष्टी गोपींच्या प्रेमात मुख्य आहेत.

हे गोपींचे प्रेम परम पवित्र आणि अलौकिक आहे. याच्यामध्ये ज्या कुणास पाप किंवा व्यभिचार वाटतो त्यांच्यावर श्रीकृष्ण दया करो.

* * *

# प्रेमरूप असणारी भक्ती ही फलरूप आहे

सा तु कर्म-ज्ञान-योगेभ्योऽप्यधिकतरा ॥२५॥

२५- ती (प्रेमरूप भक्ती ही) तर कर्म, ज्ञान, आणि योग यांचे पेक्षा अधिक श्रेष्ठ आहे.

कर्म, ज्ञान आणि योग हे तिघेही भगवंताच्या प्राप्तीचे साधन आहेत; परंतु या तिन्हीमध्ये भक्ती सर्वापेक्षा श्रेष्ठ आहे. त्या (तिन्ही) मध्ये वर्ण, आश्रम, अधिकार इत्यादींचा विचार केलेला असतो, त्याच्या बरोबरच त्यांमध्ये पतन होण्याचे भयसुद्धा असते. पण खऱ्या भक्तीमध्ये भगवंताचे पुरे साहाय्य असते, या कारणाने कोणतेही भय नसते. तसेच या भक्तीमध्ये स्त्री, पुरुष, ब्राह्मण, शूद्र, इत्यादी सर्वांचा अधिकार असतो. गोस्वामी तुलसीदासजी महाराज म्हणतात -

जे असि भगति जानि परिहरहीं। केवल ग्यान हेतु श्रम करहीं ॥
ते जड कामधेनु गृहँ त्यागी । खोजत आकु फिरहिं पय लागी ॥
सुनु खगेस हरि भगति बिहाई। जे सुख चाहहिं आन उपाई ॥
ते सठ महासिंधु बिनु तरनी। पैरि पार चाहहिं जड करनी ॥

उमा जोग जप दान तप नाना मख ब्रत नेम ।
राम कृपा नहिं करहिं तसि जसि निष्केवल प्रेम ॥
पन्नगारि सुनु प्रेम सम भजन न दूसर आन ।
यह बिचारि मुनि पुनि पुनि करत राम गुन गान ॥

(जे लोक अशी ही भक्ती जाणूनही तिचा त्याग करतात, आणि फक्त ज्ञानासाठी श्रम करतात, ते मूर्ख घरातली कामधेनू सोडून दुधासाठी रुईचे झाड शोधत असतात. हे गरुडा, ऐक. जे लोक हरीची भक्ती सोडून इतर

भजन नाही. असा विचार करून मुनिजन हे पुन: पुन्हा रामाच्या गुणांचे गान करतात.)

स्वत: भगवान सांगतात-

**न साधयति मां योगो न सांख्यं धर्म उद्धव ।**
**न स्वाध्यायस्तपस्त्यागो यथा भक्तिर्ममोर्जिता ॥**
**भक्त्याहमेकया ग्राह्य: श्रद्धयात्मा प्रिय: सताम् ।**
**भक्ति: पुनाति मन्निष्ठा श्वपाकानपि सम्भवात् ॥**

(श्रीमद्भा. ११/२०-२१)

'ज्याप्रमाणे माझी दृढ भक्ती मला वश करून घेते त्याप्रमाणे योग, ज्ञान, धर्म, स्वाध्याय, तप आणि त्याग हे मला वश करून घेऊ शकत नाहीत. संतांना प्रिय असा आत्मरूपी मी केवळ श्रद्धायुक्त भक्तीच्या द्वारा वश होऊ शकतो. माझी भक्ती चांडाल इत्यादींनासुद्धा पवित्र हृदय असणारे असे बनविण्यास समर्थ आहे.'

याच प्रमाणे श्रीभगवानाने गीतेमध्येसुद्धा सांगितले आहे-

**नाहं वेदैर्न तपसा न दानेन न चेज्यया ।**
**शक्य एवंविधो द्रष्टुं दृष्टवानसि मां यथा ॥**
**भक्त्या त्वनन्यया शक्य अहमेवंविधोऽर्जुन ।**
**ज्ञातुं द्रष्टुं च तत्त्वेन प्रवेष्टुं च परंतप ॥**

(११/५३-५४)

'हे अर्जुना, तू मला जसे पाहिलेस, तसे वेद, तप, ज्ञान, यज्ञ इत्यादींच्या द्वारासुद्धा मी (लोकांच्या) दृष्टीस पडत नाही. हे परंतप अर्जुना, अनन्य अशा भक्तीच्या द्वारानेच मी अशा प्रकारे पाहिला जाणे, मी तत्त्वत: जाणला जाणे, आणि माझ्या ठिकाणी प्रवेश प्राप्त होणे, या (तीन गोष्टी) संभवनीय आहेत.'

**फलरूपत्वात् ॥२६॥**

**२६- कारण (ती भक्ती) फल- स्वरूप आहे.**

वस्तुत: ही भक्ती फलरूप आहे, ती साधन नव्हे. जी भक्ती ज्ञानाचे साधन मानली जाते, ती गौणी भक्ती ही सामान्य उपासना आहे; (ती) प्रेमरूप भक्ती नव्हे. प्रेमरूप भक्ती ही तर सर्व साधनांचे फल आहे.

**ईश्वरस्याप्यभिमानद्वेषित्वाद् दैन्यप्रियत्वाच्च ॥२७॥**

**२७- अभिमानाच्या बाबतीत ईश्वराचासुद्धा द्वेषभाव असतो, आणि दैन्याच्या बाबतीत प्रिय भाव असतो.**

कर्म, ज्ञान आणि योग यांच्या साधनेत असणाऱ्या साधक लोकांना आपल्या बळाचा आणि साधनेचा अभिमान होऊ शकतो. याउलट भगवंताचे नाम तर दर्पहरण करणारेच असते. वस्तुत: भगवान कुणाचाही द्वेष करीत नाही आणि कुणावर प्रेमसुद्धा करीत नाही. त्याच्या दृष्टीने सगळे सारखेच आहेत. तो सर्वांचा उद्धार करतो. होय, उद्धाराची साधने (मात्र) भिन्न भिन्न असतात. (उदा.) अभिमानी माणसाचा उद्धार भगवंत त्याला शिक्षा देऊन करतो. आणि दीन सेवकाचा उद्धार प्रेमाने त्याच्या गळ्याला मिठी मारून करतो. यामुळेच भगवंताचा क्रोध हा वरासारखा आहे, असे म्हटले गेले आहे. अभिमानी माणसाच्या बाबतीत भगवंत हे द्वेष करणाऱ्यासारखी लीला करतात आणि दीन माणसाबरोबर प्रेमी माणसाप्रमाणे लीला करतात. यामुळेच दीनांचा बंधू, अशरणांचा शरण, आणि "कंगालाचे धन" इत्यादी त्या भगवंताची नावे आहेत. खरे सांगायचे तर अभिमानी मनुष्याच्या बाबतीतसुद्धा त्या भगवंताच्या हृदयात प्रेमच असते; म्हणूनच तर तो भगवंत त्याचा अभिमान नष्ट करतो.

इतके झाले तरीसुद्धा शिक्षा करण्यामध्ये भगवंताचा द्वेष दिसतच असतो; तथापि दीन, अभिमानरहित गरीबाला तर तो भगवान आपल्या हृदयाशी धरून ठेवतो. त्याचे क्षुद्र काम करताना सुद्धा तो संकोच करीत नाही.

भक्तजन तर स्वाभाविकपणेच स्वतःला भगवंताचे सेवक समजतात. ते म्हणतात-

**सर्वसाधनहीनस्य पराधीनस्य सर्वथा ।**
**पापपीनस्य दीनस्य कृष्ण एव गतिर्मम ॥**

'हे प्रभो, सर्व साधनाने रहित, सर्वस्वी मायेच्या हाती पराधीन असणाऱ्या, पापाने भरलेल्या, आणि दीन अशा मला तर केवळ तूच गती आहेस.'

ज्या स्थितीत माणसे धन, मान, वैभव इत्यादींच्या अभावाने ग्रस्त होऊन, त्यांच्या प्राप्तीसाठी व्याकुळ होतात, त्या स्थितीच्या अभावाचे नाव दैन्य नाही; तर हे दैन्य म्हणजे ती निरभिमान स्थिती व अहंकारशून्य स्थिती यांचे नाव आहे; ते मोठ्यात मोठ्या, वैभवशाली, सम्राटालासुद्धा भगवंताच्या कृपेनेच प्राप्त होऊ शकते. या दैन्याचा अर्थ आहे अभिमान आणि कर्तृत्वाचा अहंकार यांचा नाश होऊन जाणे. दैन्य म्हणजे असे समजणे की मी आणि माझे असे काहीही नाही. जे काही आहे ते सर्व भगवानच आहे, आणि सर्व काही भगवंताचे आहे, सर्व काही त्या भगवंताची शक्ती आणि प्रेरणा यांच्यामुळे होते, करणारा व करवणारा तो भगवंतच आहे.

परंतु भगवंताला प्रिय असणारी ही खरी दीनता ही सहजपणे प्राप्त होत नाही. अभिमानाचे संपूर्ण भूत उतरल्याशिवाय दीनता येत नाही. वर्ण, जाती, धन, मान, विद्या, साधन, स्वास्थ्य इत्यादींचा अभिमान आणि कर्तेपणाचा अहंकार हे माणसामध्ये अशी दीनता उत्पन्न होऊ देत नाहीत. वर वर मनुष्य दंभपूर्वक दीन बनतो, भगवंताच्या पुढे स्वतःला दीन म्हणतो, रडण्याचे सोंग करतो, परंतु त्याच्या दीनतेची परीक्षा जेव्हा मोठ्यात मोठे सांसारिक पदार्थ आणि साधने यांची प्राप्ती झाल्यावर स्वाभाविक दीनता जशीच्या तशी राहाते, तेव्हाच होते. सर्व लोकांच्या समोर, आपल्यापेक्षा हीन स्थितीत असणाऱ्या दुसऱ्या माणसांच्या द्वारा दीन आणि पापी म्हटले

जाणे, हे जो माणूस केवळ सहन करून घेत नाही, तर उलट ते सत्य समजून तो प्रसन्न होतो, आणि प्रभूच्या प्राप्तीसाठी नेहमीच ज्याचे चित्त खिन्न राहात असते, असलेच खिन्न-दीन पुरुष भगवंताला प्रिय होतात. खऱ्या भक्तीमध्ये आपला पुरुषार्थ आणि साधनाचा अभिमान हे येऊच शकत नाहीत. म्हणून भक्ती ही श्रेष्ठ होय.

**तस्या ज्ञानमेव साधनमित्येके ॥२८॥**

**२८- त्या (भक्ती) चे साधन ज्ञानच आहे, असे काही (आचार्यांचे) चे मत आहे.**

भक्तीमध्ये या अशा ज्ञानाची तर अत्यंत आवश्यकता आहे की मी ज्याची भक्ती करीत आहे, तोच सर्वांचा स्वामी, सर्वांचा आधार, सर्वांत श्रेष्ठ ईश्वर, जगाची उत्पत्ति-पालन आणि संहार करणारा, मायेचा पती, अज, अविनाशी, सर्व शक्तिमान, सर्वज्ञ, सर्वात्मा, निर्गुण, निर्विकार, निराकार, सगुण, साकार भगवान आहे आणि त्याच्यापेक्षा श्रेष्ठ आणखी काहीही नाही (असे ज्ञान आवश्यक आहे); कारण इतके ज्ञानसुद्धा जर नसेल, तर श्रद्धा निर्माणच होणार नाही; श्रद्धेशिवाय प्रीती उत्पन्न होणार नाही आणि प्रीतीशिवाय भक्ती दृढ होणार नाही.

परंतु यामध्ये अद्वैत ज्ञानाच्या साधनाची आवश्यकता असत नाही. केवळ श्रद्धा आणि भाव यांमुळेच परमात्म्याची भक्ती प्राप्त होते. गृध्रराज, गजेंद्र, ध्रुव, शबरी इत्यादींनी भगवंताच्या केवळ अशाच भक्तीने भगवंताला प्राप्त करून घेतले होते.

**अन्योन्याश्रयत्वमित्यन्ये ॥२९॥**

**२९- दुसऱ्या (आचार्यां) चे असे मत आहे की भक्ती आणि ज्ञान हे परस्पर - एक दुसऱ्यावर - अवलंबून आहेत.**

असेही असते. गौणी भक्तीमुळे भगवंताच्या तत्त्वाचे ज्ञान होते, आणि ते तत्त्व जाणल्यामुळे भगवंताचे ठिकाणी अत्यंत प्रेम उत्पन्न होते. परंतु केवळ

भक्तीवर प्रेम करणारे लोक या मताची पर्वा करीत नाहीत. कारण ते ही गोष्ट जाणतात की जेव्हा निर्मल प्रेमस्वरूप अशा भक्तीचा पूर्ण उदय होतो, तेव्हा कशाचेही ज्ञान हे स्वतंत्र राहातच नाही. प्रेमी आणि प्रेमास्पद हे दोघे एक होऊन जातात. मग कुणाचे ज्ञान कुणाला होणार ?

**स्वयं फलरूपतेति ब्रह्मकुमारा: * ॥३०॥**

**३०- ब्रह्मकुमारांच्या (म्हणजे सनत्कुमार इत्यादी आणि नारद यांच्या) मतानुसार भक्ती ही स्वत:च फलरूप आहे.**

म्हणूनच ही भक्ती साधनही आहे आणि भक्तीचे साध्यही आहे. मूळही तीच आणि फळही तीच. भक्तगण हे भक्तीसाठीच भक्ती करतात; कारण भक्ती ही स्वत: फलरूप आहे, ती कोणत्याही साधनाने मिळत नाही आणि तिच्यापेक्षा कोणतीही अधिक श्रेष्ठ वस्तूही नाही की तिच्या प्राप्तीसाठी ती भक्ती साधन बनेल.

**राजगृहभोजनादिषु तथैव दृष्टत्वात् ॥३१॥**

**३१ - राजगृह आणि भोजन इत्यादींमध्ये असेच दिसून येते.**

पूर्वी सांगितलेल्या या भक्तीची फलरूपता समजण्यासाठी हे उदाहरण आहे.

**न तेन राजपरितोष: क्षुधाशान्तिर्वा ॥३२॥**

**३२- त्यामुळे (म्हणजे केवळ जाणून घेतल्यामुळे, ज्ञानाने) राजा प्रसन्नही होणार नाही आणि भूकही भागणार नाही.**

केवळ राजमहालाचे वर्णन ऐकल्यामुळे तसेच जाणल्यामुळे काम/कार्य होत नाही. राजा धर्मात्मा आहे, शक्तिशाली आहे, प्रजेचे हित इच्छिणारा आहे, रूप आणि गुण यांनी संपन्न आहे, ही गोष्टसुद्धा जाणून घेतली; परंतु त्यामुळे काय झाले ? हे केवळ जाणल्यामुळे राजा थोडाच प्रसन्न होणार ? याच प्रकारे असे जाणून घेतले की शिरा गोड असतो, तो तूप व साखर यांनी

* पाठभेद : ब्रह्मकुमार:।

बनतो, तो फार स्वादिष्ट आहे; परंतु हे जाणल्यामुळे भूक तर भागत नाही. याचप्रमाणे केवळ शब्द-ज्ञानामुळे भगवंताची प्रसन्नताही प्राप्त होत नाही, आणि आपणाला शांतीसुद्धा मिळत नाही. जरी भगवंताच्या दृष्टीने सर्व जण समान आहेत, तरी त्याची प्रसन्नता तर फक्त भक्तीनेच होते. तो (भगवंत) स्वतःच सांगतो-

**समोऽहं सर्वभूतेषु न मे द्वेष्योऽस्ति न प्रियः ।**
**ये भजन्ति तु मां भक्त्यामयि ते तेषुचाप्यहम् ॥** (गीता ९/२९)

'मी सर्व भूतांमध्ये सम आहे. मला कोणी द्वेष करण्यास योग्य नाही आणि प्रिय नाही. परंतु जे कोणी मला भक्तिपूर्वक भजतात, ते माझ्यामध्ये आणि मी त्यांच्यामध्ये असतो.'

**तस्मात्सैव ग्राह्या मुमुक्षुभिः ॥३३॥**

**३३- म्हणून (संसाराच्या बंधनातून) मुक्त होण्याची इच्छा असणाऱ्या माणसांनी भक्तीचेच ग्रहण केले पाहिजे.**

भक्तीमुळे संसाराचे बंधन तर विनासायास तुटूनच जाते. साक्षात् भगवंत त्या मुमुक्षूचा प्रेमास्पद बनून त्याचे बरोबर दिव्य लीला करतो.

इतर अन्य मोठमोठ्या साधनांपेक्षासुद्धा सहजपणे न मिळणारी अशी अतिदुर्लभ मुक्ती ही मागितल्याविनाच बळजबरीने (भक्त -) मुमुक्षूकडे येते. परंतु तो भक्त तर-

**मुक्ति निरादर भगति लुभाने ॥**

मुक्तीची उपेक्षा करून भक्तीवरच लुब्ध असतो.

भक्त हा डोळे वर करूनसुद्धा मुक्तीच्या दिशेकडे पाहात नाही. अशी सुलभ आणि सर्वांपेक्षा वरची स्थिती असे स्वरूप असणारी भक्ती सोडून कुणी दुसरे साधन का करावे बरे ? श्रद्धाळू आणि बुद्धिमान पुरुषांनी केवळ भक्तीच करावयास हवी.

* * *

# प्रेमरूपी भक्तीची साधने आणि सत्संगाचा महिमा

**तस्या: साधनानि गायन्त्याचार्या: ॥३४॥**

**३४- आचार्यांचे समूह त्या भक्तीची साधने सांगतात.**

कर्म आणि ज्ञान यांच्या अपेक्षेने भक्तीची श्रेष्ठता ही प्रतिपादन केल्यावर, आता देवर्षी नारद हे भक्तिशास्त्राचे प्रधान प्रवर्तक आणि भक्तीच्या तत्त्वाचे अनुभवी आचार्य तसेच संत-भक्त यांचे द्वारा गायिल्या गेलेल्या त्या सर्व श्रेष्ठ भक्तीच्या साधनांचे वर्णन करीत आहेत.

**तत्तु विषयत्यागात् सङ्गत्यागाच्च ॥३५॥**

**३५- ते (भक्ति-साधन) हे विषयांचा त्याग आणि संगाचा त्याग यांचे द्वारा प्राप्त होते.**

जीवाच्या मनामध्ये स्वाभाविकपणेच प्रेमाचा स्रोत आहे; कारण जीव हा परम आनंद स्वरूप असणाऱ्या, परम प्रेमस्वरूपी अशा भगवंताचाच सनातन असा चिद् अंश आहे. परंतु तो विषयांच्याकडे प्रवाहित झाला असल्यामुळे त्याच्या प्रेमाचा प्रवाह दूषित झाला आहे, आणि यामुळेच ते प्रेम हे दुःख उत्पन्न करणाऱ्या कामाच्या रूपात परिणत होत राहिले आहे. आणि या कारणानेच त्याला परमात्म्याच्या दिव्य स्वरूपाचा प्रकाश प्राप्त होत नाही. प्रेमाच्या दिव्य स्वरूपाच्या प्रकाशाच्या प्राप्तीसाठी त्या जीवाची विषयाकडे असणारी धाव पालटून, ती ईश्वराभिमुख करण्याची आवश्यकता आहे. यासाठी दोन उपाय आहेत:- (१) विषयांचा स्वरूपतः त्याग, आणि (२)

विषयांच्या आसक्तीचा त्याग. जे लोक असे समजतात की विषयांमध्ये आसक्त राहात असूनही आणि अमर्यादित विषयांचा यथेच्छ संग्रह तसेच भोग घेत असतांनासुद्धा भगवंताची प्राप्ती होईल अथवा भगवद्‌भक्तीच्या मार्गामध्ये विषय आणि विषयासक्ती यांचा त्याग करण्याची कोणतीही आवश्यकता नाही, ते लोक फार चुकीच्या समजुतीत आहेत. भक्तीमध्ये तर आपल्या भोगांसाठी कोणतीही वस्तू राहातच नाही; जेव्हा भोक्ताच म्हणून कुणी शिल्लक राहात नाही, तेव्हा भोग्य वस्तू कोठून राहील ? तेथे ( त्या भक्तीमध्ये) तर प्राणांचा आधार असा एकमेव भगवंतच सर्व-भोक्ता आहे आणि आपण आपली सर्व अंगे तसेच सर्व सामग्री यांसह भगवंताचे भोग्य आहोत. एकमात्र तो भगवंतच पुरुष आहे आणि बाकी सर्व त्याची भोगण्यास योग्य अशी प्रकृती आहे. अशा अवस्थेमध्ये भक्ताला आपला असा कोणताही भोग्य विषय राहातच नाही. या अवस्थेला जर फार श्रेष्ठ स्थिती असे म्हणून जर कुणी त्यातून बचावण्याची इच्छा करील तर त्याला सुद्धा साधन-काळात विषय आणि विषयासक्ती यांचा जमेल त्याप्रमाणे उत्तरोत्तर त्याग करणेच भाग पडते. जर शरीर विषयांच्या भोगात लागले असेल आणि जर मन विषयांमध्ये आसक्त राहात असेल, तर मग प्रियतम अशा भगवंताची सेवा ही कोणत्या तन-मनाने होईल ? म्हणून विषयांच्या त्यागाची फार मोठी आवश्यकता आहे. बाह्य भोग तर काय, मनानेसुद्धा विषयांचे चिंतन टाकावे लागेल; कारण नियम असा आहे की मन ज्या वस्तूचे चिंतन करील, त्या वस्तूमध्ये त्याची आसक्ती असते. भगवंताने श्रीमद्‌भागवतात सांगितले आहे -

विषयान् ध्यायतश्चित्तं विषयेषु विषज्जते ।
मनुस्मरतश्चित्तं मय्येव प्रविलीयते ॥

म्हणजे 'विषयांचे चिंतन करण्यामुळे मन हे विषयांत आसक्त होते आणि वारंवार माझे स्मरण केल्यामुळे ते मन माझ्या ठायी लीन होऊन जाते.'

मनाला जेथे लावावे तेथे ते मन चिकटून राहाते आणि ते 'लावणे' हे इंद्रियांच्या द्वाराच होते. आपण वारंवार ज्या प्रकारची दृश्ये पाहू, ज्या प्रकारच्या गोष्टी ऐकू, ज्या प्रकारच्या वस्तू खाऊ, ज्या कशाचा तरी वास घेऊ, ज्या वस्तूला स्पर्श करू, त्यांचेच मनामध्ये वारंवार चिंतन होईल, आणि ज्या वस्तूचे अधिक चिंतन होईल, तिच्यामध्ये आसक्ती निर्माण होईल. (उदा.) नाटक पाहू, वेश्यांचे गाणे ऐकू, तर त्यामध्येच आसक्ती उत्पन्न होईल, आणि भक्त-लीला पाहू, कीर्तन ऐकू, तर त्यांमध्येच आसक्ती उत्पन्न होईल. म्हणून भक्ती प्राप्त करून घेण्याची अभिलाषा बाळगणाऱ्यांनी भगवंताला प्रतिकूल असणाऱ्या सर्व विषयांचा त्याग करावयास हवा. खरे पाहू गेल्यास, या सूत्रात सांगितलेल्या विषयांच्या त्यागामध्ये त्या विषयांचा त्याग समजावयास हवा की जे विषय आमच्या मनाला भगवंतापासून दूर नेऊन भोगांमध्ये-जगत् प्रपंचात- चिकटवून टाकतात. ध्यान, चिंतन, कीर्तन, भगवंताची सेवा, साधूंचा सत्कार, सत्संग इत्यादी जे भगवंताला अनुकूल विषय आहेत, त्यांमध्ये तनमनास स्वेच्छेने तेथे लावावयास हवे, आणि ज्या विषयांचा संग्रह आणि सेवन हे शरीर चालविण्यास किंवा कुटुंबाचे पोषण करण्यास नितांत आवश्यक आहेत, त्यांचासुद्धा शक्य असेल त्याप्रमाणे अगदीच थोड्या प्रमाणात संग्रह आणि सेवन करावयास हवे, आणि तेसुद्धा शास्त्रानुकूल तसेच ईश्वराची आज्ञा समजून, अन्य कोणत्याही फलकामनेला मनामध्ये स्थान न देता, केवळ ईश्वराप्रीत्यर्थच. अशा प्रकारे केले जाणारे विषय-सेवन हे सुद्धा विषयांच्या त्यागासमान आहे, असे मानले जाते. केवळ वरवर कोणत्या तरी विषयाचा त्याग करून टाकला आणि मनात मात्र त्याचे स्मरण चालू राहिले, तर तो यथार्थ त्याग होत नाही. म्हणूनच सूत्रामध्ये विषयाच्या त्यागाबरोबरच आसक्तीच्या त्यागाचीसुद्धा आवश्यकता सांगितली गेली आहे. महाभारतात सांगितले आहे-

**त्यागः स्नेहस्य यत्त्यागो विषयाणां तथैव च ।**

(शांतिपर्व १९२/१७)

"विषयातील आसक्ती आणि विषय या दोन्हींच्या त्यागाला त्याग हे नाव आहे." याच्यामुळेच विषयावरील अनुरागाचा त्याग होईल आणि विषयानुरागाने रहित असे हृदयच भगवत्प्रेमाचे दिव्यधाम बनू शकते. भगवंताच्या प्रेमाची प्राप्ती झाल्यावर तर विषयांचा त्याग हा स्वाभाविकपणेच होत असतो.

अमृताचा स्वाद चाखून घेतल्यावर आणि त्याच्या गुणांनी होणारा लाभ मिळाल्यावर मग कुणाची नजरसुद्धा विषाकडे कशी बरे जाऊ लागेल ? परंतु त्या अमृताच्या प्राप्तीसाठीसुद्धा– त्याच्याकडे वळण्यासाठी सुद्धा- विषयरूपी विषाचा त्याग करणे आवश्यक आहे. विषयांतील आसक्तीचा त्याग करून भगवंताचे ठिकाणी आसक्त होण्यामध्येच श्रेष्ठ सुख आहे. भगवान सांगतात-

**मय्यर्पितात्मनः सभ्य निरपेक्षस्य सर्वतः ।**
**मयात्मना सुखं यत्तत्कुतः स्याद्विषयात्मनाम् ॥**

(श्रीमद् भा. ११/१४/१२)

" माझ्या ठिकाणी चित्त लावणारे आणि सर्व विषयांची अपेक्षा सोडून देणारे असे जे भक्त आहेत त्यांना आत्मस्वरूप अशा माझ्यापासून जे परम सुख मिळते, ते सुख ज्यांचे चित्त विषयांत आसक्त आहे अशा लोकांना कोठून बरे प्राप्त होऊ शकेल ?"

**अव्यावृतभजनात् ॥ ३६ ॥**

**३६-अखंड भजनाने (भक्तीचे साधन सिद्ध होते)**

भजन हे भक्तीचे प्रधान अंग आहे; हे साध्य व साधन असे दोन्ही आहे. ज्यांनी भगवंताचे प्रेम प्राप्त करून घेतले आहे; त्यांच्या बाबतीत अखंड

भजन हे स्वाभाविक होऊन जाते, आणि ज्या लोकांना भगवंताच्या प्रेमाची प्राप्ती करून घ्यावयाची आहे, त्यांनी अखंड भजनाचा अभ्यास करावयास हवा. जो मनुष्य भजन न करता मुक्ती आणि भगवत्प्रेम यांच्या प्राप्तीची इच्छा करतो, तो चुकत आहे. गोस्वामी श्रीतुलसीदासजी सांगतात-

**बारि मथें धृत होइ बरु सिकता ते बरु तेल ।**
**बिनु हरि भजन न भव तरिअ यह सिद्धांत अपेल ॥**

"पाण्याच्या मंथनामुळे कदाचित तूप बाहेर येईल, वाळूपासून कदाचित् तेल बाहेर पडेल, परंतु भगवंताच्या भजनाशिवाय भवसागरातून मनुष्य तरून जाऊ शकत नाही, हा सिद्धांत अटळ आहे."

म्हणून भजन हे तर अनिवार्य साधन आहे. तसेच भक्तीचे साधन करण्यासाठी तर हे भजन ही एक खास वस्तू आहे. विषयांतून मन बाजूला काढून जर ते भगवंताच्या ठिकाणी लावले गेले नाही तर ते मन परत फिरून तेथेच म्हणजे विषयांमध्येच पळत पळत जाईल. विषयांचा त्याग हेच वैराग्य आहे, आणि भगवंताचे भजन हा अभ्यास आहे. याच वैराग्य आणि अभ्यास यांच्यामुळे विशुद्ध अशा भगवंतावरील प्रेमाची प्राप्ती होते. परंतु जे भजन आता होत आहे आणि घटकाभरानंतर होत नाही, जे भजन आज केले पण उद्या केले नाही, ते भजन हे प्रेम व आदर यांनी युक्त असणारे अखंड भजन नव्हे. भजनरूपी अभ्यास तर जो सदा होत राहातो, तेथेच तो सिद्ध होतो. अभ्यास हा सतत होत राहावा आणि सत्कारपूर्वक होत राहावा. योगदर्शनामध्ये महर्षी पतंजली सांगतात-

**स तु दीर्घकालनैरन्तर्यसत्कारासेवितो दृढभूमिः ।**

(१/१४)

"दीर्घकाळपर्यंत खंड न पडता सत्कारासह केल्यानंतरच अभ्यास दृढ होतो." या नित्य निरंतर अशा अखंड स्मरणामुळे भगवंताची प्राप्ती सहजच

होऊन जाते. स्वत: भगवंतांनी सुद्धा गीतेत सांगितले आहे-

**अनन्यचेता: सततं यो मां स्मरति नित्यश: ।**
**तस्याहं सुलभ: पार्थ नित्ययुक्तस्य योगिन: ॥**

(८/१४)

"हे अर्जुना, जो पुरुष माझ्या ठिकाणी अनन्यचित्त होऊन, नित्य निरंतर माझे स्मरण करतो, त्या निरंतर माझ्या ठिकाणी चिकटलेल्या योगी पुरुषाला मी सुलभ आहे."

म्हणून अखंडपणाने भगवंताचे प्रेमपूर्वक चिंतन करीत असतानाच, स्नान, भोजन, व्यापार इत्यादी सर्व कामे व्हावयास हवीत. भगवंताच्या स्मरणाने युक्त झाल्यामुळे प्रत्येक कार्यच भजन होऊन जाईल. अशा प्रकारे भजनाचा तंतू क्षणभरसुद्धा तुटता कामा नये. भगवंताच्या स्वरूपाचे चिंतन होणे शक्य नसेल, तरी भगवंताचे निरंतर नामस्मरणच करावयास हवे. भगवंताच्या नामस्मरणाने मन आणि प्राण हे पवित्र होऊन जातील, आणि भगवंताच्या पावन अशा पदकमलांचे ठिकाणी अनन्य प्रेम उत्पन्न होऊन जाईल. नामजपाचा सहज विधी असा आहे की आपल्या श्वासोच्छ्वासाच्या येण्या-जाण्यावर लक्ष ठेवून, श्वास व प्रश्वास यांचे बरोबर मनाने आणि त्याच्याबरोबर हळू स्वरात वाणीने सुद्धा भगवंताचा नामजप करीत राहावे. हे साधन उठता-बसताना, चालताना-फिरताना, झोपताना, उभे राहाताना, सर्व वेळी केले जाऊ शकते. हा अभ्यास दृढ झाल्यावर, चित्त हे विक्षेपांनी रहित होऊन, निरंतर भगवंताच्या चिंतनामध्ये आपोआपच जडून जाईल. प्राय: सर्वच प्रसिद्ध संत आणि भक्त यांनी या साधनाचा प्रयोग केला होता. महात्मा चरणदासजी सांगतात-

**स्वासा माहीं जपे तें दुबिधा रहे न कोय ।**

"श्वासामध्ये नाम जपल्यास कोणतीही द्विधा अवस्था राहात नाही."

याच प्रकारे कबीरजी सांगतात-

**साँस साँस सुमिरन करौ, यह उपाय अति नीक ।**

"श्वासाश्वासाबरोबर नाम-स्मरण करा. हा उपाय अत्यंत चांगला आहे."

अभिप्राय असा आहे की भगवंताचे स्वरूप, प्रभाव, रहस्य, गुण, लीला अथवा नाम यांचे चिंतन निरंतर तेलाच्या धारेप्रमाणे होत राहिले पाहिजे. हेच अखंड भजन आहे.

**लोकेऽपि भगवद्गुणश्रवणकीर्तनात् ॥३७॥**

**३७- लोक-समाजामध्ये सुद्धा भगवंताच्या गुणांचे श्रवण आणि कीर्तन यांचेमुळे भक्तीचे साधन सिद्ध होते.**

मनाने तर भगवंताचे नित्य चिंतन करावयास हवे; परंतु कान आणि वाणी यांनीसुद्धा सदा सर्वदा लोकांच्यामध्ये भगवंताचे गुण ऐकावयास आणि सांगावयास हवेत. मनाने केलेल्या भगवंताच्या चिंतनाचे कार्य तेव्हाच सफल होते की जेव्हा आपली इंद्रिये हीसुद्धा भगवंताशी संबंधित अशा कार्यांमध्येच लागून राहातात. सर्वच कार्यांचा आधार बहुतेक ऐकणे आणि बोलणे हा आहे. जर नेहमी कानांवर विषयांची चर्चा येत राहील आणि वाणीने नेहमी विषयांच्या गोष्टी केल्या जात असतील, तर मनाने भगवंताचे चिंतन होणे असंभवनीयच आहे असे समजण्यास हवे. परंतु जर कान आणि जीभ हे भगवंताचे ठायी लागून राहातील- त्यांना दुसरे कार्य करण्यासाठी फुरसतही मिळत नसेल- तर भिन्न भिन्न इंद्रिये आणि मन हेसुद्धा आपणहून भगवत्-परायण होऊन जातील. म्हणून कान आणि जीभ हे भगवंताचे नाम- गुण- लीला इत्यादी ऐकण्यातच आणि गाण्यातच निरंतर लावून ठेवायला हवेत. हेच जीवन सफळ बनविण्याचे साधन आहे. केवळ जिवंत राहणे, श्वास घेणे, खाणे आणि मैथुन करणे इत्यादींमध्ये जीवनाची सफलता आहे असे जर मानले गेले, तर प्रश्न असा की

वृक्ष काय जिवंत राहात नाहीत ? लोहाराचा भाता काय श्वास घेत नाही, आणि पशू हे भोजन किंवा मैथुन करीत नाहीत काय ? म्हणूनच श्रीमद् भागवतामध्ये सांगितले आहे-

श्वविड्वराहोष्ट्रखरैः संस्तुतः पुरुषः पशुः ।
न यत्कर्णपथोपेतो जातु नाम गदाग्रजः ॥
बिले बतोरुक्रमविक्रमान् ये
न श्रृण्वतः कर्णपुटे नरस्य ।
जिह्वासती दार्दुरिकेव सूत
न चोपगायत्युरुगायगाथाः ॥
(२/३/१९-२०)

"ज्यांच्या कर्णपथावर भगवंताच्या नाम- गुणांनी कधी प्रवेश केला नाही, तो मनुष्यरूपी पशू हा कुत्रा, विष्ठा खाणारा डुक्कर, उंट आणि गाढव यांच्या पेक्षाही अधिक निंदनीय आहे. हे सूतजी, जे कान भगवंताची लीला श्रवण करीत नाहीत, ते कान सर्प इत्यादींच्या बिळाप्रमाणे आहेत. आणि जी दुष्ट जिव्हा भगवंताच्या लीला-कथांचे गायन करीत नाही, ती बेडकाच्या जिभेप्रमाणे फुकट बकवास करणारी आहे." याचाच अनुवाद गोस्वामी तुलसीदासजींनी केला आहे-

जिन्ह हरिकथा सुनी नहिं काना । श्रवन रंध्र अहि भवन समाना ॥
जो नहिं करइ राम गुन गाना । जीह सो दादुर जीह समाना ॥

" ज्या कानांनी हरीची कथा ऐकली नाही ते कान सापाच्या बिळाप्रमाणे होत. जी जीभ रामाचे गुण गात नाही, ती बेडकाच्या जिभेप्रमाणे होय."

श्रीमद्भागवताच्या अंती सांगितले आहे-

मृषा गिरस्ता ह्यसतीरसत्कथा
न कथ्यते यद् भगवानधोक्षजः ।

तदेव सत्यं तदु हैव मंगलं।
तदेव पुण्यं भगवद्गुणोदयम् ॥
तदेव रम्यं रुचिरं नवं नवं
तदेव शश्वन्मनसो महोत्सवम् ।
तदेव शोकार्णवशोषणं नृणां
यदुत्तमश्लोकयशोऽनुगीयते ॥

(१२/१२/४८-४९)

"ज्या वाणीने अधोक्षज भगवंताची कथा सांगितली न जाता, विषयांच्या वाईट गोष्टी सांगितल्या जातात, ती वाणी असत् आणि व्यर्थ आहे. ज्या वचनांमध्ये भगवंताचे गुण प्रकट केले जातात, पुण्यकीर्ती अशा भगवंताच्या यशाचे वर्णन केले जाते, तीच वचने वास्तवत: सत्य आहेत, तीच वचने मंगलरूप आहेत, तीच वचने पुण्य आहेत, तीच मनोहर आहेत, तीच रुचिर आहेत, तीच वचने नित्य नवीन रसाने युक्त आहेत, तीच नेहमी मनाला आनंद देणारी आहेत, आणि तीच वचने माणसांचा शोकरूपी समुद्र सुकविणारी आहेत."

म्हणून कानांनी भगवंताचे गुण आणि नाम यांचे श्रवण आणि वाणीने त्यांचे कीर्तन करावयास हवे. यामुळे भगवंतविषयक निर्मल प्रेम उदित होते. श्रीमद् भागवतात सांगितले आहे-

ता ये श्रृण्वन्ति गायन्ति ह्यनुमोदन्ति चादृता: ।
मत्परा: श्रद्दधानाश्च भक्तिं विन्दन्ति ते मयि ॥

(११/२६/२९)

य एतद्देवदेवस्य विष्णो: कर्माणि जन्म च ।
कीर्तयेच्छ्रद्धया मर्त्य: सर्वपापै: प्रमुच्यते ॥
इत्थं हरेर्भगवतो रुचिरावतार-

वीर्याणि बालचरितानि च शन्तमानि ।
अन्यत्र चेह च श्रुतानि गृणन्मनुष्यो
भक्तिं परां परमहंसगतौ लभेत ॥

(११/३१/२७-२८)

भक्तिं लब्धवत: साधो: किमन्यदवशिष्यते ।
मय्यनन्तगुणे ब्रह्मण्यानन्दानुभवात्मनि ॥

(११/२६/३०)

भगवान् सांगतात- "जे लोक माझे ठायी मन लावून, श्रद्धापूर्वक व आदरपूर्वक माझी नाम-गुण-लीला-कथा ऐकतात, गातात, आणि त्यांचे अनुमोदन करतात, त्यांची माझ्या ठिकाणी अनन्य भक्ती उत्पन्न होते.

श्रीशुकदेवजी सांगतात- "हे राजा, जो माणूस देवदेव अशा भगवंताचे जन्म व कर्म यांचे श्रद्धापूर्वक कीर्तन करतो, तो सर्व पापांतून मुक्त होतो. भगवान श्रीहरीचा अतिमनोहर, कल्याणकारी असा अवतार, पराक्रम, तसेच त्याच्या बाल-लीला या ऐकण्यामुळे तसेच त्यांचे गायन केल्यामुळे, मनुष्य हा परमहंस संन्याश्यांची गति-स्वरूप अशा भगवंताचे ठिकाणी श्रेष्ठ भक्ती प्राप्त करून घेतो."

भगवान् सांगतात- "अशा प्रकारे अनंत गुणांनी युक्त, सच्चिदानंदघन अशा मज ब्रह्माचे ठिकाणी भक्ती निर्माण झाल्यावर मग त्या साधू पुरुषाला आणखी कोणती वस्तू प्राप्त करून घ्यावयाची बाकी राहील बरे ? म्हणजे तो कृतार्थ होऊन जातो."

भगवंताच्या नाम श्रवणाचे आणि कीर्तनाचे फार मोठे फळ प्राप्त होते. जेथपर्यंत भगवंताच्या नामाचा ध्वनी पोचतो, तेथपर्यंतचे वातावरण पवित्र होऊन जाते. मृत्युकाळी अंतिम श्वासात भगवंताचे नाम कोणत्याही भावाने ज्याच्या मुखातून बाहेर पडते, त्याला परम पदाची प्राप्ती होऊन जाते. जेथे

भगवंताच्या नामाचे कीर्तन होत असते तेथे यमदूत जाऊ शकत नाहीत. म्हणून दहा नाम-अपराधापासून* बचाव करून घेत, भगवंताच्या- नामाचे जप-कीर्तन, आणि श्रवण हे अवश्यच केले पाहिजे.

श्रीमद् भागवतात सांगितले आहे-

**साङ्केत्यं पारिहास्यं वा स्तोभं हेलनमेव वा ।**
**वैकुण्ठनामग्रहणमशेषाघहरं विदुः ॥**
**अज्ञानादथवा ज्ञानादुत्तमश्लोकनाम यत् ।**
**सङ्कीर्तितमघं पुंसो दहेदेधो यथानलः ॥**

(६/२/१४, १८)

" पुत्र इत्यादींचा नाम- संकेत, चेष्टा, स्तोभ किंवा अवहेलना यांनी सुद्धा भगवंताचे नाम घेतल्याने सर्व पाप नष्ट होऊन जाते. अज्ञानपूर्वक अथवा ज्ञानपूर्वक घेतलेले पुण्यश्लोक अशा भगवंताचे नाम हे माणसांच्या पापाला अशा प्रकारे जाळून टाकते की जशा प्रकाराने अग्नीमध्ये कोणत्याही प्रकाराने सुद्धा टाकलेले इंधन भस्म होऊन जाते."

सर्वच सद्ग्रंथ आणि संतांची वचने यांमध्ये भगवंताच्या नामाचा महिमा गायिला गेला आहे. श्रीमद् भागवताचे खाली दिलेले श्लोक हे मनन करण्यास योग्य आहेत; देवी देवहूतीजी भगवान् कपिलदेवाला सांगते -

---

* १ नामाचे संदर्भात दहा अपराध असे आहेत:- १. संतांची निंदा २. भगवंताच्या नामामध्ये लहान-मोठे असा भेदभाव ३. गुरूचा अपमान ४. शास्त्राची निंदा ५. नामामध्ये अर्थवाद (म्हणजे असे समजणे की हे केवळ प्रशंसामात्र आहे, अशाने फळ मिळत नाही, असे) मानणे ६. नामांचा आश्रय घेऊन पाप करणे, ७. धर्म, व्रत, दान आणि यज्ञ इत्यादींचे बरोबर नामाची तुलना करणे ८. श्रद्धारहित , हरीला विन्मुख आणि ऐकण्याची इच्छा नसणाऱ्या अशा माणसांना नामाचा उपदेश करणे ९. नामाचे माहात्म्य ऐकूनसुद्धा त्या नामाचे ठिकाणी प्रेम न करणे, आणि १०. अहंकार, ममता, तसेच भोग इत्यादी विषयांमध्ये आसक्त राहाणे.

अहो बत श्वपचोऽतो गरीयान्
यज्जिह्वाग्रे वर्तते नाम तुभ्यम् ।
तेपुस्तपस्ते जुहुवः सस्नुरार्या
ब्रह्मानूचुर्नाम गृणन्ति ये ते ॥

(३/ ३३/ ७)

" अहो, ज्याचे जिव्हेवर तुमचे पवित्र नाम राहाते, तो चांडाळसुद्धा श्रेष्ठ आहे; कारण जे कोणी तुमच्या नामाचे कीर्तन करतात अशा त्या श्रेष्ठ पुरुषांनी तप, यज्ञ, तीर्थस्थान, वेदाध्ययन हे सर्व काही केलेले असते. "

पतितः स्खलितश्चार्तः क्षुत्त्वा वा विवशोऽब्रुवन् ।
हरये नम इत्युच्चैर्मुच्यते सर्वपातकात् ॥
सङ्कीर्त्यमानो भगवाननन्तः
श्रुतानुभावो व्यसनं हि पुंसाम् ।
प्रविश्य चित्तं विधुनोत्यशेषं
यथा तमोऽर्कोऽभ्रमिवातिवातः ॥

(१२/ १२/४६-४७)

"पडताना, विश्रांती घेताना, शिंकताना आणि दुःखाने पीडित असताना, त्यावेळी परवश होऊनसुद्धा जर कोणीही मनुष्य उंच स्वराने "हरये नमः" असा उच्चार करील, तर तो सर्व पापांतून सुटतो. ज्या प्रमाणे सूर्य हा पर्वताच्या गुहेतील अंधकाराचा सुद्धा नाश करून टाकतो, आणि ज्या प्रमाणे प्रचंड वारा हा ढगांना छिन्नभिन्न करून त्यांना लुप्त करून टाकतो, त्या प्रमाणे अनंत असणाऱ्या भगवंताचे नाम-कीर्तन अथवा त्याच्या प्रभावाचे श्रवण हृदयामध्ये प्रवेश करून, समस्त दुःखांचा अंत करून टाकते."

हे तर विवश होऊन नाम घेण्याचे फळ आहे. मग प्रेमाने घेतल्यावर काय होते हे काय सांगावे बरे ? म्हणून तुलसीदास सांगतात-

बिबसहुँ जासु नाम नर कहहीं । जनम अनेक रचित अघ दहहीं ।।
सादर सुमिरन जे नर करहीं । भव बारिधि गोपद इव तरहीं ।।

" जो मनुष्य अगतिक होऊन का होईना, भगवंताचे नाम घेतो तो अनेक जन्मांची पापे जाळून टाकतो. आणि जो मनुष्य आदरपूर्वक नाम-स्मरण करतो, तो या भव-सागरातून गोपदाप्रमाणे तरून जातो."

म्हणून भक्तीच्या प्राप्तीसाठी नित्य निरंतर भगवंताच्या नाम- गुण - यशाचे कीर्तन, श्रवण आणि चिंतन हे निःसंदेहपणे श्रेष्ठ साधन आहे.

**मुख्यतस्तु महत्कृपयैव भगवत्कृपालेशाद्वा ।।३८ ।।**

**३८- परंतु प्रेम-भक्तीच्या प्राप्तीचे साधन हे मुख्यतया प्रेमी महापुरुषांच्या कृपेने अथवा भगवत्कृपेच्या लेशमात्राने सिद्ध होत असते.**

विषय आणि विषयासक्ती यांचा त्याग करून, अखंड भजन आणि श्रवण- कीर्तन हे साधन आहे असे सांगितल्यानंतर, आता एक असे साधन सांगितले जात आहे की ज्या एकाच्या सामर्थ्यानेच पहिली तीन साधने आपोआपच सिद्ध होतात. ते साधन आहे महापुरुषांची कृपा. महापुरुष हे तर कृपाळूच असतात. परंतु श्रद्धापूर्वक आणि विश्वासपूर्वक त्यांची संगती करणे हे फार कठीण आहे. महापुरुषांचा संग प्राप्त झाल्यावर, विषय हे तर आपोआपच सुटून जातात. त्यांच्या संगामुळे श्रवण आणि कीर्तन हेसुद्धा करणे भाग पडते. आणि रात्रंदिवस जे काही ऐकायला, सांगायला व पाहावयाला मिळते, त्याचे स्मरण हे अनिवार्यच होते. परंतु येथे हे लक्षात ठेवावयास हवे की जेथे ज्या महापुरुषांच्या केवळ कृपेमुळेच फल-स्वरूप अशा प्रेमभक्तीची प्राप्ती सांगितलेली आहे, ते महापुरुष हे केवळ शास्त्र-ज्ञानी आणि सदाचारीच असे नसतात, तर ते भगवंताच्या स्वरूपाचे तत्त्व यथार्थरूपाने जाणून, ते महापुरुष त्या भगवंतावर अनन्य प्रेम करणारे भक्तही असतात. अशा प्रेमी भक्तांच्या संगतीचा फार महिमा आहे. म्हणून यज्ञातील धुराने ज्यांची शरीरे धुरकट होऊन

गेली आहेत, असे कर्मकांड आचरणारे विज्ञानवेत्ते ऋषी हे भगवच्चरणरूपी कमळातील रसामृताचे पान करणाऱ्या अशा प्रेममूर्ती सूतजीला सांगतात-

**तुलयाम लवेनापि न स्वर्गं नापुनर्भवम् ।**
**भगवत्सङ्गिसङ्गस्य मर्त्यानां किमुताशिषः ।।**

(श्रीमद्भा- १/१८/१३)

" हे सौम्य, भगवंताचा संग करणाऱ्या प्रेमी भक्तांच्या निमिषमात्र संगाची तुलना, स्वर्ग इत्यादी गोष्टीशीच काय, तर पुनर्जन्माचा नाश करणाऱ्या मुक्तीबरोबर सुद्धा केली जाणे शक्य नाही; मग मृत्यु-लोकातील राज्य इत्यादी संपत्तीची ती गोष्ट काय आहे ? "

याच्या आधारे रामचरितमानस मध्ये सांगितले आहे-

**तात स्वर्ग अपबर्ग सुख धरिअ तुला एक अंग ।**
**तूल न ताहि सकल मिलि जो सुख लव सतसंग ।।**

" स्वर्ग व मोक्ष यांचे सुख एका पारड्यात घातले, तरीही ते सर्व मिळून सत्संगाची तुलना करू शकणार नाही."

जो अंत:करणाची शुद्धी करून मोक्षप्राप्ती करवून देतो, असा सत्संगाचा महिमा नव्हे. कारण येथे तर अशा सत्संगाची तुलना लवमात्र मोक्षाशी करणे हे सुद्धा असंगत आहे, असे सांगितले गेले आहे. म्हणून येथे भगवंताच्या तत्त्वाचा ज्ञाता होऊन भगवंताच्या प्रेमाच्या रंगामध्ये रंगून गेलेल्या अशा त्या मोक्षसंन्यासी, भगवंताचा संग करण.ऱ्या (सर्व ऐश्वर्यांनी पूर्ण मधुरतम लीलाविहारी भगवंताचे नित्य लीलासंगी अशा) प्रेमी संतांच्या त्या कृपेचा असा उल्लेख आहे की ती कृपा केवळ मुक्तीच नव्हे तर भगवंताच्या प्रेमस्वरूपी भक्तीची प्राप्ती सुद्धा सहजपणेच करवून देते. कारण असे की प्रेमी हे मुक्तीची तर इच्छाच करीत नाहीत. या उलट मुक्तीची इच्छा हीसुद्धा प्रेमरूप अशा भगवद्भक्तीच्या उत्पत्तीमध्ये बाधा आणणारी पिशाचिनी आहे, असे समजून

तिचा तिरस्कार ते प्रेमी भक्त करीत असतात. अशा प्रेमी भक्तांची कृपा ज्या पुरुषांच्यावर होते, जे पुरुष अशा भक्तांचा संग प्राप्त करून घेतात, त्यांना योग व ज्ञान इत्यादींनीसुद्धा वश न होणारा भगवान् सहजच वश होऊन जातो. म्हणूनच स्वत: भगवान् आपल्या उद्धव या प्रेमी भक्ताला सांगतात-

**न रोधयति मां योगो न सांख्यं धर्म एव च ।**
**न स्वाध्यायस्तपस्त्यागो नेष्टापूर्तं न दक्षिणा ॥**
**व्रतानि यज्ञश्छन्दांसि तीर्थानि नियमा यमाः ।**
**यथावरुन्धे सत्सङ्गः सर्वसङ्गापहो हि माम् ॥**

(श्रीमद्भा. ११/१२/१-२)

"दुसऱ्या सर्व संगाचे निवारण करणाऱ्या सत्संगामुळे मी जसा वश होतो, तसा योग, ज्ञान, धर्म, वेदाध्ययन, तप, त्याग, इष्टापूर्त, दक्षिणा, व्रत, यज्ञ, वेद, तीर्थ, यम आणि नियम यांतील कशानेही मी वश होत नाही."

याचे कारण हे आहे की भिन्न भिन्न अशी सर्व साधने ही सकाम भावनेने झाली असल्यास, भोग आणि स्वर्ग इत्यादींची प्राप्ती करून देणारी होतात, आणि निष्काम भावनेने झाली असता, अंत:करणाची शुध्दी आणि मोक्षाची प्राप्ती करवून देणारी असतात. या उलट लीलाविहारी अशा भगवंताला सरळपणाने वश करून घेणारे तर फक्त एक, सर्व-तंत्र- स्वतंत्र, अनन्य आणि विशुद्ध असे प्रेमच आहे की ते या अन्य साधनांतील कशानेही मिळत नाही. ते प्रेम तर केवळ भगवंताचा संग करणाऱ्या अशा प्रेमी महापुरुषांच्या महान कृपेनेचे मिळते.

**भगति सुतंत्र सकल सुख खानी । बिनु सतसंग न पावहिं प्रानी ॥**

जर भगवंताची इच्छा असेल तर भगवंत स्वत:हूनच आपले प्रेम देऊ शकतो; त्याच्या कृपेच्या लेशमात्राने सुद्धा प्रेम मिळू शकते. तुलसीदासांनी सांगितले आहे-

**जाकी कृपा लवलेस ते मतिमंद तुलसीदासहूँ ।**
**पायो परम बिश्रामु राम समान प्रभु नाहीं कहूँ ॥**

"ज्याच्या किंचितशा कृपेने मतिमंद तुलसीदासाला परम सुख-शांती लाभली, त्या रामासारखा प्रभू कोणताही नाही."

परंतु नित्य कृपेचा वर्षाव करणाऱ्या भगवंताचा कृपाबिंदूसुद्धा भागवदीय महात्म्यांच्या कृपेनेच जीवांना मिळू शकतो. म्हणूनच अशा प्रकारच्या प्रेमी संतांचा संगच प्रेमभक्तीचे प्रधान साधन आहे. याच कारणाने देवर्षी नारदजी पुढल्या सूत्रात महत्संग हा दुर्लभ आहे, असे सांगतात.

**महत्सङ्गस्तु दुर्लभोऽगम्योऽमोघश्च ॥३९॥**

**३९- परंतु महापुरुषांचा संग हा दुर्लभ, अगम्य आणि अमोघ आहे.**

संसारात स्वधर्म-परायण, सदाचारी, चांगला स्वभाव असणारे, दैवी संपत्तीने युक्त अशा पुरुषांची भेट ही फार दुर्लभ आहे. माणसांचे समूह आणि उपदेश करणारे यांमध्ये खऱ्या हिऱ्याप्रमाणे खरे साधू हे फार थोडेच असतात. तथापि शोध केल्यावर, संसारात सदाचारी, कर्मकांड करणारे, आणि काही ज्ञानी पुरुष सापडू शकतात. परंतु असले खरे प्रेमी महात्मे फारच कमी सापडतात की ज्यांच्या कृपेमुळे परम-दुर्लभ, योगी व ज्ञानी लोकांकडून इच्छिली जाणारी अशी भगवत्प्रेमाची प्राप्ती होते. म्हणून अशा महात्म्यांची भेट फार दुर्लभ आहे असे मानले आहे. समजा जरी कुठे असे महापुरुष भेटले तरी त्यांना ओळखणे हे फार कठीण आहे. कारण बाह्य आचार हा तर ढोंगी लोक आणि नाटकातील पात्रेसुद्धा काही अंशी तसलाच आचार दाखवू शकतात. डोळ्यातून अश्रू ढाळणे, रडणे, हसणे आणि ओरडणे हेच काही प्रेमी भक्तांचे लक्षण नव्हे. अनेक बाह्य कारणांनी सुद्धा असे घडू शकते. तसेच काही काही खरे प्रेमीसुद्धा या लक्षणांनी युक्त अशा स्थितीच्या पुढे गेलेले असतील आणि त्यांचे बाह्य

आचार हे सामान्य समजुतीच्या पलीकडचे असतील. प्रेमीजन हे तर कुणाला सांगायला जात नाहीत की आम्हाला प्रेमी समजा, आणि नुसत्या सांगण्याने मानेल तरी कोण ? म्हणून अशा निःस्पृह भगवज्जनांची ओळख ही फारच कठीण आहे; यामुळेच त्यांचा संग हा दुर्गम आहे असे सांगितले गेले आहे. परंतु सुदैवाने जर कुठे असे महात्मे पुरुष गाठ पडतील, तर अजाणतेपणे त्यांच्याशी संगती होणे, हेसुद्धा कधी व्यर्थ ठरणार नाही; कारण तो संग अमोघ आहे. जेव्हा सामान्य अशा सदाचारी विद्वान साधूशी होणारा समागम हासुद्धा अंतःकरणाच्या शुद्धीचे कारण होऊन पाप, ताप, आणि दैन्य यांचे निवारण करण्यास समर्थ होतो, तेव्हा ज्यांचे हृदय हे भगवंतावरील प्रेमाने ओसंडत आहे, जे प्रेम आणि आनंद यांची मूर्ती आहेत, ज्यांच्या स्मरणामुळे सुद्धा पापांचा नाश होऊन जातो, त्या भगवदीय प्रेमी महात्म्यांच्या दर्शनाचे महान् फळ निश्चितपणे प्राप्त होऊन जाते.

ज्या प्रमाणे अमावस्येच्या अंधाऱ्या रात्री झोपलेला माणूस जर सूर्योदय झाल्यावरसुद्धा झोपलेलाच राहिला तर त्याला जागेपण येईपर्यंत, असणाऱ्या प्रकाशाचा अनुभव येत नाही, परंतु प्रकाश तर सूर्योदयाचे बरोबरच झालेला होता; तसेच ज्याप्रमाणे कुणी श्रीमंत पुरुष आपल्या कोण्या लाडक्या दरिद्री माणसाच्या नावावर आपली करोडोंची संपत्ती स्वाधीन करून देतो, तेव्हा जोपर्यंत त्याला या गोष्टीची माहिती होत नाही तोपर्यंत तो स्वतःला दरिद्रीच समजतो; त्याचप्रमाणे कोणातरी भगवत्प्रेमी अशा महापुरुषाच्या न कळलेल्या संगाने सुद्धा पाप आणि अज्ञानरूपी अंधकाराचा नाश होऊन, ज्ञानरूपी सूर्याचा प्रकाश आणि प्रेमरूप श्रेष्ठ निधी मिळतो; परंतु जोपर्यंत या गोष्टीचा पत्ता लागत नाही, तोपर्यंत या लाभाशी परिचित नसल्याकारणाने एकाद्या माणसाला तो आनंद प्राप्त होणार नाही. या स्थितीचा परिचय होण्यास अधिक विलंब नक्कीच लागत नाही. यामुळेच महत्संगाला अमोघ म्हणजे अवश्य फळ देणारा असे

म्हटले गेले आहे.

**लभ्यतेऽपि तत्कृपयैव ।।४०।।**

**४०- त्या (भगवंता) च्या कृपेनेच (महापुरुषांचा) संगसुद्धा प्राप्त होतो.**

अशा संतांची भेट ही निश्चितपणेच हरीच्या कृपेनेच होते. भगवान् हा ज्याच्यावर कृपा करून त्याला आपलासा करू इच्छितो, त्याच्याजवळ, तो प्रेमपाशामध्ये आपल्याला बांधून ठेवण्याची शक्ती असणाऱ्या, आपलेच स्वरूप असणाऱ्या अशा प्रेमी भक्ताला पाठवितो. खरे म्हणजे भगवंताची कृपा आणि महान् पुरुषांचा संग हे एकमेकावर अवलंबून आहेत. महापुरुषाच्या संगाशिवाय भगवंताच्या कृपेचा अनुभव येत नाही, आणि भगवंताच्या कृपेशिवाय अशा महापुरुषांची गाठ पडत नाही. श्रीहनुमानजीची गाठ पडल्यावरच बिभीषणाला भगवंताच्या कृपेचा अनुभव आला. यामुळेच त्याने म्हटले आहे-

**अब मोहि भा भरोस हनुमंता । बिनु हरि कृपा मिलहिं नहि संता ।**

**तस्मिंस्तज्जने भेदाभावात् ।।४१।।**

**४१- कारण भगवंत आणि त्याचे भक्त यांमध्ये भेदाचा अभाव आहे.**

भगवंताचे भक्त हे भगवत्स्वरूपच असतात (**ब्रह्मविद् ब्रह्मैव भवति**). जे लोक भक्तांची सेवा करतात ते भगवंताची सेवा करतात. भक्त हा भगवंताच्या हृदयात बसलेला असतो आणि भगवंत हा भक्ताच्या हृदयात असतो. भगवंताने म्हटले आहे-

**साधवो हृदयं मह्यं साधूनां हृदयं त्वहम् ।**
**मदन्यत्ते न जानान्ति नाहं तेभ्यो मनागपि ।।**

(श्रीमद्भा. ९/४/६८)

"साधू हे माझे हृदय आहेत आणि मी त्यांचे हृदय आहे. ते

माझ्याशिवाय आणखी कुणालाही ओळखत नाहीत. त्याचप्रमाणे त्यांना सोडून मी अन्य कुणालाही जाणत नाही."

प्रेमरूप अशा गोपींच्या संदर्भात भगवंताने सांगितले आहे-

**मन्माहात्म्यं मत्सपर्यां मच्छ्रद्धां मन्मनोगतम् ।**
**जानन्ति गोपिकाः पार्थ नान्ये जानन्ति तत्त्वतः ॥**

"हे अर्जुना, माझे माहात्म्य, माझी पूजा, माझ्यावरील श्रद्धा आणि माझ्या मनातील गोष्ट तत्त्वत: फक्त गोपीच जाणतात, आणि अन्य कोणी जाणत नाही."

असे प्रेमी भक्त आणि भगवान् यांमध्ये काय फरक आहे ? भगवंताने सांगितले आहे-

**ये भजन्ति तु मां भक्त्या मयि ते तेषु चाप्यहम् ॥**

(गीता ९/२९)

" जे प्रेमाने मला भजतात ते माझ्यामध्ये व मी त्यांच्यामध्ये असतो." असे भक्त हे भगवत्प्रेमात अशा प्रकारे तल्लीन होऊन रहातात की ते आपले बाह्यरूप विसरून, प्रत्यक्ष भगवंताच्या स्वरूपाचा अनुभव घेऊ लागतात. भगवंताला शोधताना गोपी अशा तन्मय होऊन जात की, भगवंताचीच लीला त्या करू लागल्या.

**तदेव साध्यतां तदेव साध्यताम् ॥४२॥**

**४२- (म्हणून) त्या (महत्संगा) चीच साधना करा, त्याचीच साधना करा.**

म्हणून भगत्प्रेमाच्या प्राप्तीसाठी अशा भगवत्प्रेमी महापुरुषांच्या संगाचीच प्रबल इच्छा करा. भगवंताच्या कृपेने प्रेमी असे संत भेटतील आणि संत-भेटीच्या सामर्थ्यानेच आपण पाप व ताप यांतून सुटून, निर्मळ असे भगवत्प्रेम प्राप्त करून घेऊ शकू. यामध्ये एक मोठे रहस्य आहे. असे समजा

की एक महान प्रतापी राजा आहे, आणि त्या बरोबरच तो फार मोठा प्रेमीसुद्धा आहे. परंतु प्रेम हे काही प्रत्येकाशी असत नाही. राजसभेमध्ये आणि आपल्या राज्यात राजा आपला प्रभाव आणि ऐश्वर्य खूप दाखवू शकतो; परंतु आपल्या तोंडाने तो आपल्या प्रेमाचे रहस्य कुणाच्याहीपुढे सांगू शकत नाही. प्रजा म्हणून नियमांना धरून, आपण त्याची गाठ घेऊन, त्याच्याशी विधिवत् गोष्टी बोलू शकतो; परंतु आपण तर त्याला प्रेमाचे रहस्य विचारू शकत नाही, तसेच तो ते रहस्य आपणास सांगूही शकत नाही. त्याच्या प्रेमाचे रहस्य जाणायचे असेल अथवा त्याच्या प्रेमाच्या राज्यात प्रवेश करायचा असेल तर त्याच्या एखाद्या अनन्य प्रेमीची संगत करावी लागेल की ज्याच्याबरोबर राजाचा व्यक्तिगत असा प्रेमाचा निर्मळ (राज्य कारभारापेक्षा पलीकडचा) संबंध आहे आणि ज्याच्या बरोबर तो राजा परस्पर मोकळी प्रेमचर्चा करतो आणि त्याच्या हृदयात आपल्याविषयी विश्वास उत्पन्न करून, त्याचे मार्फत राजाच्या प्रेमाचे रहस्य जाणावे लागेल, आणि त्याच्या मार्फतच आपला प्रेमसंदेश राजाजवळ पोहोचवावा लागेल, तसेच आपली पात्रता सिद्ध करावी लागेल. मग राजा जेव्हा आपणास पात्र समजू लागेल तेव्हा तो आपणाससुद्धा त्या प्रेमी माणसाप्रमाणेच प्रेमाच्या मैफिलीत सामील करून घेईल. याच प्रकारे भगवान् सुद्धा आपल्या प्रेमाचे रहस्य आपल्या मुखाने सांगत नाही. उद्धवाला प्रेमाचे शिक्षण देण्यास भगवंताने गोपींच्या जवळ पाठविले होते. आपल्या प्रियतमाचे रहस्य आणि त्याच्या प्रेमविषयक गुह्यतम गोष्टी या ज्या प्रमाणे त्याच्या प्रियतमेच्या द्वाराच तिच्या विश्वासू मैत्रिणींना कळतात, त्या प्रमाणे भगवंताच्या प्रेमाचे रहस्यसुद्धा भगवत्प्रेमी भक्तांच्या द्वाराच साधकाला कळते, आणि भगवंत ज्याला पात्र समजून, कृपा करून, आपल्या प्रेमाचे रहस्य देण्याची इच्छा करतो, त्यालाच ते रहस्य प्राप्त होते. कारण प्रेमी भक्त हे प्रेमास्पद अशा प्रियतम भगवंताच्या

इच्छेशिवाय किंवा त्याच्या आज्ञेशिवाय,त्या भगवंताच्या प्रेमाचे रहस्य कुणापुढेही उघडे करू शकत नाहीत. प्रथम साधकाला पात्र व्हावे लागते. जेव्हा भगवंताच्या निर्मळ व अत्युच्च प्रेमाची ऐकांतिक आकांक्षा त्याच्या मनात उत्पन्न होते, तेव्हा त्याचे हृदय भगवत्- प्रेमासाठी रडू लागते. त्याच्या हृदयाचा आर्त नाद अंतर्यामी असणारा आनंदमय प्रभू ऐकतो आणि मग तेव्हा कृपा करून, तो भगवंत आपल्या कोणातरी प्रेमी भक्ताला आदेश किंवा संकेत देऊन, त्याच्या संगतीत पाठवितो. तेथे प्रथम त्याच्या प्रेमाची परीक्षा होते. जर त्याचे प्रेम कामना-रहित आणि अनन्य असेल आणि तो आपले आचरण आणि व्यवहार यांचे द्वारा त्या प्रेमी भक्तांच्या हृदयांमध्ये आपल्या पात्रतेचा विश्वास निर्माण करील, तर ते प्रेमी भक्त त्याचा संदेश भगवंताच्या जवळ पोहोचवतात, आणि मग भगवंताची आज्ञा प्राप्त करून घेऊन, ते क्रमाने प्रेमाचे रहस्य त्याच्यासमोर उघडे करतात, आणि नंतर हळू हळू जसजशी त्याची पात्रता वाढत जाते, तसतसे भगवंताच्या आज्ञेने ते प्रेमी भक्त त्या साधकाला भगवंताच्या प्रेमाच्या राज्यात उत्तरोत्तर पुढे घेऊन जातात; शेवटी त्याच्यावर भगवंताची पूर्ण कृपा झाल्यामुळे तो साधक भगवत्प्रेम प्राप्त करून घेतो. राजा किंवा त्याचा प्रेमी हे तर अंतर्यामी नसल्यामुळे कोणाच्या तरी जाळ्यात सापडू शकतात; परंतु भगवान् आणि भगवंताच्या इच्छेने नियुक्त झालेले प्रेमी भक्त हे कधीही धोका खात नाहीत. म्हणून ज्याला भगवत्प्रेमाच्या प्राप्तीची इच्छा असेल, त्याला देवर्षींने सांगितलेल्या साधनामध्ये तत्पर होऊन, प्रथम पात्र बनावयास हवे. त्यामुळे त्याच्यावर भगवंताची कृपा होईल आणि तो भगवत्प्रेमी पुरुषांच्या संगतीला पात्र समजला जाईल. याच्याबरोबरच अशा भगवत्प्रेमी पुरुषांच्या संगाची इच्छा मोठ्या प्रमाणात वाढावयास हवी; कारण या संगाशिवाय भगवत्प्रेमाची प्राप्ती अतिशय कठीण आहे. यामुळेच भगवान् हा आपल्या

निर्मळ भगवत्प्रेमाच्या प्रचारासाठी अशा भक्तांना- ते मुक्तीचे पूर्ण अधिकारी असूनसुद्धा, त्यांच्या मनात प्रेमाची वासना जागृत ठेवून- सायुज्य मुक्ती देत नाही, आणि यामुळेच प्रेमी भक्तगण हे या भगवंताच्या प्रेम लीलेच्या सुखाला सोडून, मुक्तीची इच्छा कधीच करीत नाहीत. ते प्रेमी भक्त मुक्त झाल्यावरसुद्धा, केवळ प्रेम वाटण्यासाठी या जगात येतात अथवा निवास करतात. ते अकारण कृपाळू असतात. आपली तीव्र इच्छा त्यांच्या मार्फत पोचेल तर भगवंताच्या कृपेचा संदेश मिळाल्यावर, ते आपल्या पुण्यमय अशा दर्शन-स्पर्शन-भाषण यांचे द्वारा आणि आपल्या मोठ्या कृपेने ते आपणांस नक्कीच प्रेमदान करतील. कारण ते प्रेमी माणसांच्या शोधातच असतात. प्रेम-दान करणे हेच तर त्यांचे काम आहे. म्हणून भगवंताच्या संगात असणाऱ्या अशा त्या प्रेमी महानुभवांचा संग प्राप्त करून घ्या, त्यांच्या कृपेची इच्छा धरा.

* * *

# प्रेमरूप भक्तीमध्ये कुसंगती ही मुख्य बाधा आहे

**दु:सङ्ग: सर्वथैव त्याज्य: ॥४३॥**

**४३- दु:संगाचा संपूर्णपणे त्याग करावयास हवा.**

सत्संगाचे महत्त्व सांगून झाल्यावर, आता देवर्षी नारद हे दु:संगाचा निषेध करीत आहेत. ज्याप्रमाणे सत्संगामुळे भगवत्कथा, भगवत्-चर्चा, भगवन्नाम, भगवत्-प्रीती, सदाचार, शास्त्र, विवेक, वैराग्य, सत्-अभ्यास, सेवा, सरलता, नम्रता, क्षमा, तितिक्षा, शौच, दया, अहिंसा, सत्य, ब्रह्मचर्य, निरभिमानता आणि शांती इत्यादींच्याकडे माणसाची प्रवृत्ती होते, त्याचप्रमाणे सत्संगाच्या विपरीत असणाऱ्या दु:संगामुळे विषय-वार्ता, जगत्-चर्चा, लोकनिंदा, भोगप्रीती, दुराचार, उच्छृंखलपणा, अविवेक, विषय-लोलुपता, दुष्ट अभ्यास, मान, दंभ, क्रोध, असहिष्णुता, अपवित्रता, निर्दयता, हिंसा, असत्य, इंद्रिय-लंपटता, अभिमान आणि अशांती इत्यादीकडे प्रवृत्त होऊन, मनुष्य पाप-परायण आणि अत्यंत विषयासक्त होऊन जातो. दु:संगामुळे आसुरी संपत्तीचे सर्व दुर्गुण आणि दुराचार यांचा विकास आणि विस्तार होतो. दु:संगामुळे मनुष्याच्या सर्व सद्गुणांचा नाश होऊन त्याचा सर्वनाश होऊन जातो. अत्यंत सुशील, स्नेहपूर्ण, प्रेमाची प्रतिमा असलेली राणी कैकेयी ही मंथरेच्या कुसंगतीच्या कारणामुळेच महाराज दशरथ, भरत यांच्या, आपल्या आणि संपूर्ण अयोध्यावासी जनांच्या अतिशय शोकाचे कारण बनली होती, आणि यामुळेच तिला शेवटी दु:खप्रद वैधव्य सहन करणे, आणि प्राणप्रिय

अशा भरताच्या अप्रीतीस पात्र होऊन राहाणे भाग पडले होते. शकुनीची कुसंगती हीच महाभारतीय भयानक संहाराचे एक मुख्य कारण झाली. श्रीमद्‌भागवतात कपिलदेव हे देवहूती मातेला सांगतात-

**यद्यसद्भिः पथि पुनः शिश्नोदरकृतोद्यमैः ।**
**आस्थितो रमते जन्तुस्तमो विशति पूर्ववत् ॥**
**सत्यं शौचं दया मौनं बुद्धिः श्रीर्ह्रीर्यशः क्षमा ।**
**शमो दमो भगश्चेति यत्सङ्गाद्याति संक्षयम् ॥**
**तेष्वशान्तेषु मूढेषु खण्डितात्मस्वसाधुषु ।**
**सङ्गं न कुर्याच्छोच्येषु योषित्क्रीडामृगेषु च ॥**

" जो माणूस हा शिश्नोदर-परायण (स्त्री आणि धन यातच आसक्त) असणाऱ्या अशा नीच पुरुषांचा संग धरून, त्यांच्या प्रमाणे वर्तन करू लागतो, तो त्यांच्याप्रमाणेच अंधकारमय नरकांत जातो. कारण दुष्टाच्या संगामुळे सत्य, पवित्रता, दया, मननशीलता, बुद्धी, लज्जा, श्री, कीर्ती, क्षमा, मनाला ताब्यात ठेवणे, इंद्रियांना नियंत्रणात ठेवणे, आणि ऐश्वर्य इत्यादी सर्व गुण नष्ट होऊन जातात. म्हणून त्या अशांतचित्त, मूर्ख, नष्टबुद्धी, स्त्रियांच्या हातचे खेळणे बनलेल्या, शोचनीय, असाधु अशा दुष्ट माणसांचा संग केव्हाही करू नये." म्हणून दुःसंगाचा त्याग हा तर सर्वांच्यासाठी आवश्यक आहे. त्यातल्या त्यात भगवत्प्रेमाची इच्छा करणाऱ्या माणसांनी तर दुःसंगाचा त्याग अतिशयच सावधानपणाने करावयास हवा. भगवान् श्रीरामचंद्रांनी बिभीषणाला सांगितले आहे-

**बरु भल बास नरक कर ताता । दुष्ट संग जनि देइ बिधाता ॥**

"हे बिभीषणा, नरकात राहाणेही चांगले आहे. परंतु विधात्याने कधी दुष्ट संग आपणास देऊ नये." दुष्ट संग हा केवळ दुराचारी माणसांचाच संग असे समजू नये. जो विषय आपल्या मनात वाईट विचार तसेच विषयांची

लालसा निर्माण करेल आणि जो भगवत्प्राप्तीच्या मार्गावरून आपल्या मनाला विचलित करेल, असा इंद्रियांचा कोणताही विषय हा दुःसंग होऊ शकतो. कोणतीही अशी चेतन वस्तू किंवा जड दृश्य आपण पाहू नये, अशी कोणतीही गोष्ट आपण ऐकू नये, अशी कोणतीही चर्चा करू नये, अशा कोणत्याही स्थानामध्ये जाऊ नये, असे कोणतेही पुस्तक वा पत्रिका वाचू नये, असे कोणतेही चित्र पाहू नये, अशी कोणतीही वस्तू खाऊ नये, अशा कोणत्याही वस्तूचा स्पर्श वा वास घेऊ नये, आणि असा कोणताही विचार करू नये की ज्यामुळे आपल्या चित्तात विषयाच्या चिंतनाचे प्राबल्य निर्माण होईल. हे लक्षात ठेवावे की मनुष्याच्या चांगल्या अगर वाईट भावनांची उत्पत्ती आणि वाढ यासाठी कमीत कमी या दहा गोष्टी प्रधान कारण असतात:- १. स्थान २. अन्न ३. जल ४.परिवार ५. आजूबाजूची परिस्थिती ६. दृश्य ७. साहित्य ८. विचार ९. उपजीविकेचे काम आणि १०. उपासना. जर हे सर्व सात्त्विक असतील तर त्यांच्या सेवनाने सात्त्विकता वाढते. त्यांचे सेवन हे सत्संग आहे. आणि जर हे राजस अथवा तामस असतील तर त्यांचे सेवन हा दुःसंग होतो आणि त्यामुळे अज्ञानाची वृद्धी होऊन, दोषांचा विकास होतो. म्हणून दुःसंगाचा सर्व प्रकारे त्याग करावयास हवा.

**कामक्रोधमोहस्मृतिभ्रंशबुद्धिनाशसर्वनाशकारणत्वात् ॥४४॥**

**४४- कारण तो (दुःसंग हा) काम, क्रोध, मोह, स्मृतिभ्रंश, व बुद्धिनाश अशा क्रमाने सर्व नाशाचे कारण होतो.**

भगवंताशी संबंधित तत्त्वरहस्य तसेच त्याची लीला व कथा सोडून, भोगाच्या वेळी इंद्रियांना तृप्ती देणाऱ्या लौकिक विषयांचे चिंतनच सर्व नाशाचे मूळ आहे. सतत किंवा पुष्कळ वेळ चित्त हे ज्या विषयाचे चिंतन करते, त्या विषयात त्या चित्ताची आसक्ती उत्पन्न होते. दुःसंगामुळे - (म्हणजे सांसारिक

विषय, आणि विषयी पुरुषांचे शरीर, वाणी आणि मन यांचेद्वारा केल्या गेलेल्या संगामुळे)- स्वाभाविकपणेच विषयांतील आसक्ती वाढते. आसक्तीमुळे कामना उत्पन्न होते; ही कामनाच सर्व पापांचे मूळ आहे. कामनेच्या तृप्तीमुळे अधिक प्राप्तीसाठी लोभ निर्माण होतो, आणि तृप्ती न झाल्यास तीच कामना क्रोधाच्या रूपात परिणत होऊन जाते. म्हणून श्रीमद् भगवद्गीतेमध्ये भगवान् श्रीकृष्णाने रागरूपी किंवा आसक्तिरूपी रजोगुणापासून उद्भूत होणाऱ्या कामालाच पापे होण्यामध्ये मुख्य कारण म्हणून सांगितले आहे. अर्जुनाने विचारले, " भगवन्, मनुष्याची इच्छा नसतानासुद्धा, जरबदस्तीने जणू तो पकडला गेल्याप्रमाणे, कोणाच्या प्रेरणेने मनुष्य पाप करतो ? " या प्रश्नाच्या उत्तरात भगवान् स्पष्ट करतात-

**काम एष क्रोध एष रजोगुणसमुद्भवः ।**
**महाशनो महापाप्मा विद्ध्येनमिह वैरिणम् ।।**

(श्रीमद्भगवद्गीता ३/३७)

" रजोगुणापासून निर्माण झालेला हा काम हाच क्रोध आहे; या महापापी कामाचे पोट कधीच भरत नाही. या बाबतीत या कामालाच तू पाप करवणारा आपला शत्रू समज."

जरी कामामुळे लोभ आणि क्रोध हे दोन्हीही उत्पन्न होतात, तरी संसारात मनाप्रमाणे थोडीच कामनांची पूर्ती होते, जास्त प्रमाणात तर विफलताच प्राप्त होते. विफलतेमुळे क्रोध उद्भूत होतो. क्रोधाची उत्पत्ती झाल्यानंतर मनुष्य विवेक व विचार यांनी रहित होऊन जातो. त्याला हित-अहित काहीच समजेनासे होते; तो पिशाच्चाप्रमाणे केवळ विनाशाचाच प्रयत्न करतो. या मोहामुळे त्याची स्मृती नष्ट होऊन जाते, आणि स्मृती नष्ट झाल्यावर बुद्धी मारली जाते. बुद्धी नष्ट झाल्यावर, तो माणूस हा इहलोक आणि परलोक यांच्या कल्याणकारी मार्गावरून भ्रष्ट होतो-- त्याचा सर्वनाश होतो. बरोबर

हीच गोष्ट श्रीभगवंतांनीसुद्धा गीता अध्याय २ श्लोक ६२-६३ मध्ये सांगितली आहे-

ध्यायतो विषयान् पुंसः सङ्गस्तेषूपजायते ।
सङ्गात्संजायते कामः कामात्क्रोधोऽभिजायते ॥
क्रोधाद्भवति संमोहः संमोहात्स्मृतिविभ्रमः ।
स्मृतिभ्रंशाद् बुद्धिनाशो बुद्धिनाशात्प्रणश्यति ॥

"विषयांच्या चिंतनामुळे मनुष्याची विषयांमध्ये आसक्ती उत्पन्न होते; आसक्तीमुळे कामना निर्माण होते; (कामनांच्या तृप्तीत बाधा आल्यामुळे) त्या कामनांपासूनच क्रोध उद्‌भूत होतो; क्रोधामुळे संमोह होतो, संमोहामुळे स्मृतिभ्रंश होतो, स्मृतिभ्रंशामुळे बुद्धिनाश होतो, आणि बुद्धिनाशामुळे पुरुषाचा सर्वनाश होऊन जातो."

सर्वनाशाला कारणीभूत असणारे असे विषयांचे चिंतन होण्यामध्ये विषय आणि विषयी पुरुषांचा संग हेच प्रधान आहेत. हाच दुःसंग आहे. म्हणून या दुःसंगाचा सर्वथा त्याग करावयास हवा.

**तरङ्गायिता अपीमे सङ्गात्समुद्रायन्ति ॥४५॥**

**४५- हे (काम, क्रोध, इत्यादी) पहिल्या तरंगाप्रमाणे लहान आकारात येऊनसुद्धा (दुःसंगामुळे विशाल) समुद्राचा आकार धारण करून घेतात.**

जोपर्यंत दोषांचा मुळासकट विनाश होणार नाही, तोपर्यंत थोड्याशासुद्धा दोषाला भिऊनच राहावयास हवे. जसे:- इंधनामध्ये दडपून गेलेली लहानशी अग्नीची ठिणगी ही हवेच्या जोरामुळे विशाल अग्नीचे रूप धारण करते, त्याप्रमाणे दबून असलेला जरासासुद्धा दोष हा कुसंग मिळताच विकसित होऊन विशाल रूप धारण करतो. प्रथम प्रथम जेव्हा मनामध्ये काम-क्रोधाचा विकार उत्पन्न होतो, तेव्हा तर त्याची जणू एक लहरच येते; परंतु

कुसंग प्राप्त होताच ती लहर समुद्र बनते; मग चारी बाजूंनी साऱ्या हृदयावर त्याचाच अधिकार होतो; सद्विचाराच्या प्रवेशालासुद्धा जागा राहात नाही; त्यामुळे सर्वनाशच होतो. म्हणून असे समजू नये की आपल्यामध्ये सद्गुण अधिक आहेत आणि दोष कमी आहेत, यामुळे कुसंगाने आपली काय हानी होईल बरे ? या उलट सदा सर्वदा अत्यंत सावधानपणाने सर्व प्रकारांनी कुसंगाचा त्यागच करावयास हवा.

* * *

# मायेतून कोण तरतो ?

**कस्तरति कस्तरति मायाम्, यः सङ्गांस्त्यजति यो महानुभावं सेवते, निर्ममो भवति ॥४६॥**

**४६- (प्रश्न:-) कोण तरतो ? (दुस्तर) मायेतून कोण तरतो ? (उत्तर:-) जो सर्व संगांचा त्याग करतो, जो महानुभवांची सेवा करतो, आणि जो ममता-रहित होतो, (तो मायेतून तरून जातो)**

नदीमध्ये पोहणाऱ्या माणसासाठी सर्वांत अधिक आवश्यक काय असते की त्याने हात व पाय हालवत पाणी दूर करीत राहाणे, सतत पाण्याला बाजूला सारत जाणे; तेव्हाच नवीन पोहणारा नदीच्या पलीकडे जाऊ शकतो. जर त्याने पाणी बाजूला सारणे सोडून दिले तर तो तत्काळ बुडून जाईल. याचप्रमाणे ही महाभयावह, दुस्तर अशी मायानदी तरून पलीकडे जाण्याची जो इच्छा करतो, त्याने अहंकार आणि विषयासक्ती हे स्वरूप असणारे पाणी योग्य पद्धतीने अलग करत राहावयास हवे. अहंकार आणि आसक्ती हे स्वरूप असणाऱ्या पाण्यानेच ही मायानदी भरलेली आहे. जो कुणी मनुष्य अहंकार आणि आसक्ती यांना दूर लोटू शकत नाही, त्यांचा त्याग करण्याची इच्छा जो करीत नाही, तो मायानदीच्या पाण्यात रमून जाऊन अतलतलामध्ये बुडून जाईल. म्हणून संगाचा त्याग अवश्य करावयास हवा. परंतु (माया- नदीच्या पाण्यात) हात पाय मारता मारतासुद्धा तो थकून जाणे किंवा श्वास तुटून जाणे हे संभवनीय आहे. म्हणून अधून मधून असा आधार हवा की जेथे काही काळ राहून तो विश्रांती घेऊ शकेल. या मायानदीमध्येसुद्धा केवळ संगाच्या त्यागाने काम भागत नाही, तर तिच्यातसुद्धा विश्रांतीची स्थाने हवीत. ती विश्रांतीची

स्थाने म्हणजे संतांची अमृतमय वचनेच होत. त्यांच्या आधाराने पोहणाऱ्याला नवीन बळ प्राप्त होते, आणि त्या बळामुळे तो मनुष्य मायारूपी समुद्राच्या पलीकडे पोचू शकतो. खरे सांगायचे तर संतांची सेवा करणाऱ्या साधकाला आपल्या सामर्थ्यानेच तरून जाणे हे लागूच पडत नाही; तो तर संत महानुभावांच्या कृपारूपी बळकट जहाजावर स्वार होऊन अनायासेच तरून जातो. म्हणून देवर्षी नारद हे महानुभाव लोकांची सेवा करण्यास सांगतात.

श्रीमद्भागवतात भगवान सांगतात--

**निमज्ज्योन्मज्जतां घोरे भवाब्धौ परमायनम् ।**
**सन्तो ब्रह्मविद: शान्ता नौर्दृढेवाप्सु मज्जताम् ॥**

(११/ २६/ ३२)

"पाण्यात बुडणाऱ्या लोकांच्यासाठी बळकट नौकेप्रमाणे, या भयंकर संसार सागरात गोते खाणाऱ्या लोकांच्यासाठी ब्रह्मवेत्ते, चित्त शांत असणारे, असे संतजनच श्रेष्ठ आधार आहेत."

महानुभाव अशा संतांची सेवा केल्याने पापाचा ताप, आणि मोह हे अनायासेच दूर निघून जातात.

**यथोपश्रयमाणस्य भगवन्तं विभावसुम् ।**
**शीतं भयं तमोऽप्येति साधून् संसेवतस्तथा ॥**

(११/२६/३१)

"ज्याप्रमाणे भगवान् अग्निदेवाचा आश्रय घेतल्यावर थंडी, भय आणि अंधकार या तिहींचाही नाश होऊन जातो, त्याप्रमाणे संत पुरुषांची सेवा केल्यामुळे पापरूपी थंडी, जन्ममृत्यूरूपी भीती आणि अज्ञानरूपी अंधकार हे काहीही शिल्लक राहात नाहीत."

निर्मळ अशा भक्तीच्या प्राप्तीसाठी तर महापुरुषांच्या चरणांची सेवाच मुख्य आहे. श्रीमद्भागवतामध्ये भक्तराज प्रह्लाद आणि ज्ञानी लोकांतील श्रेष्ठ

अवधूत शिरोमणी असा जड भरत यांची वचने आहेत-

नैषां मतिस्तावदुरुक्रमाङ्घ्रिं
स्पृशत्यनर्थापगमो यदर्थः ।
महीयसां पादरजोऽभिषेकं
निष्किञ्चनानां न वृणीत यावत् ॥

(७/५/३२)

रहूगणैतत्तपसा न याति
न चेज्यया निर्वपणाद् गृहाद्वा ।
न च्छन्दसा नैव जलाग्निसूर्यै-
र्विना महत्पादरजोऽभिषेकम् ॥

(५/१२/१२)

प्रह्लाद सांगतो- अहो पिताजी, ज्या भगवान श्रीहरीच्या चरणांचा स्पर्श हा समस्त अनर्थांची निवृत्ती करणारा आहे, त्या श्रीहरिचरणांचे ठिकाणी तोपर्यंत प्रेम उत्पन्न होत नाही, जोपर्यंत अकिंचन (= भगवंताला सर्व काही अर्पण करून चुकलेले) साधू, महान्, अशा पुरुषांच्या चरण धूळीने मस्तकावर अभिषेक केला जात नाही.

महात्मा जड भरत रहूगणाला सांगतो-

" हे रहूगण, भगवंताच्या तत्त्वाचे हे ज्ञान आणि भगवत्प्रेम या गोष्टी तप, यज्ञ, दान, गृहस्थाश्रमात राहून केलेला परोपकार, वेदाध्ययन, तसेच पाणी, अग्नी आणि सूर्य यांची उपासना यापैकी कशानेही मिळत नाहीत. हे भगवत्-प्रेम आणि भगवंताच्या तत्त्वाचे ज्ञान तर महापुरुषांच्या चरणांवरील धुळीत स्नान केल्यामुळेच म्हणजे त्यांची चरणसेवा केल्यामुळेच मिळणार आहे."

परंतु येथे इतके लक्षात ठेवावे की महापुरुषांची सेवा याचा अर्थ केवळ

त्यांच्या सांनिध्यात राहाणे अथवा त्यांच्या शरीराची सेवा करणे असाच मात्र करावयाचा नाही. तिचीसुद्धा यथायोग्य आवश्यकता आणि सार्थकता आहे; परंतु जोपर्यंत आपण त्यांच्या आज्ञेनुसार क्रिया करीत नाही, त्यांच्या इशाऱ्यावर चालत नाही तसेच त्यांच्या आवडीप्रमाणे आपले जीवन घडवीत नाही, तोपर्यंत सेवेमध्ये त्रुटीच आहे असे समजावयास हवे. म्हणून ही गोष्ट समजून घेऊन, सर्वदा आणि सर्व प्रकारे महानुभाव पुरुषांची सेवा करावयास हवी.

परंतु या सेवेमध्ये ही एक मोठी अडचण आहे. ममतेच्या बंधनामुळे संतसेवासुद्धा होऊ शकत नाही. माझे घर, माझे शरीर, माझा परिवार, माझे धन, माझे संबंधी, मित्र इत्यादी, माझे घर, माझी जमीन– अशा प्रकारे " माझे माझे " म्हणणारा जीव हा अगणित बंधनामध्ये बांधला गेलेला आहे; या ममतेचे बंधन तोडावयास हवे. सत्संग आणि संतांची सेवा हाच जणू मणिदीप होय.त्याच्या प्रकाशाच्या योगे ममतारूपी अंधकारमय रात्रीचा अंधकार हा पुष्कळच कमी होऊन जातो, हे निश्चित. तथापि संतसंगामध्ये जाण्यासाठीसुद्धा प्रथम ममता ही कमी करण्याची आवश्यकता आहे. म्हणून संसारातील या ममत्वाच्या विषयांना दु:खरूप, अनित्य आणि अज्ञानमूलक असे समजून त्यांच्या बाबतीत " माझा " हा भाव संपूर्णपणे टाकावयास हवा. असे समजावयास हवे की या संसारात "माझे" असे काहीही नाही. ज्या शरीराला मनुष्य "माझेच", इतकेच नव्हे तर त्या शरीराला "मी" असे म्हणत असतो, ते शरीरसुद्धा नष्ट होऊन जाते, तर मग अन्य वस्तूंचे ठिकाणी "माझे-पण" मानणे हा तर मूर्खपणाच आहे. मायेतून तरून जाण्यासाठी या माझे-पणाचा नाश जरूर करावयास हवा. जो पुरुष असे करतो तो माया तरून जातो.

**यो विविक्तस्थानं सेवते, यो लोकबन्धमुन्मूलयति, निस्त्रैगुण्यो भवति, योगक्षेमं त्यजति ॥४७॥**

४७– जो निर्जन स्थानामध्ये निवास करतो, जो लौकिक बंधने

तोडून टाकतो, जो तीन गुणांच्या पलीकडे जातो आणि योग आणि क्षेम यांचा संपूर्ण त्याग करतो.

मायेतून तरून जाण्यास मागील सूत्रात तीन उपाय सांगितले गेले होते; आता या सूत्रात चार उपाय सांगितले जात आहेत, आणि पुढील दोन सूत्रांमध्ये क्रमाने पाच उपाय किंवा लक्षणे सांगितली जातील.

ममत्वाचे विषय असणाऱ्या वस्तूंमध्ये रात्रंदिवस राहिल्यामुळे ममतेचा त्याग होत नाही, उलट संगाने तर ममता वाढते; म्हणून साधकाने एकांताचे सेवन करावयास हवे. भगवंतांनी सुद्धा गीतेत **विविक्तदेशसेवित्वमरतिर्जनसंसदि ॥** (१३/१०) या शब्दांनी "एकांतस्थानी राहाणे आणि माणसांच्या गर्दीवर प्रीती न ठेवणे" यांची आज्ञा दिली आहे. मनुष्य हा साधन करण्याची कितीही खटपट करू दे, तरी जोपर्यंत तो विषय-वासनांनी जखडलेल्या जनसमुदायात आणि मोहक विषयांनी भरलेल्या स्थानांमध्ये राहील, तोपर्यंत भगवंताच्या ठिकाणी त्याचे मन लागणे हे फार कठीण आहे. म्हणून साधकाने एकांत स्थानी राहून भक्तीचे साधन करावे, असे सांगितले गेले आहे. त्या बरोबरच भगवंताशी प्रेमाचे बंधन बांधण्यासाठी, लोक-बंधन तोडणे हे आवश्यक आहे. एकांत स्थानाचे सेवन केल्यामुळे लोकसंग हा सुटत असल्याकारणाने लोकबंधन हे आपणहूनच ढिले होऊन जाईल. याखेरीज भगवंताचे रहस्य, प्रभाव आणि तत्त्व यांच्या बरोबर म्हणजे त्यांच्याशी मृत्युमय आणि दु:खालय अशा या लोकाची तुलना करून, वारंवार विचार केल्यावर, लोकबंधन आपणहूनच तुटून जाते.

याचेनंतर भक्तीच्या साधकाला सत्त्व, रज आणि तम या तीन गुणांच्या पलीकडे जाणे भाग पडते. या तीन गुणांनीच संसाराचा प्रकाश होत असतो. गुणांचेच कार्य म्हणजे हा असार संसार आहे; म्हणून या सांसारिक पदार्थांमध्ये अनासक्ती किंवा विरक्ती असणे हेच निस्त्रैगुण्य अथवा असंसारी

होणे आहे. जो माणूस विषयासक्त आणि विषयांची इच्छा करणारा आहे, तोच गुणांनी बद्ध होतो, आणि जो माणूस भगवंतामध्ये आसक्त आणि भगवत्प्रेमी असतो तोच निस्त्रैगुण्य असतो. जो मनुष्य निस्त्रैगुण्य होईल, तो योगक्षेमाची चिंता का बरे करू लागेल ? संसारात तर त्याला कोणतेच प्रलोभन नाही; कारण तो निस्त्रैगुण्य आहे आणि मोक्षसिद्धीच्या इच्छेपासूनसुद्धा तो निरिच्छ आहे; कारण तो भगवंताचा प्रेमी आहे. अप्राप्त पदार्थाच्या प्राप्तीला योग असे म्हणतात, आणि प्राप्त पदार्थाच्या संरक्षणाला क्षेम म्हणतात. यांमध्ये केवळ भोजन, आच्छादन यांचा भावच नाही; पारमार्थिक अर्थाने तर योगाचा अर्थ हा भगवत्प्राप्ती अथवा भगवत्प्राप्तीचे सफल साधन असा आहे, आणि क्षेमचा अर्थ आहे भगवत्प्राप्तीच्या साधनांचे संरक्षण. प्रेमी भगवद्भक्त हा या दोन्हीही अर्थांनी योगक्षेमाची परवा करीत नाही; तो तर भगवत्प्रेमामध्येच मग्न राहून भगवंताच्या प्रेरणेने सदा सर्वदा भगवंताला अनुकूल असे स्वाभाविक कर्म करीत राहातो. भक्ताचा योगक्षेम स्वत: भगवानच चालवितात. श्रीभगवंताने गीतेत स्वत:च सांगितले आहे-

अनन्याश्चिन्तयन्तो मां ये जनाः पर्युपासते ।
तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम् ॥

(९/२२)

"जे अनन्य भक्त निरंतर माझे चिंतन करीत, माझी निष्काम उपासना करतात, अशा त्या माझ्या ठिकाणी नित्य चिकटून राहिलेल्या भक्तांचा योगक्षेम मी स्वत:च चालवीत असतो." *

---

१. श्रीजगन्नाथपुरीमध्ये एक सरळ हृदयाचा सदाचारी ब्राह्मण आपल्या परिवारासह राहात होता. त्याचे गीतेवर फार प्रेम होते; तो रात्रंदिवस गीतेचे अध्ययन व मनन करीत असे. त्याचा सकाम भाव अद्यापि दूर गेलेला नव्हता हे खरे. परंतु तो फार विश्वास ठेवणारा होता. एके दिवशी गीतेतील प्रत्येक शब्दाचा क्रियात्मक अर्थ पाहाण्याची त्याला इच्छा झाली.

भोजन इत्यादींची चिंता तर सामान्य विश्वास ठेवणाऱ्या अशा भक्ताने सुद्धा करू नये. जो कोणी भोजन इत्यादीसाठी भगवंतावर विश्वास न ठेवता, न्याय आणि सत्य मार्ग तसेच सदाचार सोडून पापाला शरण जातो, तो तर एक प्रकाराने नास्तिकच असतो, असे सांगितले आहे-

**भोजनाच्छादने चिन्तां वृथा कुर्वन्ति वैष्णवा: ।**
**योऽसौ विश्वम्भरो देव: स किं दासानुपेक्षते ।।**

" वैष्णव भक्त हे आहार इत्यादीसाठी व्यर्थच चिंता करतात. जो भगवंत सर्व विश्वातील सकल जीवांचे भरण व पोषण करतो, तो आपल्या सेवकांना कधी विसरू शकेल काय ?

---

गीतेचा पाठ करते वेळी जेव्हा उपर्युक्त श्लोकातील **वहाम्यहम्** हा शब्द आला, तेव्हा तो ब्राह्मण विचार करू लागला की भगवंत आपल्या भक्तासाठी खरेच आवश्यक वस्तू स्वत:च वाहून आणून त्या वस्तू त्या भक्ताच्या घरी पोहोचवतात काय ? नाही, नाही, असे होऊ शकणार नाही. भगवंत कोणत्या तरी दुसऱ्या साधनाने वस्तूंचा संग्रह करून देत असतील. असा विचार करून ब्राह्मणाने **वहाम्यहम्** शब्दाचा अर्थ नीट बसत नाही असे पाहून गीतेतील उक्त पद खोडून टाकून, त्याचे जागी वर **करोम्यहम्** असा शब्द लिहून टाकला.

हा ब्राह्मण भिक्षावृत्तीने जीवन-निर्वाह करीत होता. भगवंताची माया अपार आहे. एक दिवस मुसळधार पर्जन्यवृष्टी होऊ लागली. त्या दिवशी तो ब्राह्मण घरातून बाहेर पडू शकला नाही; यामुळे तो आपल्या परिवारासकट उपाशी राहिला. दुसरे दिवशी पर्जन्य बंद झाल्यावर ब्राह्मण भिक्षा मागण्यास निघाला. तो घरातून भिक्षा मागण्यास निघाला. तो घरातून बाहेर गेल्यावर, काही वेळातच, रक्ताने लडबडलेला असा एक अत्यंत सुंदर बालक ब्राह्मणाच्या घरी येऊन ब्राह्मण-पत्नीला म्हणाला, "पंडितजी महाराजांनी हा प्रसाद पाठविला आहे." बालकाचे मनोहर शरीर पाहून आणि त्याचे गोड वचन ऐकून ब्राह्मणपत्नी मुग्ध होऊन गेली. परंतु त्याच्या शरीरातून रक्त वाहात आहे, हे पाहून तिला फारच दु:ख झाले.अश्रू भरलेल्या डोळ्यांनी तिने विचारले "कोणत्या निष्ठुर माणसाने तुला मारले आहे ?" ब्राह्मणीच्या पतीचे नाव घेऊन, बालकाने सांगितले की "ब्राह्मणाने मला मारले आहे." तेव्हा ब्राह्मणी तर आश्चर्यात बुडून गेली आणि म्हणू लागली, "ते माझे पती तर अत्यंत साधे सरळ, क्रोधरहित आणि भगवंताचे श्रेष्ठ भक्त आहेत; तुझ्यासारखा नयन व मन यांना मोहून टाकणाऱ्या बालकाला

**य: कर्मफलं त्यजति, कर्माणि संन्यस्यति ततो निर्द्वन्द्वो भवति ॥४८॥**

**४८- जो (माणूस ) कर्मफळांचा त्याग करतो, कर्मांचासुद्धा त्याग करतो, आणि तेव्हा सर्व काही टाकून जो निर्द्वंद्व होऊन जातो.**

योगक्षेमाच्या चिंतेचा त्याग करणारा माणूस हा कर्मफळाचा त्याग करणारा असतोच. अथवा योगक्षेमाच्या चिंतेच्या त्यागासाठी कर्मफळाच्या त्यागाची आवश्यकता असते. खरे म्हणजे आता येथून (= या सूत्रापासून) प्रेमी भक्ताच्या लक्षणांचा आरंभ झाला आहे. ही लक्षणे म्हणजे भक्तीच्या साधकांसाठी आदर्श साधने आहेत, आणि सिद्ध अशा प्रेमी भक्तांचे स्वाभाविक गुण आहेत. भक्त हा जे काही करतो, ते तो भगवंतासाठीच करतो, त्याला आपल्यासाठी त्या केलेल्या गोष्टींचे कोणतेही फळ नको असते. त्याची आसक्ती

---

ते का बरे मारतील ?" बालक म्हणाला, "मातोश्री, मी खरेच सांगतो आहे. त्यांनीच एका शूलाने माझे शरीर चिरून टाकले आहे. त्यांनी असे का केले ही गोष्ट तर त्यांनाच ठाऊक."

इतके सांगून आणि प्रसाद ठेवून बालक तेथून निघून गेला. ती ब्राह्मणस्त्री विमनस्क झाल्यामुळे तिला तो निघून गेल्याचा पत्ताही लागला नाही. काहीही न समजल्याने, ती अतिदु:खित मनाने पती घरी येण्याची वाट पाहू लागली. योग्य वेळी ब्राह्मण घरी परत आला. विनयपूर्वक परंतु रोष आणि विषाद यांनी भरलेल्या शब्दांनी ब्राह्मणीने सारा वृत्तांत ब्राह्मणाला ऐकवला. पत्नीचा वृत्तांत ऐकून पंडितजी अवाक् होऊन गेले. गीतेच्या श्लोकावर हरतालाची लेखणी फिरविल्याची घटना आठवून ते व्याकुळ होऊन गेले. त्यांच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहू लागली. ब्राह्मणाला आता समजले की खरोखरच भगवान् स्वत:च आपल्यावर विश्वास ठेवणाऱ्या भक्तासाठी डोक्यावर वाहून आहार इत्यादी पोचवितो. गीता ही भगवंताचे शरीर आहे. गीतेचा श्लोक खोडल्यामुळे भगवंताच्या शरीरावर जखम झाली. आपल्या कर्मांचा पश्चाताप करीत करीत ब्राह्मण मूर्च्छित होऊन जमिनीवर पडला. तेव्हा भगवंताने त्याला दर्शन देऊन कृतार्थ केले. काही वेळानंतर उठून तो भगवंताजवळ क्षमेची याचना करू लागला, आणि भावविव्हळ होऊन, गीतेच्या चारी बाजूला "वहाम्यहम् वहाम्यहम्" असे लिहू लागला.

ही कर्मांतही असत नाही आणि त्या कर्मांच्या फळांमध्येही असत नाही; तो तर एखाद्या यंत्राप्रमाणे कर्म करीत राहातो. परंतु जोपर्यंत त्याला असे स्मरण राहाते की मी यंत्र आहे आणि मी भगवंतासाठी कर्म करीत आहे, तोपर्यंत त्याला कर्मफळाचाच त्याग करणारा असे म्हणता येते. तो कर्मांचा त्याग करणारा खऱ्या अर्थी तेव्हाच होईल की जेव्हा त्याला हेही कळणार नाही की मीसुद्धा काही करीत आहे. जेव्हा मन व बुद्धी यांच्या पूर्ण समर्पणामुळे भगवंताने त्याच्या अहंकाराचे सर्व प्रकारे हरण करून, भगवंत स्वत:च त्याच्या हृदय-मंदिरात बसून, कर्म करण्यास व करविण्यास प्रारंभ करील, तेव्हा तो भक्त कर्मांचा संपूर्ण त्याग करणारा होऊन, तो सर्वप्रकारे निर्द्वंद्व होऊन जाईल. मग त्याचे सुख-दु:ख, लाभ-हानी, आपला-परका, मी-तू, इत्यादी द्वंद्वांशी त्याचे कोणतेही प्रयोजन राहाणार नाही. परंतु जोपर्यंत अशी स्वाभाविक स्थिती होणार नाही तोपर्यंत साधन या स्वरूपात कर्मफळांचा त्याग आणि भगवंताला विरोधी अथवा अनावश्यक अशा कर्मांचा स्वरूपत: त्याग करून, त्याने निर्द्वंद्व होण्याची क्रिया साधावयास हवी. श्रीभगवान् म्हणतात-

**त्रैगुण्यविषया वेदा निस्त्रैगुण्यो भवार्जुन ।**
**निर्द्वन्द्वो नित्यसत्त्वस्थो निर्योगक्षेम आत्मवान् ॥**

(गीता २/४५)

" हे अर्जुना, तीन गुणांचा प्रकाश-स्वरूप असणाऱ्या संसाराला प्रकाशित करणारे वेद आहेत. म्हणून तू निस्त्रैगुण्य अथवा असंसारी (=निष्कामी), सुख-दु:ख इत्यादी द्वंद्वांनी रहित, योगक्षेमाची इच्छा न करणारा, नित्य सत्त्वामध्ये स्थित, आणि परमात्मपरायण होऊन जा.

**वेदानपि संन्यस्यति, केवलमविच्छिन्नानुरागं लभते लभते ॥४९॥**

४९-जो वेदांचासुद्धा चांगल्याप्रकारे परित्याग करून टाकतो

**आणि जो अखंड, असीम असे भगवत्प्रेम प्राप्त करून घेतो.**

साधनाच्या दृष्टीने, उपर्युक्त श्रीमद्भगवद्गीतेच्या श्लोक २/४५ नुसार, तीन गुणांच्या प्रकाशरूप अशा संसाराला प्रकट करणाऱ्या वेदांच्या त्यागाने निष्कामी होणे, हा अर्थ अधिक योग्य आहे. सकाम भावाचा त्याग हाच वेदाचा त्याग आहे. परंतु देवर्षी नारद येथे ज्या प्रेमावस्थेचे वर्णन करीत आहेत, त्या अवस्थेमध्ये तर भक्त हा केवळ, एक, अविच्छिन्न, अखंड अशा भगवत्प्रेमाच्या महासागरात बुडून जाऊन तन्मय होऊन जातो; त्यामुळे त्याचे बाबतीत वेदांचा आश्रय आपोआपच सुटून जातो; त्यामुळे त्याचेकडून पुन: लौकिक अथवा वैदिक अशी कोणतीही क्रिया यथाविधी होऊ शकत नाही. सर्व नियम आपोआप सुटून जाणे हाच या प्रेमाचा एक नियम आहे. हासुद्धा शास्त्रविधीच आहे. या स्थितीमध्ये वेद हे आपल्या अनुयायी माणसाला वेदांचे परम फळ प्राप्त करताना पाहून,त्याच्या अंतिम तृप्तीवर स्वत: तृप्त होऊन, त्याला सोडून देतात. वेदाचा हा त्याग तिरस्कार-मूलक नाही, उलट तो तृप्ति-मूलक आहे. तो जाणून बुजून वेदांना सोडीत नाही, तर वेदच त्याला पूर्णकाम समजून, त्याच्यावरील आपले आधिपत्य काढून घेतात. या अवस्थेमध्ये तो प्रेमीभक्त विधी आणि निषेध यांनी भरलेल्या वेदांना ओलांडून, मग केवळ एका अनिर्वचनीय अशा हरि-प्रेमातच वेडा होऊन राहातो; तो भगवत्प्रेमाची एक जिवंत मूर्ती बनतो. स्वत: भगवंत हेच त्याच्या शरीरात दिव्य प्रेमाच्या रूपात प्रकट होऊन लीला करतात.

**स तरति स तरति स लोकांस्तारयति ॥५०॥**

**५०- तो तरतो, तो तरतो, तो लोकांनाही तारून नेतो.**

देवर्षी नारद हे आनंदाने भरून जाऊन पुकारा करीत आहेत की जो कोणी या प्रकाराने भगवंताच्या प्रेमात वेडा होतो, तो स्वत: तर तरून जातोच, खेरीज तो समस्त लोकांनासुद्धा तारून नेतो. तोच खरा तारणारा होतो. भगवंताने

सुद्धा श्रीमद्‌भागवतात सांगितले आहे- **मद्भक्ति-युक्तो भुवनं पुनाति-** "असा माझा भक्त हा त्रिभुवनाला पवित्र करून टाकतो."

सेहेचाळिसाव्या "सूत्रात मायेतून कोण तरतो," असा प्रश्न करून, येथपर्यंत त्या प्रश्नाचे उत्तर दिले गेले आहे. चार सूत्रांमध्ये प्रेमाचे साधन आणि प्रेमी भक्तांची लक्षणे सांगितली गेली आहेत. आता यापुढे त्या प्रेमाचे स्वरूप सांगितले जाईल आणि ते प्रेम प्राप्त झाल्यावर प्रेमी असे महानुभावांचे समूह हे ही दुर्लभ स्थिती स्वाभाविक गुणांच्या रूपात अनायासेच प्राप्त करून घेतात.

* * *

# प्रेमरूप भक्ती आणि गौणी भक्ती यांचे स्वरूप

**अनिर्वचनीयं प्रेमस्वरूपम् ॥५१॥**

**५१- प्रेमाचे स्वरूप अनिर्वचनीय आहे.**

प्रेम आणि परमात्मा यांमध्ये काहीही फरक नाही. ज्याप्रमाणे वाणीने ब्रह्माचे वर्णन हे असंभवनीय आहे- "जसे नेति नेति" असे म्हणून वेद हे मुके होऊन जातात- त्याप्रमाणे प्रेमाचे वर्णनसुद्धा वाणीचे द्वारा होऊ शकत नाही. संसारात- व्यवहारात- सुद्धा आपण पाहातो की प्रिय वस्तू मिळाल्यावर, तिची वार्ता कळल्यावर, तिचा स्पर्श, आलिंगन आणि प्रेमालाप यांना चांगला अवसर मिळाल्यावर, ह्दयात ज्या आनंदाचा अनुभव येतो, त्याचे वर्णन वाणी ही कधीही करू शकत नाही. ज्या प्रेमाचे वर्णन वाचेचे द्वारा होऊ शकते, ते तर प्रेमाचे संपूर्णपणे बाह्य स्वरूप आहे. प्रेम ही तर अनुभव घेण्याची वस्तु आहे. भगवान् श्रीराम लंकेमध्ये असणाऱ्या जगज्जननी जानकीजींना संदेश पाठविताना म्हणतात-

**तत्त्व प्रेम कर मम अरु तोरा । जानत प्रिया एकु मनु मोरा ।**
**सो मनु सदा रहत तोहि पाहीं । जानु प्रीति रसु एतनेहि माहीं ॥**

"प्रिये, माझ्या व तुझ्या प्रेमाच्या तत्त्वाचे स्वरूप माझे मनच जाणते. ते मन नेहमी तुझ्याजवळ राहाते. यामध्येच प्रेमाचा रस आहे, हे ते जाणते."

प्रेमाचा अनुभव मनामध्ये आणि मन नेहमी राहाते आपल्या प्रेमी माणसाजवळ. मग मनाच्या अभावी वाणीने यत्किंचित्सुद्धा वर्णन करण्यास अस्सल साधन सामग्री कुठून बरे मिळेल ? म्हणून प्रेमाचे जे काही वर्णन

सापडते ते केवळ सांकेतिक मात्र आहे– बाह्य आहे. प्रेमाची प्राप्ती झाल्याशिवाय तर कुणीही प्रेमाला ओळखत नाही आणि प्रेमाची प्राप्ती झाल्यावर, तो माणूस आपले मन गमावून बसतो. पाण्यामध्ये मुखातून शब्दाचे उच्चारण तोपर्यंतच होते की जोपर्यंत मुख हे पाण्याच्या बाहेर असते; जेव्हा मनुष्य अतल-तलात बुडून जातो तेव्हा तर बुडणाऱ्याच्या प्रेताचा पत्ता लागणेसुद्धा कठीण होते. याचप्रमाणे जो कोणी प्रेमसमुद्रात बुडून गेला आहे, तो काहीही सांगूच शकत नाही. आणि जे कोणी पाण्याच्या वरवर डुबक्या मारतात, डुबक्या मारून वर येतात, ते जे काही सांगतात त्या केवळ वरवरच्या गोष्टी सांगतात.

**मूकास्वादनवत् ॥५२॥**

**५२- मुक्या (माणसा) च्या स्वादाप्रमाणे.**

ज्याप्रमाणे गूळ खाऊन मुका माणूस प्रसन्न होतो आणि हसतो; परंतु तो गुळाची चव सांगू शकत नाही; त्याप्रमाणे प्रेमी महात्मा हा प्रेमाचा अनुभव घेऊन, आनंदात निमग्न होऊन राहातो, परंतु तो आपल्या अनुभवाचे स्वरूप दुसऱ्या कुणालाही सांगू शकत नाही. या प्रेमामध्ये तन्मयता होते. म्हणून प्रेमी हे जाणत नाही की मी कोण आहे आणि मी काय अनुभवतो आहे. म्हणूनच श्रीराधेने एकेवेळी आपल्या मैत्रिणीला सांगितले, "हे सखी, कृष्णावरील प्रेमाची गोष्ट मी काहीच जाणत नाही, मला समजत नाही, आणि जे काही मी जाणत आहे ते प्रकट करण्यास योग्य अशी भाषा माझ्याजवळ नाही. मी तर इतकेच जाणते की जेव्हा हृदयामध्ये त्या कृष्णाचा स्पर्श होतो, तेव्हाच माझे सारे ज्ञान निघून जाते."

**प्रकाशते* क्वापि पात्रे ॥५३॥**

**५३- एखाद्या दुर्मिळ अशा योग्य पात्रामध्ये (प्रेमी भक्तामध्ये)**

---

*१. पाठभेदः- प्रकाश्यते ।

असे प्रेम प्रकटसुद्धा होते.

हे तर निश्चित आहे की वाणीचे द्वारा प्रेमाचे स्वरूप सांगितले जाऊ शकत नाही, तथापि जेव्हा कोणी भाग्यवान महापुरुष प्रेममदाने धुंद होऊन, शरीर व मन यांची शुद्ध विसरून, दिव्य उन्मत्ताप्रमाणे वागू लागतो, तेव्हा प्रेमाचा थोडा थोडा प्रकाश लोकांना प्रकटपणे दिसू लागतो. त्या वेळी अशा महात्म्याच्या केवळ वाणीतूनच किंवा डोळ्यातूनच नव्हे तर शरीराच्या रोमारोमातून प्रेमाचे किरण आपोआपच बाहेर पडू लागतात. हे प्रेमाचे प्रकटीकरण म्हणजे साक्षात् भगवंताचा प्रकाश आहे. असा प्रकाश एखाद्या दुर्मिळ अशाच प्रेमी महापुरुषामध्ये प्रकट होतो.

**गुणरहितं कामनारहितं प्रतिक्षणवर्धमानमविच्छिन्नं सूक्ष्मतरमनुभवरूपम् ॥५४॥**

**५४- हे प्रेम गुण-रहित आहे, कामना- रहित आहे, प्रतिक्षणी वाढणारे आहे, विच्छेद- रहित आहे, सूक्ष्मापेक्षा अधिक सूक्ष्म आहे, आणि अनुभवरूप आहे.**

कोणत्या तरी गुणाला पाहून जे प्रेम निर्माण होते, ते तर गुण दिसेनासे झाल्यावर, नष्ट होऊन जाऊ शकते. परंतु अस्सल प्रेमामध्ये गुणांची अपेक्षा असत नाही. प्रेमी माणसाला आपल्या प्रेमास्पदामध्ये गुणदोष पाहण्यास वेळच तरी कुठे मिळतो ? तेथे तर स्वाभाविक सहज असे प्रेम असते. किंवा असे म्हणणे शक्य आहे की प्रेम हे गुणातीत असते. ते प्रेम तीन गुणांच्या परिघापलीकडची वस्तू आहे.

प्रेमामध्ये कोणतीही कामना असत नाही; कारण प्रेमामध्ये प्रेमास्पदाला सुखी पाहाण्याची एक इच्छा सोडल्यास, अन्य कुठलीही स्वार्थाची वासनाच राहात नाही. त्याचा तर सर्वश्रेष्ठ अर्थ हा प्रेमास्पद असा असतो. जेथे कोठे काही प्राप्त करून घेण्याची वासना असते, तेथे प्रेमाचे पवित्र आसन हे

कुटिल अशा कामाच्या द्वारा कलंकित होत राहाते. म्हणून प्रेमामध्ये कामनेचा लेशसुद्धा असत नाही.

खरे प्रेम तर कधी कमी होतच नाही, उलट ते सदा वाढतच राहाते. प्रेमामध्ये कुठेच शेवट नसतोच. प्रेमी पुरुषाचा नेहमी हाच भाव असतो की माझ्या ठिकाणी प्रेमाची कमतरताच आहे. कोणत्याही अवस्थेमध्ये त्याला आपले प्रेम वाढलेले दिसतच नाही; म्हणून त्याची प्रत्येक कृती ही स्वाभाविकच प्रेम वाढविण्यासाठी होते. या विच्छेद-रहित प्रेमाच्या सतत वृद्धीचा क्रम कधीच थांबत नाही. हे विशुद्ध प्रेम हे दिवसा दुप्पट आणि रात्री चौपट वाढतच राहाते.

हे प्रेम हृदयाच्या गुप्त गुहेमध्ये राहाणारे असल्याकारणाने, ते सूक्ष्मापेक्षा सुद्धा अधिक सूक्ष्म असते आणि ते केवळ प्रचीतीला येते.

हे प्रेम अतिशय आनंदमय असते आणि आनंदमय अशा श्रीहरीची साथ मिळाल्यावर ते प्रेम प्रेमी पुरुषाला आनंदमय करून टाकते.

**तत्प्राप्य तदेवावलोकयति तदेव श्रृणोति तदेव भाषयति* तदेव चिन्तयति ॥५५॥**

**५५- हे प्रेम प्राप्त झाल्यावर प्रेमी पुरुष या प्रेमालाच बघतो, या प्रेमालाच ऐकतो, या प्रेमाचेच वर्णन करतो, आणि या प्रेमाचेच चिंतन करतो.**

श्रेष्ठ प्रेमाच्या दिव्य रसामध्ये बुडालेला असा प्रेमानंदमय प्रेमी पुरुष हा सर्वत्र आपल्या प्रेममय, रसमय अशा प्रियतमालाच पाहातो. त्याला कुठेही दुसरी वस्तू दिसतच नाही. अशाच स्थितीमध्ये एक गोपी सांगते-

**जित देखौं तित स्याममई है ।**

**स्याम कुंज बन जमुना स्यामा, स्याम गगन घनघटा छई है ।**

---

*काही प्रतींमध्ये "तदेव भाषयति" हे शब्द नाहीत.

"जे काही दृष्टीस पडते, ते सर्व श्याममय वाटते. कुंज सावळे आहेत. यमुना सावळी आहे. सावळ्या नभात सावळे ढग भरले आहेत."

अशा अवस्थेमध्ये त्या प्रेमीच्या कानात जो कोणताही आवाज येतो तो केवळ प्रेममय अशा प्रेम-संगीताची स्वर-लहरीच असते; तो सर्वदा त्या कृष्णाच्या मुरलीच्या गोड तानेमध्येच मत्त होऊन राहातो. याप्रमाणेच त्याच्या मुखातूनसुद्धा प्रेममय अशा कृष्णाला सोडून, दुसरा शब्द बाहेर पडत नाही. प्रेममय कृष्णाचे गुण गाता गाता तो कधी थकतच नाही; प्रत्येक गोष्टीत त्याला केवळ दिव्य प्रेमरसामृताचाच अनुपम स्वाद मिळत राहातो, आणि तो अतृप्त रसनेद्वारा नेहमी त्या अमृत रसपानात मत्त होऊन राहातो. त्याच्या चित्तामध्ये दुसऱ्याला स्थानच उरत नाही. तेथे एकमात्र प्रियतमाचेच अखंड साम्राज्य आणि पूर्ण अधिकार असतो. असे जरासुद्धा स्थान नसते की तेथे कोणत्याही दुसऱ्याच्या कल्पनेची स्मृती ही छायारूपाने सुद्धा येऊ शकेल. त्याचे चित्त प्रत्यक्ष प्रियतमाच्या प्रेमाचे स्वरूपच बनून जाते.

संपूर्ण शरीर केवळ त्याचाच अनुभव करीत राहाते. सर्व इंद्रिये त्या श्याम कृष्णाला विषय करीत आहेत. डोळे रात्रंदिवस संपूर्ण विश्व हे श्याममय आहे, असे पाहतात. कान हे नेहमी त्याच्या मधुराहून अधिक मधुर असा शब्द-ब्रह्ममय- वेणुध्वनी ऐकतात. नाक हे नित्य निरंतर त्या नटवराच्या अंगाचा वासच घेते. जीभ ही अविच्छिन्नपणे त्या प्रेमसुधेचे आस्वादन करते.आणि शरीर हे सर्वदा त्या अखिल सौंदर्य व माधुर्य यांचा रस-सागर, रसराज, परम सुखस्पर्श, आनंदकंद अशा श्रीनंद-नंदनाच्या अनुपम स्पर्श-सुखाचा अनुभव घेते. आकाशात तोच शब्द आहे, वायूमध्ये तोच स्पर्श आहे, अग्नीत तीच ज्योती आहे, पाण्यामध्ये तोच रस आहे, आणि पृथ्वीमध्ये तोच गंध टिकून राहिलेला आहे. सर्वत्र तोच भरून राहिलेला आहे. सर्व ठिकाणी तीच अनोळखी अशी रूपाच्या माधुर्याची शोभा दिसून येत आहे. सर्वत्र प्रेमच प्रेम आणि आनंदच आनंद आहे. संपूर्ण विश्व हे प्रेममय, आनंदमय, रसमय,

अथवा श्रीकृष्णमय आहे. सर्व काही आनंदाने आणि सौंदर्य- माधुर्याने भरलेले आहे. दृश्य, द्रष्टा सर्वच मधुर आहेत; आम्ही-तुम्ही सर्वच जण मधुर आहोत, परमानंद-रस-सुधेने भरलेल्या त्या मथुराधिपतीचे सर्व काही मधुर आहे. **"मधुवाता ऋतायते, मधु क्षरन्ति सिंधव:, माध्वीर्न: सन्त्वोषधी:, मधुमत् पार्थिवं रज:"** सर्वत्र मधूच मधू आहे. याचप्रकारे प्रेमी भक्ताच्या दृष्टीने सर्वत्र प्रेममय भगवान आहे. भगवंताने सांगितले आहे-

**यो मां पश्यति सर्वत्र सर्वं च मयि पश्यति ।**
**तस्याहं न प्रणश्यामि स च मे न प्रणश्यति ॥**

(गीता ६/३०)

"जो मला सर्वत्र पाहातो आणि सर्वांना माझ्यामध्ये पाहातो, त्याच्या दृष्टीच्या आड मी कधीही होत नाही आणि तो माझ्या दृष्टीच्या आड होत नाही."

या अवस्थेमध्ये प्रेमी भक्त हा ज्या नित्य, महान्, दिव्य अशा प्रेमामृताच्या रस-सागरात मग्न राहातो, तो सर्व प्रकारे अनिर्वचनीय आहे. प्रेमभक्ती अथवा परा भक्ती हिचे स्वरूप हेच आहे. हाच महान् भूमानंद आहे; याच सर्व-व्यापक अशा भूमानंदाशी अल्पसुखाचे तारतम्य दाखवत श्रुती सांगते-

**यत्र नान्यत्पश्यति नान्यच्छृणोति नान्यद्विजानाति स भूमाथ यत्रान्यत् पश्यत्यन्यच्छृणोत्यन्यद्विजानाति तदल्पम्, यो वै भूमा तदमृतमथ यदल्पं तन्मर्त्यम् ।** (छान्दोग्योपनिषद् ७/२४/१)

"जेथे दुसऱ्याला पाहात नाही, दुसरे काही ऐकत नाही, दुसऱ्याला जाणत नाही, तोच भूमा आहे. आणि जेथे दुसऱ्याला पाहातो, दुसरे ऐकतो, दुसऱ्याला जाणतो, तोच अल्प आहे. जो भूमा आहे तो अमृत आहे आणि जो अल्प आहे तो मृत आहे." म्हणून प्रेम हे सदा मधुर, अविनाशी, सनातन, आणि सत्य आहे.

गौणी त्रिधा गुणभेदादार्तादिभेदाद्वा ॥५६॥

**५६- गौणी भक्ती ही गुण-भेदांनी किंवा आर्त इत्यादी भेदांमुळे तीन प्रकारची असते.**

मागील सूत्रापर्यंत त्या परा किंवा मुख्य भक्तीचे विवेचन झाले. तिच्यामुळे प्रेमी भक्त हा त्या प्रेमा-भक्तीमुळे आपल्याला प्रियतम अशा भगवंताच्या प्रेममय स्वरूपाप्रत जातो; हिलाच श्रीमद्भागवतात अहैतुकी-निर्गुण-भक्ती, तसेच गीतेमध्ये ज्ञानी माणसाची भक्ती असे म्हटले आहे. अहैतुकी भक्तीमध्ये भक्ताच्या चित्तवृत्ती आणि कर्मगती यांचा प्रवाह अविच्छिन्नपणे स्वभावत:च भगवंताकडे वाहात असतो म्हणजे त्याचे चित्त हे निरंतर निष्काम अशा अनन्य प्रेमभावाने भगवंतामध्ये लागून राहाते, आणि त्याच्या सर्व क्रिया या भगवंतासाठीच होत असतात(भागवत ३/२९/११-१२, आणि गीतेने सांगितलेला दुर्लभ, तत्त्वज्ञानी असा महात्मा भक्तसुद्धा सर्व काही वासुदेवच आहे असे पाहातो- अध्याय ७,१७). हे दोन्ही तर भगवत्स्वरूपच आहेत. आता येथे (म्हणजे प्रस्तुत सूत्रात) या परा भक्तीच्या अपेक्षेने खालच्या दर्जाची जी गौणी भक्ती तिचे वर्णन केले जात आहे. ही गौणी भक्ती सात्त्विक, राजस आणि तामस या भेदांनी, अथवा आर्त, जिज्ञासू आणि अर्थार्थी या भेदांनी तीन प्रकारची असते. जी भक्ती पापाचा नाश करण्याच्या उद्देशाने सर्व कर्मे भगवंताला अर्पण करणे या स्वरूपात, अथवा भगवंताचे पूजन करणे हे कर्तव्य आहे असे समजून जिच्यामध्ये भेद-दृष्टीने पूजा केली जाते, ती भक्ती सात्त्विक आहे (श्रीमद् भागवत ३/२९/१०). विषय, यश व ऐश्वर्य यांची कामना धरून, जी भक्ती भेद-दृष्टीने केवल प्रतिमा इत्यादींच्या पूजनाच्या स्वरूपातच केली जाते ती भक्ती राजस आहे (श्रीमद्भागवत ३/२९/९). क्रोधामुळे हिंसा, दंभ आणि मत्सर बाळगून जी भक्ती भेद-दृष्टीने केली जाते, ती भक्ती तामस आहे (श्रीमद्भागवत ३/२९/८).

याचप्रमाणे आर्त, जिज्ञासू आणि अर्थार्थी पुरुष त्रिविध उपासनेद्वारे तीन प्रकारची भक्ती करतात म्हणजे भक्तांच्या भावभेदानुसार गौण भक्तीचे तीन प्रकार होतात. गौण भक्तीच्या साधनांनी जरी प्रत्यक्ष भगवंताची प्राप्ती होत नाही, तरी या गौण भक्तीचे साधक हेसुद्धा सुकृतीच असतात, आणि त्यांना सुद्धा भगवंताच्या कृपेने या भक्तीचे अनुष्ठान करता-करता शेवटी भगवंताच्या प्राप्तीचे मुख्य साधन-स्वरूप असणारी भक्ती किंवा प्रत्यक्ष भगवत्स्वरूप अशी प्रेमाभक्ती प्राप्त होते. भगवंताच्या भक्तीमध्ये हेच वैशिष्ट्य आहे की हिचे अंतिम फळ दुर्लभ अशा भगवंताच्या प्रेमाची प्राप्ती हेच आहे. म्हणूनच ही गौणी भक्तीसुद्धा श्रेष्ठ आणि पुण्यात्मा अशा पुरुषांकडूनही केली जाते, असे मानले गेले आहे. कारण केवळ भक्तीमध्येच भगवंताचे भजन, भगवंताचा आश्रय, आणि कोणत्या ना कोणत्या स्वरूपात भगवंताचे ध्यान असतेच; आणि भगवंताचे भजन, भगवंताचा आश्रय तसेच भगवंताचे ध्यान यांचे फळ सरळ भगवंताची प्राप्ती हेच असते. म्हणून कोणत्याही प्रकारानेसुद्धा असू दे, भगवंताची भक्ती ही माणसाने अवश्यच केली पाहिजे. परंतु जेथपर्यंत शक्य असेल तेथपर्यंत सात्त्विक भक्ती अथवा त्रिभुवनाच्या वैभवालासुद्धा अनर्थ मानून तसेच भगवंतालाच श्रेष्ठ अर्थ- परम धन- मानून, त्याच्या प्रेमाच्या प्राप्तीसाठी, खऱ्या अर्थार्थी माणसाने भावपूर्वक भक्ती करावयास हवी.

**उत्तरस्मादुत्तरस्मात्पूर्वपूर्वा श्रेयाय भवति ॥५७॥**

**५७- (त्या तीन प्रकारच्या भक्तीमध्ये) उत्तरोत्तर क्रमाने प्रत्येक पूर्वक्रमातील भक्ती ही कल्याणकारक असते.**

तामस भक्तीच्या अपेक्षेने राजस आणि राजस भक्तीच्या अपेक्षेने सात्त्विक भक्ती ही उत्तम आहे. याप्रकारे अर्थार्थी भक्ताच्या अपेक्षेने जिज्ञासूची भक्ती, आणि या दोन भक्तांच्या अपेक्षेने आर्त भक्ताची भक्ती विशेषप्रकारे कल्याणकारक असते.

* * *

# भक्तीची सुलभता आणि महत्ता

**अन्यस्मात् सौलभ्यं भक्तौ ॥५८॥**

**५८- अन्य सर्वांच्या अपेक्षेने भक्ति सुलभ आहे.**

यापूर्वी भक्तीचा महिमा, आणि कर्म, योग तसेच ज्ञान इत्यादींच्या अपेक्षेने त्या भक्तीच्या श्रेष्ठत्वाचे वर्णन केले गेले आहे. आता सूत्रकार येथे दाखवीत आहे की अशा प्रकारे भक्ती ही सर्वांमध्ये श्रेष्ठ असूनसुद्धा भक्तीची प्राप्ती ही इतर फळांच्या अपेक्षेने सहज आणि सुलभ आहे. भक्तीच्या प्राप्तीसाठी विद्येची आवश्यकता नाही, धनाची आवश्यकता नाही, श्रेष्ठ कुळाचे प्रयोजन नाही, आणि उच्च वर्णाश्रमाचेही प्रयोजन नाही, वेदाध्ययनाची आवश्यकता नाही, कठोर तपाची गरज नाही, विवेकाची जरूरी नाही तसेच कठोर वैराग्याची जरूरी नाही; आवश्यकता आहे ती फक्त सरळ भावाने भगवंताच्या अपार कृपेवर विश्वास ठेवून, प्रेमभावाने त्याचे सतत स्मरण करण्याची. मग सुलभता ही तर प्रत्यक्षच दिसू लागते. सर्वांवर सदा भगवंताची कृपा आहे. परंतु मनुष्य त्यावर विश्वास ठेवीत नाही; म्हणून तो भगत्कृपेपासून वंचित राहून जातो. भगवंताने तर गीतेमध्ये डंका वाजवून सांगितले आहे की मी सर्व प्राण्यांचा सुहृद आहे; आणि जो कोणी मला सुहृद म्हणून जाणून घेतो, त्याला त्याच क्षणी शांति प्राप्त होते-

**सुहृदं सर्वभूतानां ज्ञात्वा मां शान्तिमृच्छति ।**

(गीता ५/२९)

माणसाने भगवंताच्या कृपेवर विश्वास ठेवून, असे समजावयास हवे की "मी भगवंताच्या कृपासागरात बुडून राहिलो आहे. माझ्या वर- खाली,

आसपास, भूतकाळी- भविष्यकाळी, सर्व ठिकाणी व सर्व काळी, भरपूर अशी भगवंताची कृपा आहे." असे माणसाने मानले तरच तो त्या भगवंताच्या कृपेच्या सामर्थ्याने त्वरित पाप आणि ताप यांतून मुक्त होऊन, भगवंताच्या भक्तीचा अधिकारी होतो. अशाप्रकारे भगवंताच्या कृपेवर विश्वास ठेवून आणि निश्चय करून, भगवंताच्या अनन्य स्मरणाचा अभ्यास कोणत्याही अवस्थेमध्ये, बालक, वृद्ध, तरुण, स्त्री, पुरुष, ब्राह्मण, शूद्र असा कोणताही माणूस करू शकतो. यासाठी काही सोडावयाचे नाही की काही ग्रहण करावयाचे नाही.सर्वांवर भगवंताची कृपा सदा असूनसुद्धा तिच्यावर आपला विश्वास बसत नाही. बस्, तो विश्वासच स्थिर करून घ्यावयाचा आहे. मग भक्तीच्या प्राप्तीची सर्वही साधने आपोआप सहजच सिद्ध होऊन जातील. (**तस्याहं सुलभः पार्थ** । गीता ८/१४). भक्ती ही आणखी कोणत्याही साधनाने मिळत नाही, तर ती भजनानेच मिळते.

**प्रमाणान्तरस्यानपेक्षत्वात् स्वयंप्रमाणत्वात् ॥५९॥**

**५९ - कारण भक्ती ही स्वतःच प्रमाण-स्वरूप आहे, तिच्यासाठी अन्य प्रमाणांची आवश्यकता नाही.**

भक्तीच्या मार्गावर चालणाऱ्या पुरुषांना त्या भक्तीसुखाचा पुरावा आपोआपच मिळत राहातो. त्यांना स्वतःलाच अनुभव येत राहातो, दुसऱ्या कोणत्याही प्रमाणाची यासाठी आवश्यकता नाही. पतिसुखाच्या आनंदाचा अनुभव पत्नी बनल्यावरच मिळू शकतो; ही गोष्ट कुमारी कन्येला समजावून सांगण्याची गोष्ट नव्हे. याचप्रमाणे भक्तिसुखाचा अनुभव हा फक्त भक्तांनाच येतो, हे सांगून ती गोष्ट कथन करण्याची नव्हे. जे पुण्यात्मे असे महानुभाव हे सर्व कामनांचा त्याग करून, एकमात्र भगवंताच्या प्रेमाच्या कामनेनेच, भगवंताच्या कृपेचा आश्रय घेऊन, भगवंताचे प्रेमपूर्वक भजन सदा सर्वदा पुलकित चित्ताने करीत असतात, त्यांनाच भक्तिसुखाचा अनुभव येतो.

शान्तिरूपात्परमानन्दरूपाच्च ।।६०।।

**६०- भक्ति ही शांतिरूप आहे आणि परमानंद-स्वरूप आहे.**

शांती आणि परम आनंद हे भगवंताचे साक्षात् स्वरूप आहे. आपल्या प्रेम-रूपात भगवान् स्वत:च अवतीर्ण होतात; म्हणून हे भगवत्प्रेमसुद्धा शांती आणि परमानंद या स्वरूपाचेच आहे. आनंदमय असणारे भगवान् स्वत:च आपल्या 'ल्हादिनी' नावाच्या आनंदशक्तीला निमित्त करून, प्रेम आणि प्रेमिका या स्वरूपात ते प्रकट होतात, आणि स्वत:च प्रेमास्पद बनून, आपल्या आनंदाचा आपणच उपभोग घेतात. हीच त्यांची आनंद-लीला आहे. या ठिकाणी हे समजून घ्यावयास हवे की ज्या भगवंताची भक्ती अथवा प्रेम हे शांतिरूप आणि परमानंदरूप आहे, ते भगवान हे निर्गुणवादी लोकांकडून मानले गेलेले, प्रकृतीपासून उत्पन्न झालेल्या सत्त्व-रज-तम स्वरूप तीन गुणांनी युक्त असे ' सगुण ब्रह्म' नव्हे. भगवंताचे दिव्य शरीर हे त्याच्या स्वत:च्या आनंद या अंशाने, आपल्या स्वत:च्या योगमायेच्या कारणाने, नित्यच प्रगट आहे. म्हणून आत्माराम, मुनी, जीवन्मुक्त महापुरुष, व्यास, नारद, शुकदेव, जनक, सनक इत्यादी महात्मे हे त्या भगवंताच्या एकेक दिव्य गुणावर, दिव्य आभूषणावर, दिव्य गंधावर, दिव्य मुरली-ध्वनीवर, आणि दिव्य सौंदर्यावर मुग्ध होऊन जातात. जर भगवंताचे ठिकाणी या जगाला निर्माण करणाऱ्या, आवरण घालणाऱ्या अशा मलिन मायेच्याच गुणांचा विकास होत असता अथवा तिच्यापासून उत्पन्न असे त्या भगवंताचे शरीर असते, तर मायेच्या ग्रंथीला कापून टाकणारे असे जे ब्रह्मस्वरूप, त्याकडे महात्म्यांचे इतके आकर्षण कधीच झाले नसते. निर्गुणवादी लोक भगवंताच्या ज्या स्वरूपाला शुद्ध सच्चिदानंद-घन असे ब्रह्म म्हणतात, आणि वेद हे ज्याचे स्वरूप 'नेति नेति' म्हणून संकेताने समजावून सांगण्याची इच्छा करतात, तोच मायेपलीकडील, विज्ञानानंदघन, परमात्मा हा भक्तांचा प्रियतम भगवान् आहे. त्याला शांती

आणि आनंद यांचा समुद्र म्हणणे हेसुद्धा त्याचं यथार्थ वर्णन होत नाही. त्या भगवंताचे जे प्रेम आहे, तेच परम शांति-स्वरूप आणि परमानंद-स्वरूप आहे. याच प्रेमाचे वर्णन देवर्षी नारदजी या सूत्रामध्ये करीत आहेत.

* * *

# भक्तीची साधने आणि अंतराय

लोकहानौ चिन्ता न कार्या निवेदितात्मलोकवेदत्वात् *
॥६१॥

**६१- लोक-हानीची चिंता भक्ताने करावयास नको; कारण (तो भक्त) स्वत: आपल्याला, आणि लौकिक, वैदिक अशी सर्व प्रकारची कर्मे तो भगवंताला अर्पण करून चुकला आहे.**

भक्त हा सर्व काही भगवंताला अर्पण करून चुकला आहे; म्हणून त्याला स्वत:च्या बाबतीत कोणत्याही प्रकारची चिंता करण्याची आवश्यकता तरी काय आहे ? त्याने तर फक्त एका प्रियतम अशा भगवंताच्या चिंतनाचीच चिंता करावयास हवी. स्त्री, पुत्र, धन, जन, मान इत्यादी पदार्थ राहिले काय किंवा निघून गेले काय, त्याला या कशाचीच कसलीही परवा असत नाही; कारण तो तर हे सर्व अगोदरच भगवंताला समर्पण करून, संपूर्णपणे अकिंचन होऊन गेला आहे. मग त्या पदार्थांची चिंता करण्यासाठी त्याच्याजवळ वेळ, आणि चिंता करणारे चित्तसुद्धा राहिले आहे तरी कुठे ? त्याच्या चित्ताला तर एकमात्र चिंता हरण करणाऱ्या चिंतामणीच्या चिंतेने चोरून नेले आहे. तो चतुर, चोरांचा चूडामणी असा भगवान् त्याचे चित्त परत देण्याची इच्छाच करीत नाही, तर मग तो भक्त चित्ताचा अभाव असताना, कोणत्याही हानीची चिंताच तरी कशी बरे करेल ? म्हणून भक्ति- मार्गावरील पथिकाने लोक-हानीची कसलीही चिंता करण्याची इच्छा करू नये. त्याने सर्वांचे सार असा जो पदार्थ- भगवान्, - त्याचेच चिंतन करावयास हवे. आणि भक्ताच्या हृदयात

---

* पाठभेद : लोक-वेद-शीलत्वात्।

असेच होत असते.

**न तदसिद्धौ* लोकव्यवहारो हेय: किन्तु फलत्यागस्तत् साधनं च कार्यमेव ॥६२॥**

**६२- (परंतु) जोपर्यंत भक्तीमध्ये सिद्धी मिळत नाही, तोपर्यंत लोकव्यवहाराचा त्याग करू नये. फळाचा त्याग करून निष्काम भावाने त्या भक्तीचे साधन करावयास हवे.**

प्रेमाची प्राप्ती झाल्यावर, लौकिक (आणि) वैदिक कर्मे सुटून जातात, जाणून बुजून त्यांचा स्वरूपत: त्याग करणे घडत नाही. समर्पणाचा अर्थ हाच आहे की त्या कर्मांचे मनानेच समर्पण करणे होय. मग जेव्हा प्रेमाची उच्च दशा प्राप्त होते, तेव्हा विधी-निषेधाच्या पलीकडे पोचल्यामुळे ही सर्व कर्मे आपणहूनच त्याला विधीच्या बंधनातून सोडवून, अलग होऊन जातात. त्या स्थितीचा हाच नियम आहे. परंतु जो कोणी माणूस जाणूनबुजून प्रेमाच्या नावावर शास्त्रविधीचा त्याग करतो, त्याला भक्तीची सिद्धी सहजगत्या प्राप्त होत नाही. म्हणून येथे सूत्रकार सांगत आहेत की जाणून बुजून लोकव्यवहाराचा त्याग करू नको. फळाची कामना सोडून, कर्म करीत राहा. निष्काम कर्म करणारा स्वत:च लोकहानीच्या चिंतेतून सुटून जातो, आणि भगवंताच्या प्रीत्यर्थ त्याने निष्काम भावाने केलेली ती लौकिक कर्मे ही भक्तीच्या प्राप्तीमध्ये साधन बनून जातात.

**स्त्रीधननास्तिकवैरिचरित्रं** न श्रवणीयम् ॥६३॥**

**६३- स्त्री, धन, नास्तिक आणि वैरी यांचे चरित्र ऐकू नये.**

बासष्टाव्या सूत्रात लोकव्यवहाराचा त्याग न करण्याची आज्ञा दिली गेली आहे; म्हणून लोकव्यवहार तर करावयास पाहिजे आहे; परंतु प्रेम-पथावरील पथिकाने लोकव्यवहारातसुद्धा स्त्री, धन, नास्तिक आणि शत्रू यांच्या

---

*पाठभेद : तत्सिध्दौ ।

** पाठभेद : 'स्त्रीधननास्तिकचरित्रं ।'

चरित्रांचे श्रवण करण्यापासून स्वत:चा बचाव करावयास हवा.

(१) ज्याचे मन स्त्रीच्या चिंतनात लागले गेले आहे, तो माणूस भगवंताचे चिंतन कोणत्याही प्रकारे करू शकत नाही. स्त्रीच्या चिंतनाने कामाची उत्पत्ती होते, आणि काम हा तर प्रेममार्गावर सर्वात मोठा बाधक घटक आहे. स्त्रीविषयक गोष्टी ऐकणे, वाचणे आणि पाहाणे यांमुळेच स्त्रीचे चिंतन होते.म्हणून साधकाने असे करावयास हवे की त्याने स्त्रीविषयक गप्पागोष्टी करू नयेत, स्त्रीविषयक कथा किंवा गाणे ऐकू नये, स्त्रीविषयक चित्रे पाहू नयेत, स्त्रीविषयक पुस्तके किंवा अन्य साहित्य वाचू नये, नाटक-सिनेमे वगैरे पाहू नयेत, स्त्रियांच्या चरित्रावर कोणतेही चिंतन करू नये, स्त्रियांच्या बद्दल लेख इत्यादी लिहू नयेत, स्त्रियांमध्ये उठबैस करीत राहू नये, आणि स्त्रियांची अनावश्यक भेट घेऊ नये. जो साधक गृहस्थ असेल, त्याने आपली विवाहित पत्नी सोडून, जमेल त्याप्रमाणे अन्य स्त्रियांच्या भेटीपासून स्वत:स दूर ठेवले पाहिजे. स्त्रीविषयक चर्चा करणे-ऐकणे, स्त्रीसंबंधित चित्र इत्यादी पाहाणे हे तर सर्वांच्या साठीच हानिकारक आहे. श्रीमद्-भागवतात सांगितले आहे-

**न तथास्य भवेन्मोहो बन्धश्चान्यप्रसङ्गत: ।**
**योषित्सङ्गाद्यथा पुंसो यथा तत्सङ्गिसङ्गत: ।।**

(३/३१/३५)

"स्त्रियांच्या संगामुळे आणि स्त्रियांचा संग करणाऱ्या माणसांच्या संगतीमुळे मनुष्याला जसे मोह आणि बंधन हे प्राप्त होतात, तसे अन्य कुणाच्याही संगामुळे होत नाहीत." यापुढे जाऊन भागवताच्या पाचव्या स्कंधामध्ये, स्त्रियांचे ठिकाणी आसक्त असणाऱ्या पुरुषाच्या संगतीला "नरकाचे द्वार" असे म्हटले आहे. ज्याप्रमाणे पुरुषांच्यासाठी स्त्रियांचा संग त्याज्य आहे, त्याप्रमाणे स्त्रियांचेसाठीसुद्धा पुरुषांचा संग सर्व प्रकारे त्याज्य आहे.

(२) धनाच्या चिंतनाने लोभाची उत्पत्ती होते. जेव्हा चित्तामध्ये धनाचा लोभ जागृत होतो, तेव्हाच न्याय-अन्यायाची बुद्धी मारली जाते, आणि मनुष्य सत्पथाचा त्याग करून, अन्यायाच्या मार्गावर चालू लागतो. म्हणून धन आणि धनिकांचे भोग आणि त्यांच्या गर्वाने भरलेल्या गोष्टी साधकाने ऐकू नयेत आणि पाहूही नयेत.

(३) ज्यांचा ईश्वरावर आणि शास्त्रावर विश्वास नाही तेच नास्तिक होत. ईश्वराचे अस्तित्व न मानणाऱ्या नास्तिकांच्या सारखा या जगातील जीवांचा शत्रू नक्कीच कोणी आहे काय ? "यात काय राहिले आहे ? त्यात काय आहे? ईश्वर ही कल्पना केवळ ढोंग आहे. ईश्वर कुणी पाहिला आहे काय ? आत्मा ही तर केवळ कल्पना आहे." अशा बाता बकणाऱ्या, आणि ईश्वर तसेच शास्त्रे यांची निंदा करणाऱ्या कुतार्किकांचा संग करणे, तसेच त्यांचे चरित्र ऐकणे, यामुळे ईश्वराचे संदर्भात अश्रद्धा उत्पन्न होते, आणि मग ईश्वरावरील अश्रद्धेसारखे पतनाचे साधन आणखी कोणतेही नाही. म्हणून नास्तिकांपासून नेहमी सांभाळून राहावे.

(४) खरे पाहता भक्ताच्या मनात त्याचा कोणीही शत्रू असत नाही. जो भक्त सर्व जगात, आपला प्राणाराम अशा परमात्म्याला व्यापून असलेला पाहतो, जो भक्त जगताला श्रीकृष्णमय असे बघतो, तो भक्त कसा बरे अन्य कुणाला आपला वैरी मानू शकेल ? देवाधिदेव महादेवाने सांगितले आहे-

**उमा जे राम चरन रत बिगत काम मद क्रोध ।**
**निज प्रभुमय देखहिं जगत केहि सन करहिं बिरोध ॥**

"हे उमा, जो काम, अहंकार व क्रोध यांनी रहित होऊन प्रभू रामचंद्रांच्या चरणी मग्न झालेला असतो, त्याला संपूर्ण जग आपल्या प्रभूने भरले आहे, असे दिसते. म्हणून तो कुणाशीही विरोध करीत नाही."

परंतु जोपर्यंत भक्तीची सिद्धी होत नाही, तोपर्यंत साधकाने अशी

भावना करावयास हवी की, आणि मनातल्या मनात असा निश्चय करावयास हवा की, सर्व काही माझ्या प्रभूचेच स्वरूप आहे. अशा अवस्थेमध्ये जर दुसरा कोणी माणूस चुकून साधकाचा द्वेष करेल किंवा त्याच्याशी वैर करेल, तर मग त्या वैरासंबंधी त्या माणसाची वचने शक्यतो ऐकायचीच नाहीत. कारण ती ऐकण्यामुळे क्रोध उत्पन्न होण्याची शक्यता असते. म्हणून आपल्या तर्फे, आपले न जिंकलेले मन सोडून, इतर कुणालाही शत्रु मानूच नये, आणि दुसरा कोणी जर शत्रुत्व करीत असेल, तर त्यावर सुद्धा विचार करू नये.

स्त्रीविषयक चिंतनाने काम, धनाच्या विचाराने लोभ, नास्तिकाच्या चिंतनाने ईश्वरावर अविश्वास, आणि वैऱ्याच्या विचारामुळे क्रोध हे उत्पन्न होतात. म्हणून या चारांचे चरित्र शक्य तितके ऐकूच नये.

**अभिमानदम्भादिकं त्याजम् ॥६४॥**

**६४- अभिमान, दंभ, इत्यादींचा त्याग करावयास हवा.**

या सूत्राच्या पूर्वीच्या (म्हणजे ६३ व्या) सूत्रामध्ये स्त्री, धन, नास्तिक आणि वैरी यांचे चरित्र ऐकू नये, असा आदेश दिला गेला होता. परंतु तसे करून, असा अभिमान धरू नये की मी कामिनी व कांचन यांचा त्याग केला आहे, मी श्रेष्ठ आस्तिक आहे, मी अजातशत्रू आहे. अशा प्रकारचा अभिमान सर्व प्रकारे पतनाचे कारण होतो. संपत्ती, संतती, शक्ती, स्वास्थ्य, विद्या, बुद्धी, कुलवर्ण, आश्रम, आचार, रूप, पद, पुरुषार्थ इत्यादी कोणत्याही वस्तूचा अभिमान येता कामा नये. जी काही सद्वस्तू अथवा जो काही सद्‌गुण प्राप्त झाला असेल, अथवा साधन ठीक चालत राहिले असेल, तर त्यासाठी भगवंताची कृपाच कारण आहे असे समजावयास हवे. अभिमानाने फार मोठी हानी होते. म्हणून अभिमानाचा सर्व प्रकारे त्याग करावयास हवा, इतका की अभिमान-रहित स्थितीबद्दलचा अभिमानसुद्धा सोडून द्यावयास हवा. अभिमानाच्या नाशासाठी एक उत्तम उपाय आहे तो म्हणजे दीनता, विनय

आणि नम्रता होय. नमन-भक्तीनेसुद्धा अभिमानाचा नाश होतो. याचप्रकारे दंभाचा सुद्धा त्याग करावयास हवा. आपल्या ठिकाणी जे गुण नसतील, ते गुण धन-मानाच्या लोभाने अथवा स्वभावातील दोषाने इतरांना दाखविण्याची कृती करणे, तसेच वरवर धर्मात्मा, भक्त, त्यागी बनलो आहोत असे ढोंग करणे, यांना दंभ म्हटले जाते. दांभिक पुरुषाचा साधन-मार्ग हा फार वाईट तऱ्हेने खुंटून जातो. वरवर आपला कपट-वेष दाखवून ठेवण्यातच तो ढोंगी आपली सर्व विद्या, बुद्धी आणि कुशलता वापरून टाकतो. निरभिमानपणा आणि सरळपणा हे दोन भक्तीच्या साधनात अत्यंत सहायक स्वरूप असणारे आहेत, आणि अभिमान तसेच दंभ हे फार बाधक आहेत. हे दोघेही आसुरी संपत्तीतील दुर्गुण आहेत. सूत्रामध्ये अभिमान व दंभ या शब्दांच्या बरोबर 'आदि' असा शब्द जोडून, सूत्रकाराने आसुरी संपत्तीतील * इतर दुर्गुणांकडे बोट दाखविले आहे. म्हणून सर्व आसुरी दुर्गुणांचा त्याग करावा.

---

* श्रीमद्‌भगवद्‌गीतेच्या १६ व्या अध्यायात, श्लोक ७ ते २० पर्यंत भगवंतांनी आसुरी संपत्तीचे जे वर्णन केले आहे, त्याचा भावार्थ असा आहे:- आसुरी माणसे ही धर्म-अधर्म-विषयक प्रवृत्ती आणि निवृत्ती जाणीत नाहीत; म्हणून त्यांच्या ठिकाणी पवित्रता नसते, आचार नसतो, आणि सत्यही राहात नाही. ती आसुरी माणसे सांगतात की हे जग असत्य, अप्रतिष्ठ (धर्म व अधर्म यांच्या व्यवस्थेने रहित), ईश्वर-रहित आणि अन्योन्य-संभूत म्हणजे स्त्रीपुरुषांच्या जोडीतून निर्माण झालेले आहे; या जगताचे इतर कोणतेही कारण नाही; हे केवळ स्त्रीपुरुषाच्या कामातून निर्माण झालेल्या संयोगामुळेच उत्पन्न झालेले आहे. ती सर्व अल्पबुद्धी माणसे अशा प्रकारच्या दृष्टीचा अवलंब करून मलिन-चित्त, उग्र कर्मे करणारे, आणि अहितकारी होऊन, जगताच्या विनाशासाठीच जन्म ग्रहण करीत असतात. ती माणसे दुष्पूरणीय (कोणत्याही प्रकाराने सुद्धा पूर्ण न होणाऱ्या अशा) कामनांचा आश्रय घेऊन, दंभ, अभिमान आणि मद यांना वश होऊन, मोहाला वश होऊन, असद्‌ग्रह (या षडयंत्राने अमुक मनोरथ पूर्ण होऊन जाईल अशा प्रकारची वेदाला विरुद्ध असणारी दुराशा) स्वीकारून, अपवित्र व्रते (मद्यमांस इत्यादी तसेच चोरी, असत्य, कपट, इत्यादीद्वारा संपादित, नरक इत्यादीप्रत नेणारी कुव्रते) पाळून, शास्त्राविरुद्ध असणारी कर्मे-पापकर्मे - यांमध्ये प्रवृत्त होतात. अंतिम श्वासापर्यंत अपार अशा विषयांच्या चिंतनांनी घेरलेले असे ते असुर लोक 'कामोपभोग हाच श्रेष्ठ पुरुषार्थ आहे' अशा प्रकारचा स्थिर निश्चय करून, शेकडो प्रकारच्या आशांच्या पाशांत बद्ध होऊन, काम-परायण आणि क्रोध-परायण होऊन,

**तदर्पिताखिलाचार: सन् कामक्रोधाभिमानादिकं तस्मिन्नेव करणीयम् ॥६५॥**

**६५- सर्व आचार भगवंताला अर्पण करून टाकल्यावर जर काम, क्रोध, अभिमान इत्यादी मनात येत असतील, तर तेसुद्धा भगवंताप्रतच लावावयास हवेत.**

जर भक्ताने सर्व काही भगवंताला अर्पण करून टाकले आहे, तर मग काम, क्रोध, इत्यादींचे अर्पण दुसऱ्या कुणाला कसे करता येईल ? ज्याप्रमाणे प्रियतम भगवान् हा आपल्या प्रेमी भक्तासाठी प्रेमास पात्र आहे, त्याचप्रमाणे भक्ताचे काम, क्रोध, इत्यादींस पात्र सुद्धा तो भगवानच आहे. दुसरा कोणी तर

---

कामभोगासाठी अन्यायपूर्वक (म्हणजे चोरी, विश्वासघात इत्यादींच्या द्वारा) पैशाचा संचय करण्याची कृती करतात. 'आज मी हे मिळविले, हा माझा मनोरथसुद्धा पुरा होईल; हे माझे धन आहे, नंतर ते धनसुद्धा मला प्राप्त होईल. मी अमुक शत्रूला मारले; आता त्या अन्य शत्रूंना सुद्धा मी मारेन. मी ईश्वराप्रमाणे सर्वशक्तिमान आहे; मी भोग भोगण्यासाठी आहे, मी सिद्ध आहे, मी बलवान आहे, मी सुखी आहे, मी धनी आहे; मी मोठ्या कुळात जन्मलेला आहे. माझ्यासारख्या आणखी दुसरा कोण आहे ? मी यज्ञ करीन , मी नाव, कीर्ती किंवा स्वार्थ यांसाठी दाने देईन, मी मजा करीन' – अशाप्रकारे अज्ञानाने मोहित होऊन, ती माणसे अनेक विषयांच्या चिंतनात लागून, ती विभ्रांत चित्त असणारी, मोहजालाने झाकलेली माणसे कामभोगात आसक्त होऊन, फार क्लेश देणाऱ्या अपवित्र नरकांत पडतात. ती माणसे अभिमानी असून स्वतःच स्वतःला श्रेष्ठ समजतात आणि आखडून राहातात. धन, मान आणि मद यांच्या नशेत चूर होऊन, ती माणसे केवळ दंभानेच लोकांना 'आपण धर्मात्मा आहोत' असे सोंग दाखविण्यासाठी म्हणजे ईश्वराप्रीत्यर्थ श्रद्धा-विश्वास-पूर्वक नव्हे तर अविधिपूर्वक नाममात्र यज्ञ करतात. अहंकार, बळ, घमेंड, काम आणि क्रोध यांचा आश्रय घेतलेले आसुरी लोक आपल्या तसेच दुसऱ्यांच्या शरीरांमध्ये आत्म-रूपाने स्थित असणाऱ्या माझा द्वेष करतात, आणि सत्याच्या मार्गावरून चालणाऱ्या साधू लोकांच्यावर दोषांचा आरोप करतात. माझा द्वेष करणाऱ्या, क्रूर, नराधम व पापी अशा त्या आसुरी माणसांना मी या संसारात वारंवार आसुरी योनीमध्येच फेकून देतो. हे अर्जुना, ते मूर्ख लोक अशाप्रकारे जन्मोजन्मी वारंवार आसुरी योनी प्राप्त करून घेऊन, मला भगवंताला प्राप्त करून न घेता, (मला प्राप्त करून घेणे हे तर दूरच राहिले, माझ्या प्राप्तीसाठी योग्य असे मनुष्य शरीरसुद्धा प्राप्त न करून घेता) आणखीही अधिक नीच असणाऱ्या योनी प्राप्त करून घेतात.

त्या भक्ताच्या मनात नाहीच, तर त्या काम, क्रोध इत्यादींचे पात्र आणखी कोण असणार ? याचा अर्थ असा नव्हे की भगवंताच्या प्रेमी भक्तांचे ठिकाणीसुद्धा विषयी पुरुषाप्रमाणेच, काम, क्रोध अभिमान राहात असतात. आसुरी संपत्तीतील दुर्गण-स्वरूप असणारे काम,क्रोध, अभिमान इत्यादींचा त्याग करण्याची गोष्ट अगोदरच सांगितली गेली आहे. तर मग प्रेमी भक्त अशा महात्म्यांचे ठिकाणी हा दूषित काम कोठून असणार ? त्या प्रेमी भक्तांच्या ठिकाणी विषयासक्ती, हिंसा, द्वेष, आणि क्रोध कोठून असणार ? अभिमानरहित अशा त्यांच्या ठायी अभिमानाचा गंधसुद्धा कोठून येणार ? त्यांच्या ठायी तर यांचे बीजसुद्धा असत नाही. जर त्यांना आपल्या सुखाची कोणतीही वासनाच असत नाही, तर हे दोष त्यांच्या ठिकाणी कोठून बरे येतील ? त्या जीवनाचे एकच उद्दिष्ट, फक्त आपल्या प्रियतम भगवंताला सुखी करणे हेच असते- **कृष्णसुखैकतात्पर्य गोपी-भाववर्य**. त्या भक्तांच्या चित्तामध्ये जगाचा संस्कारच नाही; ते तर लज्जा, घृणा, कुल, शील, मान, देह, गेह, भोग, मोक्ष या सर्वांची जाणीव विसरून, त्या गोष्टी केवळ आपल्या प्रियतम भगवंतावरूनच ते ओवाळून टाकतात. म्हणून ज्याप्रमाणे हे भक्त स्वत:च दिव्य भावाने युक्त झालेले असतात, त्याप्रमाणेच त्यांचे काम, क्रोध अभिमान हेसुद्धा दिव्य होऊन जातात. म्हणूनच परम वैराग्ययुक्त जीवन्मुक्त मुनींनी अशा प्रकारे भगवंतामध्ये रंगून गेलेल्या प्रेमी भक्तांच्या अशा लीला गाणे आणि ऐकणे, यांतच स्वत:ला कृतार्थ मानले आहे. ज्यांचे चित्त सर्व बाजूंनी परावृत्त झालेले आहे, एकमात्र भगवंत हाच ज्यांच्या कामनेची वस्तू बनून गेला आहे, ते भक्त आपल्या भगवंताच्या दर्शनाच्या कामनेच्या आवेगाने पीडित होऊन, रडत रडत धावा करतात-

हे देव हे दयित हे भुवनैकबन्धो
हे कृष्ण हे चपल हे करुणैकसिन्धो ।

हे नाथ हे रमण हे नयनाभिराम

हा हा कदा नु भवितासि पदं दृशोर्मे ॥

(श्रीकृष्णकर्णामृत)

"हे देवा, हे प्रियतमा, हे विश्वाच्या एकमेव बंधो, आमच्या मनाला स्वत:कडे बलपूर्वक खेचणाऱ्या हे प्रभो, हे चपल, हे करुणेच्या एकमात्र सागरा, हे नाथा, हे रमणा, हे नयनाभिरामा, अहो अहो, तुम्ही केव्हा बरे आम्हाला दृष्टिगोचर होणार ?"

जिचे प्राण कृष्णाप्रत गेले आहेत, अशी रुक्मिणी म्हणते-

श्रुत्वा गुणान् भवनसुन्दर श्रृण्वतां ते

निर्विश्य कर्णविवरैर्हरतोऽङ्गतापम् ।

रूपं दृशां दृशिमतामखिलार्थलाभं

त्वय्यच्युताविशति चित्तमपत्रपं मे ॥

का त्वा मुकुन्द महती कुलशीलरूप-

विद्यावयोद्रविणधामभिरात्मतुल्यम् ।

धीरा पतिं कुलवती न वृणीत कन्या

काले नृसिंह नरलोकमनोऽभिमराम् ॥

यस्याङ्घ्रिपङ्कजरज:स्नपनं महान्तो

वाञ्छन्त्युमापतिरिवात्मतमोऽपहत्यै ।

यर्ह्यम्बुजाक्ष न लभेय भवत्प्रसादं

जह्यामसून् व्रतकृशाञ्छतजन्मभि: स्यात् ॥

(श्रीमद्भा- १०/५२/३७,३८-४३)

"हे अच्युता, हे त्रिभुवनसुंदरा, कानांचे द्वारा हृदयात प्रवेश करून जे आपले दिव्य गुण ऐकणाऱ्यांच्या शरीर-तापाचे हरण करून टाकतात, ते गुण, आणि नेत्र असणाऱ्या माणसांच्या दृष्टीला जे सर्वश्रेष्ठ असा लाभ आहे

ते हे आपले दिव्य रूप, या दोहोंची प्रशंसा ऐकल्यावर, माझे मन सारी लोकलज्जा टाकून देऊन, आपल्यावर अत्यंत आसक्त होऊन गेले आहे. हे मुकुंदा, कुल, शील, रूप, विद्या, वय, द्रव्य आणि प्रभाव या बाबतीत आपल्या सारखे फक्त आपणच आहात. हे पुरुषोत्तमा, या नर-लोकाच्या मनाला मोहित करणारे आपण आहात. हे पुरुषसिंहा, विवाहकाल (आपल्याशी संयोगाचा अवसर) उपस्थित झाल्यावर, अशी कोणती प्रेम करणारी, भक्तरूपी अशी कुलवती, गुणवती, आणि बुद्धिमती कन्या आहे की जी आपल्या बरोबर विवाह बंधनाची इच्छा करणार नाही ? हे कमललोचना, उमापती शंकरासारखे महान् देव आपल्या हृदयातील अज्ञानरूपी अंधार दूर करण्यासाठी आपल्या ज्या चरण-धूलीमध्ये स्नान करण्याची प्रार्थना करीत राहातात, ती चरण धूळ जर मला प्रसाद रूपाने मिळाली नाही, तर निश्चितपणे असे समजावे की मी व्रत, इत्यादींच्या द्वारा माझ्या शरीराला सुकवून, या व्याकुळ झालेल्या माझ्या प्राणांचा मी त्याग करून टाकीन, आणि असे करता करता शंभर जन्मात केव्हातरी आपला प्रसाद मला प्राप्त होऊन जाईलच."

भगवान् श्रीकृष्णाच्या पट्टराण्या द्रौपदीला सांगतात-

**न वयं साध्वि साम्राज्यं स्वाराज्यं भौज्यमप्युत ।**
**वैराज्यं पारमेष्ठ्यं च आनन्त्यं वा हरेः पदम् ॥**
**कामयामह एतस्य श्रीमत्पादरजः श्रियः ।**
**कुचकुङ्कुमगन्धाढ्यं मूर्ध्ना वोढुं गदाभृतः ॥**

(श्रीमद्भागवत १०/८३/४१-४२)

" हे साध्वी, पृथ्वीचे साम्राज्य, इंद्राचे राज्य, भौज्यपद, सिद्धी, ब्रह्मदेवाचे स्थान, मोक्ष अथवा वैकुंठ यांतील कशाचीही इच्छा आम्हाला नाही. लक्ष्मीच्या स्तनांवरील कुंकुमाच्या सुगंधाने युक्त अशी भगवान् श्रीकृष्णाची चरणधुळीच सदा आम्ही आमच्या मस्तकावर लावावी, एवढीच

इच्छा आम्हाला आहे."

मुक्ती तर अशा भक्तांच्या चरणांवर लोळत असते-

**यदि भवति मुकुन्दे भक्तिरानन्दसान्द्रा।**

**विलुठति चरणाग्रे मोक्षसाम्राज्यलक्ष्मीः ॥**

" श्रीमुकुंदाच्या चरणी ज्याची परमानंदरूप भक्ती असते, त्याच्या चरणांवर मोक्षरूपी साम्राज्याची श्री लोळण घेते."

आदर्श, प्रेममय, भक्तशिरोमणी अशा गोपी आपला प्रियतम भगवान् दृष्टीआड गेल्यावर, विलाप करीत म्हणतात-

**विरचिताभयं वृष्णिधुर्य ते चरणमीयुषां संसृतेर्भयात् ।**

**करसरोरुहं कान्त कामदं शिरसि धेहि नः श्रीकरग्रहम् ॥**

**व्रजजनार्तिहन् वीर योषितां निजजनस्मयध्वंसनस्मित ।**

**भज सखे भवत्किङ्करीः स्म नो जलरुहाननं चारु दर्शय ॥**

**प्रणतकामदं पद्मजार्चितं धरणिमण्डनं ध्येयमापदि ।**

**चरणपङ्कजं शन्तमं च ते रमण नः स्तनेष्वपर्पयाधिहन् ॥**

(श्रीमद्भागवत १०/३१/५-६, १३)

"हे यदुकुलशिरोमणी, जे लोक संसाराच्या भयामुळे तुमच्या चरणांचा आश्रय घेतात, तुमची करकमले त्यांना अभय देऊन, त्यांच्या अभिलाषा पूर्ण करतात. हे प्रियतमा, ज्या करकमलांनी तुम्ही लक्ष्मीचा हात पकडला आहे, तीच तुमची करकमले तुम्ही आमच्या मस्तकावर ठेवावीत. व्रजवासी जनांच्या दुःखाचे हरण करणाऱ्या हे वीरा, तुमचे मंद मधुर हास्य हे भक्तांच्या गर्वाचे हरण करणारे आहे. हे मित्रा, आम्ही तुमच्या सेविका आहोत; कृपा करून तुम्ही आमचा स्वीकार करावा, आणि आपले सुंदर मुखकमल आम्हांला दाखवावे. हे रमणा, हे दुःख नष्ट करणाऱ्या कृष्णा, तुमची चरण कमले प्रणत जनांची कामना पूर्ण करणारी आहेत; ती लक्ष्मीच्या द्वारा सदा सेविली जाणारी

आहेत, पृथ्वीचे आभूषण आहेत, विपत्तीच्या काळात ध्यान केल्याने ती कल्याण करणारी आहेत. तेव्हा हे प्रियतमा, त्या परम कल्याणमय, अतिशय शीतल अशा चरणांना तुम्ही आमच्या तापलेल्या हृदयावर स्थापन करावे."

अशा प्रकारे प्रेमी भक्त हे श्रीकृष्णाच्या कामामुळे पीडित होऊन, सदा त्याच्यासाठी रडत असतात, आणि त्यालाच हाका मारीत असतात. आणि लपंडावाप्रमाणे लीला करणारा, लीला-विहारी, भगवान् जेव्हा त्या भक्तांची प्रेमाने दिलेली हाक ऐकून, आणि जेव्हा तो त्रिभुवन- कमनीय, योगीजनांना दुर्लभ, देवदेवांना हवासा वाटणारा, ऋषि-महर्षि- महापुरुष यांच्या चित्तांना आकर्षक वाटणारा, सर्व सौंदर्याच्या माधुर्याच्या रसामृताचे सार असणारा, आनंदाचा कंद, मदनमोहन असा तो भगवान जेव्हा मन्मथाच्या मन्मथरूपामध्ये मंद मंद हसत आणि मुरलीमध्ये आपला मोह पाडणारा दिव्य सूर भरत, अचानक प्रकट होऊन, आपल्या प्रेमानंदरसाचे माधुर्य चारी बाजूला पसरून टाकतो, जेव्हा तो भगवान् आपल्या सौंदर्याच्या माधुर्याने युक्त आणि अमृताप्रमाणे अतिशय शीतल अशा मुखचंद्राची शुभ्र ज्योत्स्ना चारी बाजूंना शिंपडतो, तेव्हा तेथे त्या भाग्यवान्, दिव्यचक्षू, दिव्य भावात पोचलेल्या भक्त-महात्म्यांच्या चित्तांची काय अवस्था होते, तिचे वर्णन करण्याची शक्ती कुणामध्येही नाही. हे अनिर्वचनीय असे रहस्य आहे.

त्यावेळी त्या भक्ताचे स्वत:चे सर्व काही त्या भगवंताच्या चरणांवर आपोआपच अर्पण होऊन जाते, आणि तो भक्त आनंदाच्या उल्हासात मत्त होऊन, साऱ्या जगाची पर्वा सोडून देऊन, पुकारा करतो की, हे देवा, आमचे जगणे आणि मरणे हे तुमच्या साठीच आणि तुमच्याच चरणांवर होईल. माझ्या हृदयाची हीच एकमात्र कामना आहे. जेव्हा सर्व काही भगवंताचे चरणी अर्पण झाले आहे तेव्हा मेल्यानंतर शरीराचीही पाच (महा-) भूते मला सोडून वेगळी होतील, तरीसुद्धा ती तुमचीच सेवा करीत राहातील.

जेव्हा केव्हा ही पाच महाभूते मला सोडून वेगळी होतील, तेव्हा ती माझ्या प्रियतमाच्या सेवेपासून मागे हटू नयेत म्हणून भक्त हा विव्हल चित्ताने विधात्याची प्रार्थना करतो-

**पञ्चत्वं तनुरेतु भूतनिवहाः स्वांशे विशन्तु स्फुटं**
**धातारं प्रणिपत्य हन्त शिरसा तत्रापि याचे वरम् ।**
**तद्वापीषु पयस्तदीयमुकुरे ज्योतिस्तदीयाङ्गन-**
**व्योम्नि व्योम तदीयवर्त्मनि धरा तत्तालवृन्तेऽनिलः ।।**

पाच तत्त्वे अलग अलग होणारच. हे प्रभो, आपण इतके करा की पाण्याचा भाग त्या कूपात जाऊन मिसळावा की ज्याचे पाणी माझा प्रियतम हा स्नान व पान यांच्यासाठी घेतो, (की) अग्नि-तत्त्व हे त्या दर्पणात जाऊन मिसळावे की ज्या आरश्यात माझा प्रियतम आपले मुख पाहात असेल, (की) पृथ्वी-तत्त्व हे त्या मार्गाशी मिसळून जावे की ज्या मार्गाने माझा प्रियतम ये-जा करीत असेल, (की) वायु-तत्त्व हे त्या भाग्यवान् पंख्यात जाऊन मिसळावे की ज्या पंख्याच्या योगे माझा प्रियतम वारा घेत असेल, आणि आकाशतत्त्व हे त्या अंगणात जाऊन मिसळावे की जेथे माझा प्रियतम बसत असेल.

आणि जीव ? तो तर प्रभूच्या चरणांपासून कधीच अलगच होऊ शकत नाही. त्या जीवाला तर तो भगवंत आपल्या हृदयामध्येच दडवून ठेवील. हे आहे भक्तांच्या कामाचे एक छोटेसे दृश्य. आता त्यांचा क्रोध पहा.

एके दिवशी श्रीकृष्णाच्या कोणत्यातरी खिजवण्याच्या वागणुकीमुळे श्रीराधा चिडून गेली. त्यावेळी जेव्हा तिची मैत्रीण समजावू लागली, तेव्हा क्रोधाने ती राधा म्हणू लागली "तू त्याचे नावसुद्धा माझ्यासमोर घेऊ नको. त्याची काय गोष्ट ? आता मी काळ्या रंगाच्या सर्व वस्तूंचा त्याग करून टाकेन. जीवनभर त्या कृष्णाच्या विरहाग्नीने मी जळत राहीन, पण त्याला भेटणार नाही."

मिलौं न तिनसों भूल, अब जौलौं जीवन जियौं।
सहौं बिरहको सूल, बरु ताकी ज्वाला जरौं ॥
मैं अब अपने मन यह ठानी । उनके पंथ पिऊँ नहिं पानी ॥
कबहूँ नैन न अंजन लाउँ । मृगमद भूलि न अंग चढ़ाऊँ ॥
सुनौं न स्रवननि अलि पिक बानी । नील जल परसौं नहिं पानी ॥

जरा लक्ष देऊन पाहा, या चिडीमध्ये किती प्रसन्नता भरलेली आहे.

एके दिवशी लीलामय अशा कृष्णाने आपल्या भक्त-मित्रांच्या प्रणय-कोपाचा आनंद लुटण्यासाठी, खेळामध्ये गडबड करून मित्रांना चिडविले. मित्रांनी एकत्र येऊन निश्चय केला की या खट्याळ कृष्णाला खेळातून बाजूला काढू या. श्यामसुंदर कृष्णाचा वियोग तर एक क्षणसुद्धा सहन करण्यास त्यांपैकी एकही जण तयार नव्हता; कारण त्याला अलग करताच त्यांचे प्राण हेसुद्धा अलग होत होते; परंतु वरवर त्यांनी कृष्णाला म्हटले, "अरे कृष्णा, तू स्वतःच गडबड करीत आहेस; आणि मग हेकेखोरपणे रागावून जातोस. दूर हो येथून. आम्ही तुला आमची साथ देऊन खेळ खेळू देणार नाही." बस, इथे धक्का मिळाला आणि प्राणधन असा श्यामसुंदर ढिला पडला. तो त्यांच्या पाया पडू लागला, आणि शपथा घे घेऊन क्षमा मागू लागला.

असा आहे त्या भक्तांचा क्रोध

आता उरली अभिमानाची गोष्ट. तो दूषणरहित असा रुसवा या प्रेमाभक्तीचे एक आभूषणच आहे. एकदा श्रीराधाराणी रुसली व अभिमान धरून बसली. तिची समजूत काढता काढता भगवान् थकून गेले. आणि मग शेवटी म्हणाले- " हे राधिके, विविध अवतारामध्ये राक्षसांशी युद्ध करताना मला इतके कष्ट झाले नाहीत, की जितके तुझ्या मानामुळे पडले. धन्य आहे तुझा रुसवा. मी मोठमोठी कामे केली, कुठेही हार मानली नाही, कुठेही मला थकवा जाणवला नाही. पण आज तुझी समजूत घालताना मात्र माझे सारे

सामर्थ्य नष्ट होऊन गेले." अशी ही भक्त आणि भगवान् यांची प्रणय-लीला आहे. या लीलेमध्ये राग, काम, क्रोध, मान हे सर्व आहेत; परंतु ते सर्व दुसऱ्या स्वरूपात आहेत. ते सर्व पवित्र प्रेमाचे केवळ दुसरे नाव आहेत. इथला सर्व-धर्म-त्याग हाच परम धर्म आहे. येथला विधीचा अभाव हाच सर्वश्रेष्ठ प्रेमाचा विधी आहे.

ही तर झाली सिद्ध अशा भक्तांची गोष्ट. भक्तीचे साधन करतानासुद्धा जर काम, क्रोध, लोभ कधीतरी सतावू लागतील, तर ते भगवंताकडेच लावले पाहिजेत. ज्या गोष्टी आपल्या मार्गात बाधक असतात, त्याच भगवंताकडे सुपूर्त केल्यावर त्या गोष्टी साधक बनून जातात, असा निश्चय धरावयास हवा.

श्रीमद्भागवतामध्ये परमहंसामधील श्रेष्ठ अशा श्रीशुकदेवजींचे वचन आहे-

**कामं क्रोधं भयं स्नेहमैक्यं सौहृदमेव च ।**
**नित्यं हरौ विदधतो यान्ति तन्मयतां हि ते ।।**

(१०/२९/१५)

"काम, क्रोध, भय, स्नेह, तादात्म्य, तसेच हे सर्व काही जे कोणी लोक श्रीहरीच्या बाबतीत करतात, ते निश्चितपणे भगवंताशी तन्मय होऊन जातात."

तीव्र काम (इच्छा) त्या वस्तूसाठीच उत्पन्न होते की जी सर्वांत श्रेष्ठ असेल, संपूर्ण ऐश्वर्याने युक्त असेल, अतिशय माधुर्याने भरलेली असेल, सर्वांगसुंदर असेल, आणि आनंदमय असेल; हे सर्व काही भगवंतामध्ये आहे. असा विचार करून, सदा सर्वदा एकमात्र श्रीकृष्णाशी मीलन पावण्याच्या कामनेने पीडित असावे, आणि ही काम-वासना उत्तरोत्तर वाढतच जावी. प्रेमाने भरलेला क्रोध अशाप्रकारे करावा की "देवा, तुम्ही फार निष्ठुर आहात; इतक्या हाका मारल्या तरीसुद्धा तुम्ही येत नाही. लक्षात ठेवा आताही मी हाक

मारतो आहे; नंतर मात्र तुम्हाला माझ्या मागे मागे भटकावे लागेल." आठही प्रहर चिंतनास चिकटून राहून, प्रेमाने पूर्ण असा रुसवा अशा प्रकारे करावा की "माझ्याजवळ न संपणारे चिंतन धन आहे; मला तुमची कोणत्याही प्रकारे गरज नाही; तुम्हाला शेकडो वेळा गरज पडेल तेव्हा तुम्ही मजकडे यावे," इत्यादी.

भगवंताच्या बाबतीत काम, क्रोध आणि अभिमान हे कसे करता येतात, याचे आणखी एक सुंदर उदाहरण म्हणजे मातेला सर्वस्व मानणारा शिशु-लहान बालक- होय. लहान मुलाला बहमूल्य रत्न द्या, त्याला चांगल्या चांगल्या वस्तू खायला द्या, त्याचा खूप सन्मान करा, त्याचे यश गा, त्याला स्वर्ग वा मोक्ष मिळण्याची गोष्ट सांगा, पण त्याचा काही उपयोग होणार नाही; आपली आई आणि आईचे स्तन सोडून त्याला आणखी काहीसुद्धा नको असते. तो कशाची इच्छा करील ? त्याला इतर कोणती वस्तू माहीतच नाही; त्याला कळणारी व इच्छा वाटणारी एकमात्र वस्तू आई हीच आहे. आईच्या ऐवजी तो दुसऱ्या कोणत्याही वस्तूने संतुष्ट होऊ शकणार नाही. याचप्रमाणे भक्ताची कामना ही केवळ भगवंतासाठीच असावयास हवी. एकमात्र भगवंत हाच त्याच्या इच्छेचा विषय व्हावयास हवा.

लहान मुलगा पुढे काहीसा मोठा झाला; इकडे तिकडे चालू लागला; चालता चालता ठोकर लागून खाली पडला व रडू लागला. मुलाचे रडणे ऐकून आई धावत आली. मुलगा चिडून गेला. तो पडला स्वतः, परंतु त्याचा क्रोध मात्र आईवर. आपल्या बोबड्या बोलाने तो पुन: पुन: म्हणू लागला, "आई, तू मला एकट्याला सोडून का गेलीस ?" मग अभिमान धरून, तो रुसून बसतो व आईला म्हणतो, "आई, जा, जा; मी तुझ्याशी बोलणार नाही. तुझ्या कुशीत येणार नाही." तेव्हा आई त्याची समजूत घालते, त्याला कुशीत घेण्याची इच्छा करते, त्याला स्तनपान करू इच्छिते, परंतु तो रडत रडत पुढे

पुढे पळत राहातो. तो असे का करतो ? याचे कारण तो स्वाभाविकपणेच आईवर आपला अधिकार आहे असे समजत असतो. तो आईलाच आपले सर्वस्व मानीत असतो. तो उपाशी राहिला, तर दोष आईचा. तो पडला तर अपराध आईचा, आणि तो झोपू शकला नाही, तरी आईचाच अपराध, आणि अपराधाची शिक्षा आहे त्रागा करणे आणि रुसणे- म्हणजे (मुलाचा) क्रोध आणि अभिमान. अशाप्रकारे भगवंतावर अवलंबून असणारा भक्तसुद्धा आपल्या भगवंताच्या बाबतीत काम, क्रोध आणि अभिमान इत्यादी करू शकतो.

* * *

# प्रेमी भक्तांचा महिमा

**त्रिरूपभङ्गपूर्वकं नित्यदासनित्यकान्ताभजनात्मकं प्रेमैव कार्यम्, प्रेमैव कार्यम् ॥६६॥**

**६६- तीन (स्वामी, सेवक आणि सेवा या) रूपांचाच भंग करून, नित्य अशा दास्यभक्तीने किंवा नित्य अशा कांताभक्तीने भगवंतावर प्रेमच करावयास हवे. प्रेमच करावयास हवे.**

स्वामी, सेवक आणि सेवा, अथवा पती, पत्नी आणि पतिसेवा ही रूपे नष्ट करून, नित्य दास्य भक्तीच्या द्वारा अथवा कांताभक्तीच्या द्वारा भगवंतावर प्रेमच करावयास हवे. दास्यभाव आणि कांताभाव या दोन्हीद्वाराच जाता जाता भगवंताचे बरोबर तन्मयता होते. निष्काम भावाने शरीर, मन, वाणी, किंबहुना सर्व काही स्वामीला अर्पण करून, एक आपला स्वामी सोडून, जगातील दुसऱ्या कुणालासुद्धा न ओळखणे, हा दास्यभक्तीचा आदर्श आहे. आणि पती हाच माझे तन, मन, धन, गती, मती, आश्रय, जीवन, प्राण, धर्म, मोक्ष आणि भगवान् आहे, पतीचे शरीर ते माझे शरीर, पतीचे मन ते माझे मन, पतीची सेवा ही माझी सेवा, पतीचे ऐश्वर्य ते माझे ऐश्वर्य, पतीचा मान तो माझा मान, पतीचा अपमान तो माझा अपमान, पतीचा प्राण तो माझा प्राण, अशा प्रकारे एकमात्र पतिपरायण आणि पति-गत-प्राण होऊन, निष्कामपणे, अनन्य भावाने निरंतर पतीच्या सेवेत गढून जाणे, हा कांता-भक्तीचा आदर्श आहे. खरे पाहता दास्यभक्ती व कांताभक्ती हे दोन्हीही एकच आहेत. दोन्हीमध्ये समानताच आहे; दोन्हीमध्ये अभिन्नता आहे. दास्य-भक्तीमध्येसुद्धा सेवक आपले सर्व काही विसरून जाऊन, स्वामीच्या नावाचा व गोत्राचा बनून जातो,

आणि कांताभक्तीमध्ये तर आपले नाव व गोत्र हे पतीच्या नाम-गोत्राशी जोडून टाकूनच, कांता-भावाची प्राप्ती होते. स्वामी आणि सेवक यांचे कुल-गोत्र एकच होऊन जाते. या दास्य भक्तीचा महिमा गात, भगवती श्रीराधिका त्या भक्तवर उद्धवजीला सांगते-

> कृष्णभक्तिः कृष्णदास्यं वरेषु च वरं वरम् ।
> श्रेष्ठा पञ्चविधामुक्तेर्हरिभक्तिर्गरीयसी ॥
> ब्रह्मत्वादपि देवत्वादिन्द्रत्वादमरादपि ।
> अमृतात् सिद्धिलाभाच्च हरिदास्यं सुदुर्लभम् ॥
>
> (ब्रह्मवैवर्त० कृ० ९७/८-९)

“सर्व वरांमध्ये श्रेष्ठ वर म्हणजे श्रीकृष्ण-भक्ती किंवा श्रीकृष्णदास्य हेच होय. पाच प्रकारच्या श्रेष्ठ मुक्तींमध्ये हरिभक्ती श्रेष्ठ आणि अधिक महत्त्वाची आहे. ब्रह्मत्व, देवत्व, अमरत्व, अमृतप्राप्ती, सिद्धीचा लाभ, या सर्वांपेक्षासुद्धा श्रीहरीचे दास्य प्राप्त होणे हे अतिशय दुर्लभ आहे.”

कांता-भक्तीमध्ये तर एकात्मकता आहेच. कांता आणि कांत हे दोघे एकमेकात मिळून मिसळून एकच होऊन जातात. म्हणून तेथे तीन रूपांचा भंग आपोआपच होतो. सूत्रकार सांगतात की या एकात्मतेच्या आदर्शाला समोर ठेवून, या भावाला मनामध्ये स्थान देऊन, दास्यभाव किंवा कांताभक्ती यांचेद्वारा भगवंतावर फक्त प्रेमच करा.

**भक्ता एकान्तिनो मुख्याः ॥६७॥**

**६७- एकान्त (अनन्य) भक्तच श्रेष्ठ आहे.**

या पूर्वीच्या सूत्रास अनुसरून, भक्ती करणारा, भगवंताचा अनन्य असा भक्त हाच सर्वांमध्ये श्रेष्ठ आहे. कारण त्याचे तन, मन, धन, इत्यादी सर्व काही भगवंताचेच होऊन गेलेले असते. तो परमात्म्याच्या यंत्राप्रमाणे होऊन, संसारात राहात असतो. त्याचा आत्मा परमात्म्याशी मिसळून गेलेला असतो.

त्याचे मन परमात्म्याच्या मनामध्ये रमून जाते, आणि त्याचे डोळे हे सर्व जागी परमात्म्यालाच पाहात असतात.

**कण्ठावरोधरोमाञ्चाश्रुभिः परस्परं लपमानाः पावयन्ति कुलानि पृथिवीं च ॥६८॥**

**६८- असले अनन्य भक्त हे कंठावरोध (गळा दाटणे), रोमांच, आणि अश्रुयुक्त नेत्र यांनी युक्त होऊन, परस्परांशी संभाषण करीत असताना आपल्या कुळांना आणि पृथ्वीला पवित्र करतात.**

भगवंताचे अनन्य भक्त हे जेव्हा एकत्र येऊन, आपला प्राणस्वरूप असा जो प्रियतम भगवान् त्याची चर्चा करतात, तेव्हा तर त्यांचा प्रेम-सागर उचळंबून येतो. तेव्हा ते एखादी क्रिया करीत असूनसुद्धा बोलू शकत नाहीत. त्यांचे गळे दाटून येतात; त्यांचे शरीर पुलकित होऊन जाते; त्यांच्या रोमारोमातून प्रेमाच्या किरण-धारा बाहेर पडून, त्या ठिकाणी त्या निर्मल प्रेम-ज्योती पसरवितात. तेथील वातावरण अत्यंत विशुद्ध आणि प्रेममय होऊन जाते. त्यावेळी ते भक्तांचे समुदाय हे प्रेमाने विव्हळ होऊन, डोळ्यांतून प्रेमाश्रूंच्या धारा वाहावत, परम आनंदामध्ये मग्न होऊन जातात. ती स्थिती फारच दुर्लभ आणि परम पवित्र असते. ज्या भाग्यवंतांना ही अवस्था प्राप्त होते, त्या सर्वांची कुळे तर पवित्र होतातच.

या खेरीज त्यांच्या अस्तित्वाने पृथ्वीसुद्धा पवित्र होऊन जाते. त्या वेळी त्या पवित्र प्रेमस्वरूप अशा भक्ताच्या शरीराने स्पर्श केलेली थोडीशीसुद्धा हवा ज्याच्या शरीराला स्पर्श करते, तोसुद्धा पवित्र होऊन जातो. शास्त्रामध्ये सांगितले आहे-

कुलं पवित्रं जननी कृतार्था
वसुन्धरा पुण्यवती च तेन ।
अपारसंवित्सुखसागरेऽस्मिं-

**लीनं परे ब्रह्मणि यस्य चेत: ॥**

"ज्याचे चित्त अपरंपार अशी संवित् तसेच सुखाचा सागर अशा परब्रह्मामध्ये लीन होऊन गेले आहे, त्याच्या जन्माने त्याचे कुळ पवित्र होते, त्याची आई कृतार्थ होते, आणि पृथ्वी पुण्यवान् होऊन जाते."

श्रीमद् भागवतात भगवान् सांगतात-

**वाग्गद्गदा द्रवते यस्य चित्तं**

**रुदत्यभीक्ष्णं हसति क्वचिच्च ।**

**विलज्ज उद्गायति नृत्यते च**

**मद्भक्तियुक्तो भुवनं पुनाति ॥**

(११/१४/२४)

"प्रेम प्रकट झाल्यामुळे ज्याची वाणी गद्गद होते आणि ज्याचे चित्त द्रवीभूत होऊन जाते, जो प्रेमावेशामुळे वारंवार रडतो, तर कधी हसतो, तर कधी लाज सोडून उंच स्वरात गाऊ लागतो आणि नाचू लागतो, असा माझा परम भक्त त्रैलोक्यास पवित्र करतो."

**तीर्थीकुर्वन्ति तीर्थानि सुकर्मीकुर्वन्ति कर्माणि सच्छास्त्रीकुर्वन्ति शास्त्राणि ॥६९॥**

**६९- असले भक्त तीर्थांना चांगले तीर्थ, कर्मांना चांगले कर्म, आणि शास्त्रांना सत् शास्त्र करून टाकतात.**

पापी पुरुष व स्त्रिया यांना तीर्थे ही पापरहित आणि पवित्र करतात; परंतु पापात्मा अशा या लोकांच्या सतत संगतीमुळे त्यांच्यामध्ये मालिन्य येते. तीर्थांची ती मलिनता भक्तांच्या समागमामुळे नष्ट होते.

भगीरथाच्या घोर तपस्येने प्रसन्न होऊन, त्याला वर देण्यासाठी प्रगट झालेल्या भगवती श्रीगंगेने त्या भगीरथाला सांगितले, "भगीरथा, मी पृथ्वीवर कशी येऊ ? जगातील सारे पापी लोक तर वारंवार येऊन, माझ्यामध्ये स्नान

करून आपली पापे धुवून टाकतील. पण त्या पापी माणसांचा अपरंपार असा पापरूपी चिखल धुवायला मी कोठे जाऊ ? यावर आपण काय विचार केला आहे?" याला उत्तर देताना भगीरथाने सांगितले-

**साधवो न्यासिन: शान्ता ब्रह्मिष्ठा लोकपावना: ।**
**हरन्त्यघं तेऽङ्गसङ्गात् तेष्वास्ते ह्यघभिद्धरि: ॥**

(श्रीमद्भागवत ९/९/६)

"अहो मातोश्री, समस्त विश्वाला पवित्र करणारे, विषयांचा त्याग करणारे, शांत स्वरूप असणारे, ब्रह्मनिष्ठ असे साधुमहात्मे येऊन, तुमच्या प्रवाहात जेव्हा स्नान करतील, तेव्हा त्यांच्या शरीरांच्या संगाने तुमची सर्व पापे धुऊन जातील. कारण त्यांच्या हृदयामध्ये समस्त पापांचा नाश करणारा श्रीहरी हा निवास करतो."

प्रचेतागण हे भगवंताची स्तुती करताना म्हणतात-

**तेषां विचरतां पद्भ्यां तीर्थानां पावनेच्छया ।**
**भीतस्य किं न रोचेत तावकानां समागम: ॥**

(श्रीमद्भागवत ४/३०/३७)

"देवा, आपले जे भक्तगण तीर्थांना पवित्र करण्यासाठीच पृथ्वीवर संचार करतात, त्यांचा समागम हा संसाराच्या भीतीने भ्यालेल्या पुरुषाला कसा बरे प्रिय होणार नाही ? "

धर्मराज युधिष्ठिर भक्तराज विदुराला सांगतात-

**भवद्विधा भागवतास्तीर्थीभूता: स्वयं प्रभो ।**
**तीर्थीकुर्वन्ति तीर्थानि स्वान्त:स्थेन गदाभृता ॥**

(श्रीद्भागवत १/१०/१०)

" हे प्रभो, आपल्यासारखे भगवद्भक्त हे स्वत:च तीर्थस्वरूप आहेत. (पापी लोकांच्या द्वारा कलुषित झालेल्या) तीर्थांना आपणच आपल्या हृदयात

विराजमान असणाऱ्या भगवान् श्रीगदाधराच्या प्रभावाने पुन: तीर्थत्वाचे दान करून टाकता."

याच प्रकारे जी शास्त्रोक्त कर्मे भक्तगण करू लागतात, तीच सत्कर्मे होऊन जातात, आणि ते ज्या शास्त्रांचा आदर करतात तीच सत्-शास्त्रे मानली जातात. खरे तर हे सांगणेसुद्धा अतिशयोक्ती होणार नाही की भक्त लोक ज्या जागी राहातात, ज्या सरोवरात अथवा नदीत स्नान करतात, तेच तीर्थ बनून जातात. भक्त हे जी काही कर्मे करतात, त्यांनाच 'आदर्श सत्कर्मे' असे म्हटले जाते आणि भक्त हे जो काही उपदेश करतात, तोच सत् शास्त्र आहे असे मानले जाते. त्यांचे निवासस्थानच तीर्थ बनते, त्यांचे कर्म हेच सत्कर्म ठरते, आणि त्यांची वाणी हीच सत्शास्त्र असते. तीर्थ, सत्कर्म, आणि सत्शास्त्र यांचे रहस्य समजल्यावर ही गोष्ट चांगल्या प्रकारे समजून येते.

**तन्मया: ॥७०॥**

**७०- (कारण) ते तन्मय असतात.**

ज्याप्रमाणे नदी समुद्रात मिसळून समुद्र बनून जाते, त्याचप्रमाणे भक्त हासुद्धा आपले तन, मन, धन, बुद्धी व अहंकार इत्यादी सर्व काही प्रियतम अशा भगवंताला अर्पण करून, भगवंताशी तन्मय होऊन जातो. असला भक्त हा प्रत्यक्ष भगवंताच्या स्वरूपाचाच होऊन जातो. तो जेथे राहातो तेथील सर्व सूक्ष्म आणि स्थूल वातावरण शुद्ध होऊन जाते. म्हणूनच त्याच्या केवळ संगतीने तीर्थ, कर्म आणि शास्त्र हे पवित्र होऊन जातात. अशाच भक्तांच्या मार्फत भगवान्, भगवंताचे नाम, आणि भगवंताची भक्ती यांचा महिमा वाढत जातो, आणि त्यांच्या संगतीत येणारे पापातले पापी असे स्त्री-पुरुष हे सुद्धा घोर असा संसाररूपी सागर अनायासेच तरून जातात.

**मोदन्ते पितरो नृत्यन्ति देवता: सनाथा चेयं भूर्भवति ॥७१॥**

**७१- (असे भक्तांचे प्रकट होणे पाहून) पितरांचे समूह प्रमुदित**

होतात, देवता नाचू लागतात, आणि ही पृथ्वी सनाथच होऊन जाते.

भक्तांचे प्रकट होणे हे सर्वांना शुभ असते; कारण त्यांची सर्वच कर्मे ही स्वाभाविकपणेच लोकांचे कल्याण करणारी असतात. त्यांच्या प्रभावाने धर्माच्या बाबतीत लोकांची श्रद्धा वाढते आणि पितरांचे कार्य व देवांचे कार्य यांच्याबद्दल विश्वास उत्पन्न होतो. यामुळे धर्म-मार्गावरून विचलित झालेले लोक पुन: धर्ममार्गावर येऊन यज्ञ, दान, श्राद्ध, तर्पण, इत्यादी कर्मे करू लागतात; त्यामुळे देवता तसेच पितर यांना फार सुख मिळते. भक्तीच्या सामर्थ्याने भक्ताच्या मागची-पुढची कित्येक कुळे तरून जातात; म्हणून आपल्या कुळात भक्त उत्पन्न झाला हे पाहून पितर-गण हे आपल्या मुक्तीच्या मोठ्या आशेने हर्षोत्फुल्ल होऊन जातात. पद्म पुराणात सांगितले आहे-

**आस्फोटयन्ति पितरो नृत्यन्ति च पितामहा: ।**

**मद्वंशे वैष्णवो जात: स नस्त्रा भविष्यति ॥**

"पितृ, पितामह यांचा समूह आपल्या वंशात भगवद्भक्ताचा जन्म झाला आहे हे जाणून, "हा आमचा उद्धार करील." या आशेने प्रसन्न होऊन नाचू लागतात आणि टाळ्या पिटू लागतात."

बैचेन झालेले, दर्शनाची इच्छा करणारे भक्त हे कोणत्याही गोष्टीने संतुष्ट होत नाहीत. म्हणून स्नेहपूर्ण अशा आईप्रमाणे, त्यांना आपल्या मांडीवर घेऊन व खाऊ घालून त्यांना सुखी करण्यासाठी सच्चिदानंदघन असा भगवंत दिव्य रूपाने साक्षात् प्रगट होतो. तो प्रकट होताच देवतांचे अहित करणाऱ्या असुरांच्या विनाशास आरंभ होतो. अशाप्रकारे भक्ताच्या प्रकट होण्यासच भगवंताच्या प्रगट होण्याचे कारण समजून देवता-गणसुद्धा नाचू लागतात. जोपर्यंत भगवंत किंवा भगवंतास प्रिय असणारे धर्मात्मे प्रकट होत नाहीत, तोपर्यंत पृथ्वीदेवी अनाथ झालेली असते. आणि जेव्हा भक्त प्रगट होतात, तेव्हा वासराच्या मागे स्नेहवश होऊन धावणाऱ्या गायीप्रमाणे भगवंतसुद्धा

प्रकट होतो; म्हणून भक्ताच्या प्रादुर्भावानेच पृथ्वी ही सनाथ होऊन जाते.

**नास्ति तेषु जातिविद्यारूपकुलधनक्रियादिभेदः ॥७२॥**

**७२- त्या (भक्तां) च्या ठायी जात, विद्या, रूप, कुळ, धन आणि क्रिया इत्यादींचा भेद असत नाही.**

सूत्रकार येथे या सूत्रात ही गोष्ट समजावून सांगतात की भक्तीमध्ये जात, विद्या, रूप, कुळ, धन आणि कर्म इत्यादींचे प्राधान्य नाही. ब्राह्मण असो वा शूद्र, शिकला सवरलेला असो किंवा न शिकलेला निरक्षर असो, सुंदर असो अथवा कुरूप, उच्च कुळातील असो वा नीच कुळातील असो, श्रीमंत असो किंवा दरिद्री, तसेच पुष्कळ क्रिया करणारा असो अथवा निष्क्रिय असो, जो कोणी आपले सर्वस्व प्रभूला अर्पण करून, सतत त्या प्रभूचे प्रेमपूर्वक स्मरण करण्यामध्ये आपले चित्त तल्लीन करून टाकतो, त्याला भक्तिरूपी श्रेष्ठ आणि दुर्लभ असे धन मिळते. निषादाचा जन्म नीच जातीमध्ये झाला होता. सदन हा कसाई होता. शबरी ही गांवढळ स्त्री होती. ध्रुव हा अज्ञान बालक होता. विभीषण आणि हनुमान इत्यादी कुरूप आणि अकुलीन असे राक्षस व वानर होते. विदुर आणि सुदामा हे निर्धन होते. गोपस्त्रिया क्रिया रहित होत्या. परंतु या सर्वांनी भक्ती आणि प्रपत्ती (शरणागति) यांच्या सामर्थ्याने भगवंताचे प्रेम प्राप्त करून घेतले, आणि ते भगवंताला परमप्रिय होऊन गेले. सर्व सत्कर्मांचे फलस्वरूप अशी भक्ती ज्याच्या हृदयात आहे, तोच भक्त होय, तोच सर्वगुणसंपन्न आहे, मग तो कुणीही का असेना. हीच गोष्ट श्रीरामचरितमानसात सांगितली गेली आहे-

**सोइ सर्बग्य गुनी सोइ ग्याता । सोइ महि मंडित पंडित दाता ॥**
**धर्म परायन सोइ कुल त्राता । राम चरन जा कर मन राता ॥**
**नीति निपुन सोइ परम सयाना । श्रुति सिद्धांत नीक तेहिं जाना ॥**
**सोइ कबि कोबिद सोइ रनधीरा । जो छल छाड़ि भजइ रघुबीरा ॥**

"तोच सर्वज्ञ, गुणी आणि ज्ञाता होय, तोच भूमीचे भूषण, पंडित व दाता होय, तोच धर्मपरायण आणि कुलाचा उद्धार करणारा होय की, ज्याचे मन राम-चरणांमध्ये धुंद असते. जो कपट सोडून रघुवीराचे भजन करतो, तोच नीति-निपुण आणि मोठा विद्वान होय, तोच श्रुती व सिद्धांत चांगल्या प्रकारे जाणणारा होय, तोच कवी, विद्वान आणि तोच रणशूर होय."

याचे असे मात्र तात्पर्य नव्हे की भक्त हा स्वत:ला सर्वांपेक्षा उच्च आणि सर्वगुणसंपन्न समजून, सर्वांकडून आपली पूजा करवून घेतो किंवा समाज, जाती, वर्ण आणि आश्रम यांमध्ये बड्या लोकांच्या बरोबर खाणे-पिणे, विवाह, व्यवहार, राहणे-बिहणे, आचार-विचार, आणि कुलपरंपरा इत्यादींमध्ये आपल्यासाठी समान अधिकाराची मागणी करतो. भक्ताने तर संपूर्ण अभिमानाचा त्याग केलेला असतो; तर मग नवीन खोटा अहंकार अंगी ओढवून घेऊन तो असे का करू लागेल ? जे असे करतात ते भक्त असत नाहीत. वर्णाश्रम आणि भक्ती यांमध्ये फरक आहे. जे कोणी भक्तीच्या नावावर वर्णाश्रमांच्या मर्यादेचा नाश करू इच्छितात, ते तर भक्तीला लांच्छनच लावतात. म्हणून भक्तीच्या मार्गावरून चालणाऱ्या साधकांनी शास्त्राचा त्याग करण्याची भावनाच कधी करू नये. प्रारब्धात नसल्यामुळे विद्या आणि धन मिळू शकत नाहीत हे खरे आहे. तसेच या जन्मामध्ये भक्त हे आपले रूप, जाती आणि कुळ हे सुद्धा बदलू शकत नाहीत; परंतु भक्तांचे ठिकाणी या सर्व वस्तू असल्या किंवा नसल्या म्हणून किंवा त्या कमीजास्त असल्या म्हणून, भक्तांच्या ठिकाणी उंच-नीच असा भेदभाव करू नये. भक्तीचे नाते लक्षात घेऊन जातिभेद इत्यादी कारणांनी भक्ताला कधीही खालच्या दर्जाचा समजू नये; म्हणूनच वैष्णव शास्त्रांमध्ये भक्तांचे बाबतीत जाती, इत्यादी भेदबुद्धीला एक अपराध म्हटले आहे.*

---

* वैष्णव ग्रंथांमध्ये खाली दिलेले ६४ अपराध सांगितले गेले आहेत. ते लक्षात घेऊन व्यवहार केल्याने पुष्कळ लाभ होऊ शकतो. हे अपराध असे:- १. श्रीभगवंत म्हणजे

**यतस्तदीया: ॥ ७३ ॥**

**७३- कारण (सर्व भक्त हे) त्या (भगवंता) चेच आहेत.**

---

कोणीतरी सामान्य देव आहे अथवा विशिष्ट तत्त्व आहे असे समजणे २. वेद हे सामान्य ग्रंथ आहेत किंवा ते पौरुषेय आहेत अशी बुद्धी ठेवणे ३. भक्तांचे बाबतीत जाति-भेदाची बुद्धी बाळगणे ४. गुरु हा एक सामान्य मनुष्य आहे असे समजणे ५. भगवंताच्या प्रतिमेला लाकूड, दगड, धातू, कागद किंवा माती समजणे ६. भगवंताच्या प्रसादाला एक सामान्य खाण्याची गोष्ट मानणे ७. भगवंताच्या चरणोदकाला साधे पाणी समजणे. ८. तुळशीच्या झाडाला साधा वृक्ष मानणे ९. गाईला साधे जनावर समजणे १०. भागवत आणि गीता या ग्रंथांना साधे पुस्तक मानणे ११. भगवंताच्या लीला या सामान्य माणसाने केलेल्या आहेत असे समजणे १२. सांसारिक प्रेम आणि स्त्रीसुख यांचे बरोबर भगवंताच्या लीलांची तुलना करणे १३. गोपींना भगवंतासाठी पर नारी मानणे. १३. कृष्णाच्या रास लीलेला कामचेष्टा समजणे १५. भगवंताच्या महोत्सवाच्या वेळी शिवाशिवीची बुद्धी ठेवणे १६. ईश्वर आणि शास्त्रे यांना न जुमानता नास्तिक होऊन जाणे १७. मनात संशय बाळगून धर्माचे आचरण करणे १८. धर्माच्या पालनात आळस करणे. १९. भक्तांच्या बाहेरच्या बाह्य गोष्टीवरून त्यांची पारख करणे. २०. साधुमहात्म्यांच्या गुण-दोषांवर चर्चा करणे. २१. स्वत:ला उत्तम समजणे २२. कोणत्याही देवतेची किंवा कोणत्याही शास्त्राची निंदा करणे २३. भगवंताच्या मूर्तीपुढे पाठ करून बसणे २४. भगवंताच्या मूर्तीपुढे पादत्राणे घालून जाणे २५. भगवंताच्या मूर्तीसमोर आपल्या गळ्यात माळ घालणे. २६. भगवंताच्या मूर्तीसमोर छडी घेऊन जाणे २७. भगवंताच्या मूर्तीपुढे निळे कपडे घालून जाणे २८. तोंडात चूळ भरल्याशिवाय जाणे २९. मलत्याग किंवा मैथुन केल्यानंतर कपडे बदलल्याशिवाय मंदिरात प्रवेश करणे. ३०. भगवंताच्या मूर्तीपुढे हातपाय पसरून बसणे ३१. भगवंताच्या मूर्तीपुढे पान खाणे ३२. भगवंताच्या मूर्तीसमोर जोरजोराने हसणे ३३. कुचेष्टा करणे ३४. स्त्रियांच्या सभोवती फिरणे ३५. क्रोध करणे ३६. भगवंताच्या मूर्तीसमोर दुसऱ्या कुणालातरी अभिवादन करणे ३७. दुर्गंध येणारी कोणतीही गोष्ट खाल्ल्यावर दुर्गंध दूर झाला नसताना मंदिरात जाणे ३८.मादक द्रव्यांचे सेवन करणे. ३९. कुणाचाही अपमान करणे अथवा कुणालाही मारणे ४०. काम, क्रोध इत्यादींमुळे क्रिया करणे. ४१. अतिथी किंवा साधू यांचा आदर सत्कार न करणे. ४२. स्वत:लाच भक्त, धर्मात्मा, पंडित किंवा पुण्यवान् मानणे ४३. नास्तिक, व्यभिचारी, हिंसक, लोभी आणि खोटे बोलणारा माणूस यांची संगत धरणे ४४. विपत्ती आली असता ईश्वरावर दोषारोपण करणे ४५. पापासाठी धर्म करणे ४६. कुणालातरी थोडासुद्धा त्रास देऊन स्वत:ला धार्मिक समजणे ४७. स्त्री, पत्नी, पुत्र, परिवार, आश्रित, दीन व साधू यांचे पालन पोषण न करणे ४८. कोणतीही वस्तू आपल्याला

भक्त आपल्या भक्तीच्या सामर्थ्याने भगवद्-रूपच होऊन जातात; म्हणूनच त्यांच्या बाबतीत परस्परात भेद-बुद्धि होत नाही आणि त्यांच्यापैकी कोणीही स्वत:ला कोणत्याही कारणाने उच्च समजत नाही.

* * *

---

योग्य आहे असे मानून भगवंताला तसे निवेदन करणे किंवा निवेदन न करता भोगणे ४९. आपल्या इष्ट देवाच्या नावाने शपथ घेणे ५०. धर्म आणि भगवंताचे नाम यांची विक्री करून धन कमावणे ५१. आपला इष्ट देव सोडून दुसऱ्या कुणाकडून काही मिळेल अशी आशा करणे ५२. शास्त्रांच्या मर्यादा तोडणे ५३. ब्रह्मज्ञान झाले नसतानाही ब्रह्मज्ञानी माणसाप्रमाणे आचरण करणे. ५४. संप्रदाय- भेदांमुळे वैष्णवांतील काहींना उच्च-नीच समजणे ५५. देवतांचे प्रमाणे आचरण करणे ५६. भगवंताच्या अवतारांच्या लीलांमध्ये कमीजास्तपणा दाखवून त्यांची निंदा करणे ५७. चेष्टा मस्करीमध्ये कुणाला तरी 'आपणच भगवान्' असे बोलणे ५८. भगवान् हा कुणाच्या तरी तोंडाकडे पाहात असतो, असे चुकीने समजणे ५९. लोभाला वश होऊन कुणालाही भगवंताचा प्रसाद किंवा चरणोदक देणे ६०. भगवंताचे चित्र, प्रतिमा किंवा नाम यांचा अपमान करणे ६१. कोणत्याही जीवाला कुठल्या तरी प्रकाराने त्रास देणे, भय दाखविणे, अथवा कुणाचे तरी अहित करणे ६२. तर्क- वितर्कामध्ये पराजय झाल्यावर किंवा सिद्धांत स्थापन करणे शक्य न झाल्यावर आस्तिकता सोडून देणे ६३. भगवंताच्या अवतारांचे जन्म आणि कर्म हे सामान्य आहेत असे समजणे ६४.भगवंताच्या युगल-रूपात द्वैत बुद्धी करणे.

* * *

# वाद विवाद-रूपी विघ्न

वादो नावलम्ब्य: ॥७४॥

७४- (भक्ताने) वादविवाद करू नये.

भक्तीच्या साधकांसाठी हे सूत्र फारच महत्त्वाचे आहे. भक्ताला तर्कवितर्कात पडण्याची काहीही आवश्यकता नाही. असे समजावे की माझा तर प्रत्येक क्षण हा आपल्या प्रियतम अशा भगवंताच्या भजनासाठी समर्पित झाला आहे; तो आता दुसऱ्या एखाद्या कामी लावण्याचा अधिकारच मला उरलेला नाही. मग तो भक्त तर्क-वितर्क हे कोणत्या गोष्टीच्या बाबतीत करील बरे ? सृष्टी केव्हा निर्माण झाली, कशी निर्माण झाली, का निर्माण झाली, हिचे मूल तत्त्व काय आहे, अशा या सर्व गोष्टी जाणून घेण्याची जरुरीच त्या भक्ताला नाही. भगवंतालाच आपले सर्व काही मानून व जाणून, त्या भक्ताने तर भगवंतालाच आपले एकमात्र लक्ष्य बनविले आहे. जेव्हा भगवंतालाच इच्छा होईल, तेव्हा भगवंत आपले तत्त्व आपणहूनच त्या भक्ताला समजावून देईल. तो भगवंत केव्हा समजावून देईल, समजावून सांगेल की समजावून सांगणार नाही, असल्या गोष्टींची सुद्धा त्या भक्ताला कोणतीही चिंता असता कामा नये. आपल्या प्रियतम भगवंताचे चिंतन सोडून, दुसऱ्या कोणत्याही वस्तूच्या चिंतनासाठी त्याच्या मनाला जरासुद्धा अवसरच मिळता कामा नये. आणि हे सुद्धा अगदी निश्चित आहे की तर्काने तत्त्वाचे ज्ञान होतच नाही. म्हणूनच ब्रह्मसूत्रामध्ये सांगितले आहे- **तर्काप्रतिष्ठानात्**- (२/३/११), तर्काला प्रतिष्ठा नाही. कठोपनिषदामध्ये सांगितले गेले आहे- **नैषा तर्केण मतिरापनेया**- (१/२/९), बुद्धिकृत तर्काने त्या तत्त्वाची प्राप्ती होत नाही. ते

सत्य तत्त्व तर शुद्ध चित्त असणाऱ्या सात्त्विक पुरुषाच्या समोर स्वत:हूनच आविर्भूत होते. काही अंशी हेसुद्धा सत्य आहे की **वादे वादे जायते तत्त्वबोध:**; परंतु तो वाद दुसरा आहे. एखादा श्रद्धाळू शिष्य जिज्ञासेच्या वृत्तीने गुरूपुढे तर्क उपस्थित करतो आणि गुरू त्याची शंका निवारण करून, आणखीही अधिक प्रबल तर्काने त्याला सिद्धांत समजावून सांगतो. असा वाद दूषित ठरत नाही. परंतु जो वाद आग्रहपूर्वक होतो, तो वाईटच फळ उत्पन्न करतो. आणि वाद-विवादामध्ये आपल्या मताचा आग्रह तर होतच असतो. मग सिद्धातांचे लक्ष्य सुटून जाते, आणि व्यक्तिगत दोष-निरीक्षण, दोषारोपण, आणि परस्परांना शिव्यागाळी हे सर्व होऊ लागते. विवेक नष्ट होतो. क्रोध वाढत जातो, वाणी ताब्यात राहात नाही, आणि कायमचे वैर निर्माण होऊन जाते. म्हणूनच **वादे वादे वर्धते वैरवह्नि:,** वाद विवादाने वैराची आग भडकून उठते, असे म्हटले जाते. भक्तीच्या मार्गावरील पथिकाला तर वादविवाद करण्याइतकी फुरसतही मिळता कामा नये. शक्यतो त्या भक्ताने तर्कापासून दूरच राहावयास हवे. जर प्रारब्धवशात् कधी तर्कवादी लोकांचा सहवास घडला, तर त्या भक्ताने नम्र भाव धारण करून, त्या तर्कवादींची गोष्ट ऐकून घ्यावी आणि उलट काहीतरी उत्तर देऊन त्याने चर्चा वाढवू नये, **अतृणे पतितो वह्नि: स्वयमेवोपशाम्यति**- जेव्हा आगीमध्ये इंधन पडणार नाही, तेव्हा ती आग आपोआप विझून जाईल- आणि बोलणारे तर्कवादी स्वत:च थकून जातील. म्हणून भक्तांनी मौन पाळणे हे सर्वात चांगले आहे. **मौनं सर्वार्थसाधनम्** हे वाक्य लक्षात राहावयास हवे. दुसऱ्याच्या अशा गोष्टी ऐकूसुद्धा नयेत की ज्यामुळे आपल्या इष्ट गोष्टींत, मार्गावर, विश्वासात, आणि साधनात संशय निर्माण होतो; आणि अन्य कुणाचे तरी मन दुखावेल अशी कोणतीही गोष्ट भक्ताने स्वत: कुणालाही सांगू नये. समजा वेळी-अवेळी दुसऱ्याची गोष्ट ऐकणे भाग पडत असेल, तर ती ऐकावी; परंतु स्वत: मात्र तर्क

करण्याच्या इच्छेने, दुसऱ्याला दडपून टाकण्यासाठी, आपले मत स्थापन करण्यासाठी भक्ताने विवादात उतरू नये. याचा भावार्थ असा नव्हे की श्रद्धेने कुणी काही विचारू लागला, तर त्याला काही सांगावयाचे नाही अथवा प्रसंग पडल्यावर, विचारले नसतानासुद्धा, हिताची गोष्ट सांगू नये. वाद-विवादात शिरू नये, हा उद्देश. अनावश्यकपणे तर बोलावयाचेच नाही; आणि जेव्हा बोलल्याशिवाय काम भागत नाही असे दिसेल तेव्हा बोलणे आवश्यक आहे, असे समजून कामापुरते बोलावे. गोष्टी तिखट मीठ लावून सांगू नयेत, विवाद करण्याच्या वृत्तीने सांगू नयेत, कुणालाही विरोध करू नये, कुणाची चेष्टा करू नये, कुणाचा दोष दाखवू नये, कुणाचे मन दुखवू नये. आपली किंवा आपल्या मनाची बढाई मारू नये, कुणाची निंदा करू नये, कडू बोलू नये, बोलण्यामध्ये आशा किंवा कामना यांचा भाव ठेवू नये, शब्दाने कुणाला धोका देऊ नये, आणि कुणाच्या विश्वासाबद्दल शंका उत्पन्न करू नये. जे काही शब्द बोलायचे असतील, ते सत्य, गोड, प्रिय, उद्वेग निर्माण न करणारे आणि हितकारक असेच शब्द उच्चारावेत. उरलेला वेळ भगवंताच्या नामस्मरणामध्ये लावावा. अनावश्यक असा एक शब्दसुद्धा बोलण्यात फार हानी आहे असे समजावे; कारण तितका वेळ व्यर्थ गेला असे होते, तितका वेळ जिभेने करावयाचा नाम-जप झाला नाही, आणि अनावश्यक शब्दांचा वातावरणामध्ये जो परिणाम होईल तो तर वेगळाच. असा निश्चय करावा की तर्क आणि वाद-विवाद यांनी कधीही भगवंताचे प्रेम, ज्ञान अथवा भगवंताची प्राप्ती होत नाही. तर्काने तर अहंकार, द्वेष, क्रोध, हिंसा आणि वैर यांचीच जमात एकत्र होते. वादविवादापासून नेहमी बाजूला राहावे.

बाहुल्यावकाशादनियतत्वाच्च ॥७५॥

७५-कारण (वादविवादामध्ये) बाहुल्याची शक्यता आहे आणि तो अनियत आहे.

वरील गोष्टींचे कारण दाखवीत सूत्रकार नारदजी सांगतात की वाद-विवादात उत्तरे आणि प्रत्युत्तरे होतात, आणि ती वाढतच जातात. वाद विवादातील दोन्ही बाजूंकडून आपापल्या मताचे समर्थन करताना, शब्दांचा वर्षाव होऊ लागतो. जी गोष्ट केवळ भगवंताच्या कृपेनेच जाणली जाऊ शकते, ती तर तर्काने प्राप्तच होऊ शकत नाही; म्हणून तर्क-वितर्कामुळे काही चांगले फळ मिळतच नाही. जर वाद-विवादात एक पक्ष बोलला बोलता थकून गेला किंवा त्याला योग्य वेळी एखादा तर्क आठवला नाही, तर दुसऱ्या कोणत्यातरी पक्षाचा जय होतो, तरी त्या विजयी पक्षाचे मत हे सिद्धांत मानले जात नाही; कारण तो सिद्धांतच नसतो. म्हणून विवादांत वेळ नष्ट न करता, भक्ताने सर्व प्रकारे आपल्या प्रियतम भगवंतावर अवलंबून राहात, निरंतर, निष्कपट, आणि निष्काम अशा वृत्तीने अत्यंत श्रद्धापूर्वक भगवंताचे भजन करावयास हवे. भगवंताच्या प्रेमाची प्राप्ती ही तर्काने होत नाही तर ती भक्तीनेच होते.

* * *

# भक्तीचे मुख्य सहायक

भक्तिशास्त्राणि मननीयानि तदुद्‌बोधककर्माण्यपि करणीयानि ॥७६॥

७६- (त्या प्रेमभक्तीच्या प्राप्तीसाठी) भक्तिशास्त्राचे मनन करीत राहावयास हवे, आणि अशी कर्मेसुद्धा करावयास हवीत की ज्यांच्यामुळे भक्ती वाढेल.

भक्तीची इच्छा करणाऱ्यांनी कोणताही ग्रंथ पाहू नये (म्हणजे त्यांना ग्रंथ पाहण्याची जरुरी नाही) आणि काही कर्मे करू नयेत (म्हणजे कर्मे करण्याची आवश्यकता नाही), असे मात्र नव्हे. तर्क-वितर्कांचा त्याग करून, ज्या ग्रंथामध्ये भगवंताच्या भक्तीचे निरूपण असेल, भक्तीचे माहात्म्य सांगितले असेल, भक्तीची साधने सांगितली गेली असतील, भगवंताला प्रिय असणाऱ्या भक्तांच्या पुण्य-पावन-चरित्रांच्या कथा असतील, आणि भक्तीला वश होऊन राहाणाऱ्या भगवंताचे सामर्थ्य, रहस्य आणि गुण यांचे वर्णन असेल, असे ग्रंथ त्यांनी नक्कीच वाचले पाहिजेत. अशा प्रकारच्या भक्तिशास्त्रांच्या अध्ययनाने, अशा संतांच्या वाणींचे श्रवणाने आणि पठणाने भगवंताच्या बद्दल प्रेमा भक्तीचा उदय होतो. एक मात्र खरे की भक्तीची इच्छा करणाऱ्या पुरुषांनी कधीही असली पुस्तके वाचू नयेत आणि ऐकू नयेत की ज्यांमध्ये श्रीभगवंत आणि भक्ती यांचे खंडन असेल, त्यांचे महत्त्व कमी करून सांगितले गेले असेल आणि भक्तांची निंदा असेल अथवा ज्या पुस्तकामध्ये लौकिक विषयांचे महत्त्वच वर्णिले असेल. तसेच भक्तीची इच्छा असणाऱ्यांना असली पुस्तके लाभदायक होत नाहीत की ज्यांमध्ये भगवंत, भक्ती आणि भक्त यांचे महत्त्व सांगितलेले नसेल.

राग-द्वेष, काम-क्रोध आणि वैर-विरोध उत्पन्न करणाऱ्या साहित्याला स्पर्शसुद्धा करू नये. म्हणूनच असे सांगितले गेले आहे की-

**यस्मिन् शास्त्रे पुराणे वा हरिभक्तिर्न दृश्यते ।**
**श्रोतव्यं नैव तच्छास्त्रं यदि ब्रह्मा स्वयं वदेत् ॥**

"ज्या शास्त्रांत किंवा पुराणात भगवंताची भक्ती दाखविली नसेल, ते शास्त्र किंवा पुराण ब्रह्मदेवाने सांगितलेले असेल तरी सुद्धा ऐकू नये."

त्या बरोबरच कर्मेसुद्धा असली करावयास हवीत की ज्यांच्यामुळे भक्तीची जागृती आणि वृद्धी होईल. भक्तीची इच्छा करणाऱ्या पुरुषाने निषिद्ध पाप कर्मांचा तर संपूर्णपणेच त्याग करून टाकावयास हवा. जो कुणी विषयांच्या आसक्तीला वश होऊन, पाप कर्मे सोडण्याची इच्छा करीत नाही आणि स्वतःला मात्र भक्त म्हणवून घेण्याची इच्छा करतो, तो स्वतःच भ्रमात आहे किंवा जाणून बुजून भ्रम पसरविण्याची इच्छा त्याला आहे. भक्तीच्या प्राप्तीसाठी सहायक असणाऱ्या कर्मांमध्ये खाली सांगितलेली कर्मे प्रधान आहेत:-

१. आपला वर्ण आणि आश्रम यांच्या कर्तव्यांचे शक्य तितके पूर्ण पालन करणे. उदाहरणार्थ - ब्रह्मचारी, वानप्रस्थ आणि संन्यासी यांच्यासाठी त्याग-पूर्ण आचरण आवश्यक आहे, तर गृहस्थांसाठी भगवंताच्या प्रीत्यर्थ माता-पिता, स्त्री-पुत्र, परिवार इत्यादी आश्रित माणसांचे प्रेमपूर्वक व सत्कारपूर्वक पालन करणे, न्यायपूर्वक आणि सत्यपूर्वक उदर भरण्याचे कार्य करणे, तसेच शास्त्रोक्त यज्ञ, दान, तप इत्यादी करीत राहाणे.

२. सदाचाराचे पालन.

३. सत्संग करणे आणि भगवंताच्या गुणानुवादाचे श्रवण, चिंतन, आणि कीर्तन करणे.

४. भगवंताच्या नामाचा जप, भगवंताचे स्मरण आणि कीर्तन.

५. भगवंताचे पूजन, भगवंताची प्रार्थना, आणि भगवंताला नमस्कार.

६. संत- भक्तांची सेवा आणि श्रद्धापूर्वक त्यांच्या आज्ञेचे पालन करणे.

७. तीर्थ क्षेत्रास जाणे.

८. दीन प्राण्यांवर दया करणे आणि शक्य असेल त्याप्रमाणे तन, मन, आणि धन यांचे द्वारा त्यांची सेवा करणे.

९. सर्व कर्मे भगवंताला अर्पण करणे.

१०. सर्व प्राण्यांमध्ये भगवंत आहे असे पाहण्याचा अभ्यास करणे.

श्रीभगवान् स्वत: सांगतात-

श्रद्धामृतकथायां मे शश्वन्मदनुकीर्तनम् ।
परिनिष्ठा च पूजायां स्तुतिभि: स्तवनं मम.।।
आदर: परिचर्यायां सर्वाङ्गैरभिवन्दनम् ।
मद्भक्तपूजाभ्यधिका सर्वभूतेषु मन्मति: ।।
मदर्थेष्वङ्गचेष्टा च वचसा मद्गुणेरणम् ।
मय्यर्पणं च मनस: सर्वकामविवर्जनम् ।।
मदर्थेऽर्थपरित्यागो भोगस्य च सुखस्य च ।
इष्टं दत्तं हुतं जप्तं मदर्थं यद्व्रतं तप: ।।
एवं धर्मैर्मनुष्याणामुद्धवात्मनिवेदिनाम् ।
मयि सञ्जायते भक्ति: कोऽन्योऽर्थोऽस्यावशिष्यते ।।

(श्रीमद्भागवत ११/१९/२०/२४)

"अमृताप्रमाणे असणाऱ्या माझ्या कल्याणमयी कथेवर श्रद्धा, निरंतर माझे नाम आणि गुण यांचे कीर्तन, माझ्या पूजेमध्ये पूर्ण निष्ठा, स्तोत्रांचे द्वारा माझी स्तुती, माझी सेवा करण्यात निरंतर आदर, सर्व अंगांनी मला नमस्कार, माझ्या भक्तांचे विशेष रूपाने पूजन, सर्व प्राण्यांमध्ये मला पाहाणे, माझ्यासाठी सारी लौकिक कर्मे करणे, गप्पागोष्टीत सुद्धा फक्त माझ्याच गुणांची चर्चा करणे,

माझ्या ठिकाणीच मन अर्पण करून टाकणे, सर्व कामना सोडून देणे, माझ्यासाठी धन, भोग आणि सुखे यांचा त्याग करणे आणि माझ्यासाठीच यज्ञ, दान, होम, जप, तप, आणि व्रते इत्यादी शास्त्रोक्त कर्मे करणे. हे उद्धवा, प्रथम आत्मनिवेदन करून, या धर्मांचे द्वारा माझी उपासना केल्यामुळे मनुष्यांना माझी प्रेमरूप भक्ती प्राप्त होते. मग त्यांना काही प्राप्त करून घ्यायचे, असे उरतच नाही.

प्रबुद्ध नावाच्या योगीश्वराने निमी नावाच्या महाराजाला प्रेमरूप भक्तीच्या प्राप्तीची साधने अशा प्रकारे सांगितली आहेत-

तस्माद्गुरुं प्रपद्येत जिज्ञासुः श्रेय उत्तमम् ।
शाब्दे परे च निष्णातं ब्रह्मण्युपशमाश्रयम् ॥
तत्र भागवतान्धर्माञ्छिक्षेद् गुर्वात्मदैवतः ।
अमाययानुवृत्त्या यैस्तुष्येदात्मात्मदो हरिः ॥
सर्वतो मनसोऽसङ्गमादौ सङ्गं च साधुषु ।
दयां मैत्रीं प्रश्रयं च भूतेष्वद्धा यथोचितम् ॥
शौचं तपस्तितिक्षां च मौनं स्वाध्यायमार्जवम् ।
ब्रह्मचर्यमहिंसां च समत्वं द्वन्द्वसंज्ञयोः ॥
सर्वत्रात्मेश्वरान्वीक्षां कैवल्यमनिकेतताम् ।
विविक्तचीरवसनं सन्तोषं येन केनचित् ॥
श्रद्धां भागवते शास्त्रेऽनिन्दामन्यत्र चापि हि ।
मनोवाक्कर्मदण्डं च सत्यं शमदमावपि ॥
श्रवणं कीर्तनं ध्यानं हरेरद्भुतकर्मणः ।
जन्मकर्मगुणानां च तदर्थेऽखिलचेष्टितम् ॥
इष्टं दत्तं तपो जप्तं वृत्तं यच्चात्मनः प्रियम् ।
दारान्सुतान्गृहान्प्राणान्यत्परस्मै निवेदनम् ॥

एवं कृष्णात्मनाथेषु मनुष्येषु च सौहृदम् ।
परिचर्यां चोभयत्र महत्सु नृषु साधुषु ॥
परस्परानुकथनं पावनं भगवद्यशः ।
मिथो रतिर्मिथस्तुष्टिर्निवृत्तिर्मिथ आत्मनः ॥
स्मरन्तः स्मारयन्तश्च मिथोऽघौघहरं हरिम् ।
भक्त्या सञ्जातया भक्त्या बिभ्रत्युत्पुलकां तनुम् ॥

(श्रीमद्भागवत ११/३/२१-३१)

"ज्याला आपले कल्याणच काय आहे हे जाणण्याची इच्छा असेल, त्याने वेदांचा ज्ञाता आणि परब्रह्मामध्ये स्थित, शांतस्वरूप अशा गुरूला शरण जावयास हवे. आणि गुरूलाच आत्मा तसेच इष्ट देव मानून, निष्कपट भावाने त्या गुरूंची सेवा करून, भागवत- धर्म शिकावयास हवा. त्यांच्यामुळे स्वतःला देऊन टाकणारा असा परमात्मा हरी प्रसन्न होऊन जातो. सर्व विषय-भोगांच्या बाबतीत मनाचे वैराग्य, साधु-महात्म्यांची संगती, सर्व प्राण्यांच्या बाबतीत शक्य असेल त्याप्रमाणे (दीनांच्या बाबतीत) दया, आपल्याशी समान अवस्थेत असणाऱ्याबरोबर मैत्री, आणि आपल्यापेक्षा श्रेष्ठ असणाऱ्यांचे संदर्भात विनयाची वागणूक, तन-मन-धनाने पवित्र राहाणे, त्रास सहन करूनसुद्धा आपल्या वर्णाश्रम-धर्माचे पालनरूपी तप करणे, शीत-उष्ण इत्यादी सहन करणे, व्यर्थ गप्पागोष्टींचा त्याग, किंवा भगवंताचे मनन, स्वाध्याय, सरळपणा, ब्रह्मचर्य, अहिंसा, सुख-दुःख इत्यादी द्वंद्वांमध्ये मनाचा समतोलपणा, सर्वत्र सर्व जीवांचे ठिकाणी स्वतःला तसेच ईश्वराला पाहाणे, एकांत स्थानी राहाणे, घर इत्यादी भगवंताचे आहेत असे समजणे, शुद्ध साधे वस्त्र नेसणे, जे काही मिळेल त्यात संतोष मानणे, भगवंताचे गुण गाणाऱ्या शास्त्रांवर श्रद्धा ठेवणे, दुसऱ्या शास्त्रांची निंदा न करणे, मन-वाचा-कर्म यांचा संयम ठेवणे, सत्य भाषण, मन व इंद्रिये यांना स्वतःच्या ताब्यात ठेवणे, अद्‌भुत लीला करणाऱ्या

श्रीहरीचा जन्म, कर्म आणि गुण यांचे श्रवण, कीर्तन व ध्यान करणे, भगवंतासाठीच शास्त्र विहित कर्मे करणे, यज्ञ-दान-तप-जप इत्यादी सदाचार, आपल्याला प्रिय वाटणारे सर्व पदार्थ तसेच स्त्री-पुत्र-घर तसेच प्राणसुद्धा परमात्म्याला अर्पण करणे, आणि अशा प्रकारे भगवंत हाच ज्यांचा आत्मा आणि स्वामी आहे अशा भक्तांशी मैत्री करणे, जड-चेतन जीवांची, माणसांची आणि त्या माणसांमध्ये सुद्धा जे चांगला स्वभाव असणारे महापुरुष आहेत त्यांची विशेष रूपाने सेवा करणे, एकमेकांना भगवंताच्या पवित्र यशाचे कथन करणे, आणि या भगवंताच्या गुणगायनाद्वाराच परस्परावर प्रीती करणे, तुष्टी राखणे, आणि दुखांची निवृत्ती करणे- ही सर्व साधने सद्‌गुरूच्या समीप राहून शिकावयास हवीत. अशा प्रकारे वर्तणूक करणारे, आणि पाप-समूहाचा नाश करणाऱ्या श्रीहरीचे स्वत: स्मरण करणारे आणि दुसऱ्याकडून स्मरण करवून घेणारे असे जे भक्त, त्यांच्या हृदयांत या साधनस्वरूप भक्तीच्या द्वारा प्रेम - लक्षणा भक्ती उत्पन्न होते, आणि त्यांचे शरीर पुलकित होऊन जाते; ते पुन: प्रेममग्न होऊन जातात."

अशाप्रकारे श्रीमद्‌भागवत, श्रीमद्‌भगवद्‌गीता, श्रीरामायण इत्यादी भक्तिप्रधान ग्रंथांच्या श्रवण-पठणाने तसेच उपर्युक्त प्रकाराने सत्संग, नामजप, नाम-कीर्तन इत्यादी भक्ती वाढविणारी सत् कार्ये भगवंताच्या प्रीत्यर्थ करण्यामुळे भक्तीची वाढ होते. भक्ताने सदा चांगला स्वभाव आणि सत्कार्ये यांतच रत व्हावयास हवे, तेव्हाच त्याची भक्ती वृद्धिंगत होते.

आपल्याला प्रिय असणाऱ्या भक्तांची लक्षणे सांगताना भगवान् श्रीकृष्णाने श्रीमद् भगवद्‌गीतेमध्ये म्हटले आहे-

**अद्वेष्टा सर्वभूतानां मैत्रः करुण एव च ।**
**निर्ममो निरहङ्कारः समदुःखसुखः क्षमी ॥**
**सन्तुष्टः सततं योगी यतात्मा दृढनिश्चयः ।**
**मय्यर्पितमनोबुद्धिर्यो मद्भक्तः स मे प्रियः ॥**

यस्मान्नोद्विजते लोको लोकान्नोद्विजते च यः ॥
हर्षामर्षभयोद्वेगैर्मुक्तो यः स च मे प्रियः ।
अनपेक्षः शुचिर्दक्ष उदासीनो गतव्यथः ।
सर्वारम्भपरित्यागी भक्तिमान्यः स मे प्रियः ॥
यो न हृष्यति न द्वेष्टि न शोचति न काङ्क्षति ।
शुभाशुभपरित्यागी भक्तिमान्यः स मे प्रियः ॥
समः शत्रौ च मित्रे च तथा मानापमानयोः ।
शीतोष्णसुखदुःखेषु समः सङ्गविवर्जितः ॥
तुल्यनिन्दास्तुतिर्मौनी सन्तुष्टो येन केनचित् ।
अनिकेतः स्थिरमतिर्भक्तिमान्मे प्रियो नरः ॥
ये तु धर्म्यामृतमिदं यथोक्तं पर्युपासते ।
श्रद्दधाना मत्परमा भक्तास्तेऽतीव मे प्रियाः ॥

(१२/१३-२०)

"जो कोणत्याही जीवाचा द्वेष करीत नाही, जो सर्वांचा मित्र आहे, जो दयाळू आहे, जो ममत्व आणि अहंकार यांनी रहित आहे, जो सुख व दुःख यांची प्राप्ती झाली असताना सम-भाव राखणारा, आणि क्षमाशील आहे, ज्याचे चित्त निरंतर माझ्या ठिकाणी लागलेले आहे, जो सदा संतुष्ट आहे, ज्याने मन व इंद्रियांना जिंकले आहे, जो माझ्या बाबतीत दृढ निश्चयी आहे, आणि ज्याने आपले मन व बुद्धी यांना माझ्यावर सोपविले आहे, तो माझा भक्त मला प्रिय आहे.

ज्याच्यामुळे कोणत्याही जीवाला उद्वेग येत नाही आणि जो स्वतः कुणामुळे उद्विग्न होत नाही, जो हर्ष, अमर्ष (क्रोध), भय आणि उद्वेग यांतून सुटलेला आहे, तो भक्त मला प्रिय आहे.

ज्याला कोणत्याही वस्तूची अपेक्षा नाही, जो शुद्ध, चतुर व उदासीन आहे, जो दुःखातून सुटलेला आहे, आणि "मी कर्ता आहे" या अभिमानाने

जो कोणतेही कार्य सुरू करीत नाही (म्हणजे सर्व काही भगवंतानेच केले आहे असे मानतो), तो माझा भक्त मला प्रिय आहे.

जो आनंदित होत नाही, द्वेष करीत नाही, शोक करीत नाही, आणि कशाचीही इच्छाच करीत नाही, जो शुभ आणि अशुभ असे कोणतेही कर्म हे आसक्ती व फळाची इच्छा धरून करीत नाही, तो भक्तियुक्त पुरुष मला प्रिय आहे.

जो शत्रू व मित्र, मान आणि अपमान व शीत आणि उष्ण तसेच सुख व दु:ख इत्यादी द्वंद्वामध्ये समान वृत्ती बाळगतो, मला सोडून अन्य कोणत्याही पदार्थात ज्याची आसक्ती नाही, जो निंदा व स्तुती यांना समान समजतो, जो चित्ताने आणि वाणीने केवळ माझेच मनन व कथन करतो आणि जो कोणत्याही इतर प्रकाराने जीवननिर्वाह झाला तरी त्यांतच संतोष मानतो, ज्याचे स्वत:चे असे घर नाही म्हणजे घरामध्ये ज्याची ममत्व बुद्धी नाही किंवा जो घरदार हे सर्व भगवंताचेच आहे असे मानून चुकला आहे, तो स्थिरबुद्धी असणारा भक्त पुरुष मला प्रिय आहे.

जे श्रद्धायुक्त पुरुष मलाच सर्वस्व मानून, उपर्युक्त धर्ममय अमृताचे चांगल्याप्रकारे सेवन करतात, ते भक्त तर मला अत्यंतच प्रिय असतात."

श्रीभगवंतांनी सांगितलेली ही लक्षणे सिद्ध अशा भक्तांमध्ये तर स्वाभाविकपणेच असतात, आणि या लक्षणांना आपला आदर्श मानून ती आचरणात आणण्याचा प्रयत्न भक्तीच्या साधकांनी करावयास हवा.

अशा प्रकारे भक्तिशास्त्राचे अध्ययन व मनन तसेच भक्ती वाढविणाऱ्या साधनांमध्ये गढून राहिल्याने, भक्ताला योगिजनास दुर्लभ अशी प्रेमरूप भक्ती प्राप्त होते.

**सुखदु:खेच्छालाभादित्यक्ते काले प्रतीक्ष्यमाणे क्षणार्द्धमपि व्यर्थं न नेयम् ।।७७।।**

**७७- सुख, दु:ख, इच्छा, लाभ इत्यादींचा पूर्ण त्याग होईल**

अशा काळाची वाट बघत अर्धा क्षणसुद्धा भजनाविना व्यर्थ घालव नये.

भक्तीची सिद्धी झाल्यावर सुख-दुःख, लाभ-हानी इत्यादी सारी द्वंद्वे आपणहूनच संपून जातात, यात काही शंका नाही. आणि मग कोणत्याही पदार्थाची इच्छा राहात नाही, परंतु अशा शुभ समयाची केवळ वाटच पाहावी परंतु कोणतेही साधन केले गेले नाही तर वर्तमानकालीन हीन दशेचा विनाश होऊन अचानक तसली शुभ दशा आपोआप प्राप्त होईलच कशी ? तसेच माणसाच्या जीवनाच्या एका क्षणाचासुद्धा भरंवसा नाही, कोणत्याही क्षणी प्रलय होऊन जाईल आणि केव्हा मृत्यू येईल हेही ठाऊक नाही; म्हणून "असुक स्थिती प्राप्त झाल्यावर मी भगवंताचे भजन करीन," अशी मनाची धारणा सोडून द्यावयास हवी, आणि आत्ता जो माणूस ज्या अवस्थेमध्ये आहे, त्याच अवस्थेत त्याने भगवंताच्या कृपेचा आश्रय घेऊन, साधना सुरू करावयास हवी. अर्ध्या क्षणासाठीसुद्धा विलंब करता कामा नये. कबीरजी सांगतात-

**काल करै सो आज कर, आज करै सो अब ।**
**पलमें परलै होयगी, फेरि करैगा कब ॥**

"उद्या करायचे ते आज कर. आज करायचे ते आत्ता कर, कारण एक क्षणात प्रलय झाला तर मग केव्हा करशील ?"

डोळ्यांची पापणी हलविता हलविता तू मृत्यूचा घास होऊन जाशील, मग केव्हा भजन करशील ? असे समजून नकोस की "आत्ता वय लहान आहे, खेळणे-खाणे आणि विषय भोगणे यांची ही वेळ आहे; मोठे झाल्यावर भजन करू." तुम्ही मोठे होण्यापूर्वीच मरून जाणार नाही, हे कोण सांगू शकेल ? मृत्यूची नग्न समशेर तर सदाच मस्तकावर लोंबकळत आहे. या बाबतीत एक दृष्टांत असा आहे-: एक भुंगा होता. तो कमळाच्या आत बसून कमळाचा रस पीत होता आणि त्याच्या सुगंधाने मत्त होऊन राहिला होता. इतक्यात संध्याकाळ झाली. सूर्य अदृश्य होताच कमल मिटले गेले; आणि

मोठमोठ्या शाल आणि शिसवी वृक्षांना भोक पाडण्याची ताकद असणारा भ्रमर विषयाच्या आसक्तीच्या कारणाने त्या कमळाचे आतच राहून गेला. मग तो विचार करू लागला-

**रात्रिर्गमिष्यति भविष्यति सुप्रभातं**
**भास्वानुदेष्यति हसिष्यति पङ्कजश्रीः ।**
**इत्थं विचन्तयति कोशगते द्विरेफे**
**हा हन्त हन्त नलिनीं गज उज्जहार ॥**

" रात्र संपून जाईल, प्रात:काळ होईल. सूर्य उदयाला येईल आणि जेव्हा त्याचे किरण या कमलावर पडतील, तेव्हाच हे कमल पुन: उमलेल. आणि मग मी या कमलातून बाहेर पडेन. तोपर्यंत इतक्या आनंदाने मकरंद रसाचा आस्वाद मी करीत राहीन." तो भुंगा असा विचार करीत राहिला होता. तेवढ्यात एका मस्तवाल हत्तीने तेथे येऊन कमळ उपटून आपल्या मुखात घातले, आणि कमळाबरोबरच भुंगासुद्धा हत्तीच्या दातांखाली चिरडला गेला. त्याच्या मनातील मनोरथ मनातच राहून गेले. म्हणून असल्या विचारांना तर सोडूनच द्यावयास हवे की अमुक काम झाल्यावर आम्ही भजन करू. खरे सांगायचे झाल्यास प्रथम तर मनात येतील त्या कामनांची पूर्ती होतच नाही; आणि जरी झाली तरी एका कामनेची पूर्तता ही दुसऱ्या अनेक नव्या नव्या अभावांना बरोबर घेऊनच येते; मग त्यांच्या पूर्तीसाठी प्रयत्नांत गढून जावे लागते. अपूर्ण आणि अभावमय अशा क्षणभंगुर सांसारिक पदार्थांनी कधीही पूर्ण तृप्ती होऊच शकत नाही. कितीही पदार्थांची प्राप्ती होवो, उरेल तो अभावच, आणि अभावाच्या दु:खाने जळत असतानाच, विषयांची इच्छा करणाऱ्या पुरुषाला मरून जावे लागते. म्हणून विषयांची पूर्ण प्राप्ती आणि विषयांच्या भोगांमुळे पूर्ण तृप्ती होईल, अशा काळाची आशा सोडून, प्रथमपासूनच भजनामध्ये चिकटून राहावयास हवे.

याशिवाय आणखी एक गोष्ट विचार करण्याजोगी आहे की आज

चांगल्या संगामुळे आपल्या मनात भगवंत किंवा भगवंताची भक्ती प्राप्त क
घेण्याची इच्छा निर्माण झाली आहे, आणि एक क्षणभर का होईना आप
आपल्या जीवाचे ध्येय भगवंताची प्राप्ती असे मानले आहे. परंतु आप
विचार करतो की अमुक स्थिती आपल्याला प्राप्त झाल्यावर, या ध्येयाच
प्राप्तीसाठी साधन केले जाईल. आपला हा विचार धोक्याचा नाही काय
प्रथम तर हे निश्चित नाही की अमुक स्थिती आपणास प्राप्त होईल, आणि म
हे कोण सांगू शकेल की तोपर्यंत आपले ध्येय बदलून जाणार नाही. परंतु ज
आज आपण आपले ध्येय जे भगवंताची प्राप्ती, तिच्या प्राप्तीच्या साधना
लागलो, तर साधन मार्गामध्ये जसजसे आपण पुढे जाऊ तसतसे आपणाल
त्या साधनाचे प्रमे वाटू लागेल, लाभही प्रतीतीला येईल आणि अभ्याससुद्ध
दृढ होऊन जाईल. याच्या उलट जर आपण केवळ ध्येय मात्र मनात बाळगून
गप्प बसून राहू, तर दुसऱ्याच क्षणी, दुसरा संग मिळाल्यावर, आपले हे ध्ये
बदलून जाईल. म्हणून काळाची प्रतीक्षा न करता, आत्तापासूनच भजन-साध
सुरू करावयास हवे. सत्संगामुळे प्राप्त झालेल्या आपल्या सदिच्छेची चांगल
संधी गमावू नये. तसेच आपले स्वास्थ्यसुद्धा चांगले राहील हेसुद्धा निश्चित
नाही. जोपर्यंत स्वास्थ्य ठीक आहे तोपर्यंत साधन-भजन होते. स्वास्थ्य बिघडून
गेल्यावर, इंद्रिये अशक्त झाल्यावर, आणि म्हातारपण येऊन ठेपल्यावर, जर
पूर्वी पुरा अभ्यास केला गेला नसेल, तर भजनात मनच लागणार नाही. म्हणूनच
महाराज भर्तृहरीने सांगितले आहे-

> यावत्स्वस्थमिदं कलेवरगृहं यावच्च दूरे जरा
> यावच्चेन्द्रियशक्तिरप्रतिहता यावत्क्षयो नायुषः ।
> आत्मश्रेयसि तावदेव विदुषा कार्यः प्रयत्नो महान्
> प्रोद्दीप्ते भवने च कूपखननं प्रत्युद्यमः कीदृशः ।।

(वैराग्य शतक)

"जोपर्यंत शरीर स्वस्थ आहे, म्हातारपण आलेले नाही, इंद्रियांची

शक्तीही पूर्णपणे उरलेली आहे, आयुष्याचे दिवस शिल्लक आहेत, तोपर्यंतच बुद्धिमान माणसाने आपल्या कल्याणासाठी चांगल्या प्रकारे प्रयत्न करावयास हवेत. घराला आग लागल्यावर विहिर खणण्यामुळे काय होणार ?"

म्हणूनच भक्तगण भगवंताला शरण जाऊन धावा करतात-

**आयुर्नश्यति पश्यतां प्रतिदिनं याति क्षयं यौवनं**
**प्रत्यायान्ति गता: पुनर्न दिवसा कालो जगद्भक्षक: ।**
**लक्ष्मीस्तोयतरङ्गभङ्गचपला विद्युच्चलं जीवितं**
**तस्मान्मां शरणागतं शरणद ! त्वं रक्ष रक्षाधुना ।।**

" आयुष्य दररोज पाहता पहाता नष्ट होत आहे. तारुण्य निघून जात आहे. गेलेले दिवस पुन: परत येत नाहीत. काळ हा जगाला खात राहिला आहे. पाण्याच्या लाटेप्रमाणे लक्ष्मी चंचल आहे. आणि जीवन हे तर विजेच्या प्रकाशाप्रमाणे अस्थिर आहे. म्हणून रक्षण करणाऱ्या हे प्रभो, शरणागत अशा माझे तू आता रक्षण कर."

**कृष्ण त्वदीयपदपङ्कजपञ्जरान्ते**
**अद्यैव मे विशतु मानसराजहंस: ।**
**प्राणप्रयाणसमये कफवातपित्तै:**
**कण्ठावरोधनविधौ स्मरणं कुतस्ते ।।**

"हे कृष्णा, तुमच्या पदकमलरूपी पिंजऱ्यात माझा हा मनरूपी राजहंस आजच प्रवेश करू दे. प्राण जाण्याचे वेळी जेव्हा कफ, वात, आणि पित्त वाढले असता, घसा दाटून जाईल. त्यावेळी तुमचे स्मरण कसे बरे होईल?"

म्हणून थोडासासुद्धा काळ भगवंताच्या भजनाविना घालवू नये. जो काळ भगवंताच्या भजनात जातो तोच सार्थकी लागतो, उरलेला सर्व काळ फुकट जातो. म्हणून काळाचे महत्त्व ओळखून, एक एक श्वास फार सावधपणाने, कंजूष माणसाच्या मर्यादित पैशाप्रमाणे, केवळ भगवंताच्या चिंतनामध्ये लावणे हे उचित होय. भजनरहित काळ हासुद्धा खरे म्हणजे

आपणांसाठी भयंकर काळ आहे. तीच सर्वांत मोठी विपत्ती आहे.

**कह हनुमंत बिपति प्रभु सोई । जब तव सुमिरन भजन न होई ॥**

हनुमंत सांगतो- "हे प्रभु, जेव्हा तुझे स्मरण, भजन होत नाही, तेव्हा ती विपत्ती होय."

**सा हानिस्तन्महच्छिद्रं स मोहः स च विभ्रमः ।**
**यन्मुहूर्तं क्षणं वापि वासुदेवं न कीर्तयेत् ॥**

"जो काळ किंवा एक क्षणसुद्धा श्रीभगवंताच्या कीर्तनाविना निघून गेला, त्यालाच सर्वांत मोठे नुकसान, अज्ञान आणि मोह असे समजले पाहिजे."

भगवंताच्या भजनासाठी कोणत्याही सुयोगाच्या काळाची प्रतीक्षा करावयास नको. नाहीतर आपले अमूल्य मनुष्य-जीवनच फुकटच नष्ट होऊन जाईल. भगवंताचे भजन हेच मनुष्य-जीवनाचे सर्वोत्तम आणि आदरणीय कर्म आहे. भजन करता करता भगवंताच्या कृपेने एक दिवस आपल्या साऱ्या सुख-दु:ख इत्यादी द्वंद्वांचा आपोआपच नाश होऊन जाईल, आणि भगवंतावरील प्रेमाच्या निर्मळ ज्योतीने आपले हृदय झगमगून उठेल; सर्व दिशा आणि सारे ब्रह्मांड निर्मल, शीतल आणि स्निग्ध ज्योतीने भरून जाईल, आणि त्यावेळी आपल्या आनंदाला कोणतीच सीमा राहाणार नाही.

खरे म्हणजे भजनाने काय परिणाम होईल याचा विचार करणे हेसुद्धा भक्ताचे काम नव्हे. त्याचे काम फक्त प्रेमपूर्वक भजन करणे हेच आहे. प्रेमासाठीच प्रेम करावयाचे आहे. भजनासाठीच भजन करावयाचे आहे. भजन करणे हा त्या भक्ताचा स्वभावच बनून जातो; भजनाशिवाय त्याला राहावतच नाही. तो भक्त सर्व काही सहन करू शकतो, परंतु भजनाचा वियोग मात्र त्याला असह्य होतो. श्रीमद्भागवतात सांगितले आहे-

**त्रिभुवनविभवहेतवेऽप्यकुण्ठ-**
**स्मृतिरजितात्मसुरादिभिर्विमृग्यात् ।**
**न चलति भगवत्पदारविन्दा-**

**लल्लवनिमिषार्धमपि यः स वैष्णवाग्र्यः ॥**

(११/२/५३)

" जर भगवंताच्या भक्ताला असे सांगितले की तू अर्धा क्षण किंवा अर्ध निमेषसुद्धा भगवंताच्या चरणांचे चिंतन सोडून दे, आणि त्रैलोक्याचे संपूर्ण वैभव घेऊन टाक, तर तो भक्त ही गोष्ट स्वीकारणार नाही. त्याचा चित्तरूपी भ्रमर निश्चल रूपाने भगवंताच्या त्या सुंदर चरणकमलाचे ठायीच लागून राहातो. ते चरण निरंतर ध्यान करून शोधले तरीसुद्धा देवतांना ते प्राप्त होत नाहीत. अशा प्रकारच्या त्या भक्ताला कशाचीसुद्धा इच्छा असत नाही." तो वारंवार कातर कंठाने हेच सांगतो की " मला मोक्ष नको, मला ज्ञान नको, मला वैभवाची इच्छा नाही, मला ऋद्धि-सिद्धी नकोत, आणि दूरगामी कीर्तीसुद्धा मला नको आहे. कोणत्याही योनीत जन्मास जाणे भाग पडू दे, काहीही होऊ दे, त्याची मला चिंता नाही. फक्त हे माझ्या प्रियतमा, तुमच्या चरणांचे ठिकाणी माझे प्रेम, कोणताही हेतू नसणारे (निर्हेतुक) प्रेम, वेडे प्रेम, आंधळे प्रेम, प्रेममय प्रेम, प्रियतममय प्रेम हेच दिवसेंदिवस वाढतच जाऊ दे.

**जनम जनम रति राम पद यह बरदानु न आन ॥**

"जन्मो जन्मी रामचरणांच्या ठिकाणी आवड हेच मला वरदान असू दे, दुसरे काही नको."

श्रीशंकराचार्य जगज्जननीस्वरूप भगवंताची प्रार्थना करतात-

**न मोक्षस्याकाङ्क्षा भवविभववाञ्छापि च न मे**
**न विज्ञानापेक्षा शशिमुखि सुखेच्छापि न पुनः ।**
**अतस्त्वां संयाचे जननि जननं यातु मम वै**
**मृडानी रुद्राणी शिव शिव भवानीति जपतः ॥**

" मला मोक्षाची इच्छा नाही. मला संसारातील वैभवाची इच्छा नाही. हे चंद्रमुखी, मला विज्ञानाची तसेच सुखाची सुद्धा इच्छा नाही. म्हणून हे मातोश्री, शिव, मृडानी, रुद्राणी, भवानी असा जप करीत माझा जन्म जाऊ दे."

अहिंसासत्यशौचदयास्तिक्यादिचारित्र्याणि परिपाल-नीयानि ॥७८॥

७८- (भक्तीच्या साधकाने) अहिंसा, सत्य, शौच, दया, आस्तिकता इत्यादी आचरणास योग्य अशा सदाचारांचे चांगल्या प्रकारे पालन करावयास हवे.

शहात्तराव्या सूत्रामध्ये भक्ती वाढवणाऱ्या कर्मांचे आचरण करण्याची गोष्ट सांगितली आहे. आता या सूत्रामध्ये त्या कर्मांतील आणि सद्गुणांतील पाच प्रधान आचारांचा नामनिर्देश करून, सूत्रकार हे त्यांचे पालनाची अतिशय आवश्यकता प्रतिपादन करीत आहेत.

दैवी संपत्तीचे गुण हेच भक्ताचा बाणा आहेत. जेथे भक्ती आहे तेथे दैवी संपत्ती असणे हे अनिवार्य आहे. काही लोक चुकीने असे सांगतात की "भक्ती करा; भक्तामध्ये सद्गुण नसतील तर नसेनात का. माणूस वाटेल तितके पाप करो; बस, तो भक्त झाला की मग कोणतीही पर्वा नाही." परंतु त्या माणसांचे हे कथन त्याप्रमाणेच तर्कविरुद्ध आहे की ज्याप्रमाणे , " सूर्य उदय होईल, तरी तेथे चांगलाच अंधकार टिकून राहील." जेथे सूर्याचा उदय होतो, तेथे अंधकार न राहाता, प्रकाश हा पसरतच जातो. याचप्रमाणे जेथे भक्ति-रूपी सूर्याचा उदय झाला आहे, तेथे त्या भक्तीची प्रकाशरूप अशी दैवी संपत्ती अवश्य पसरत जाईल. काही अंशी हे खरे आहे की भगवंताला प्राप्त करून घेतलेल्या, महात्मे, भक्त पुरुषांची त्यांच्या बाह्य आचरणावरून परीक्षा होत नाही. परंतु काही गुण तर असेच असतात की त्या भक्तांचे ठिकाणी ते गुण प्रकट असणे हे, अत्यंत आवश्यकच नव्हे तर अनिवार्य आहे. त्या गुणांमध्ये हे पाच गुणसुद्धा आहेत. ज्या पुरुषाचे ठिकाणी हे गुण नसतील तर यदाकदाचित् तो साधू किंवा भक्तसुद्धा असला, तरीसुद्धा त्याला भ्यावयासच हवे. परंतु बहुतेक या गुणांनी रहित असा मनुष्य हा साधू अथवा भक्त असतच नाही. साधकाने तर आपली परीक्षा या गुणांच्या आधारावरच करावयास हवी.

साधकाने असा निश्चय करावयास हवा की जर भगवंताचे चिंतन,आणि दैवी संपत्ती हे दोन्ही वाढत राहात असतील तर भक्तिमार्गावर आपली उन्नत्ति होत आहे; उलट जर जगाचे चिंतन होत असेल आणि दैवी संपत्ती वाढत नसेल तर आपली उन्नती होत नाही. तसेच जर विषयांचे चिंतन वाढत असेल आणि आसुरी संपत्ती वाढत राहात असेल, तर निश्चितपणेच आपली अवनती होत आहे. भगवंताचे प्रेमपूर्वक चिंतन हा भक्ताचा धर्म आहे आणि दैवी संपदेचे गुण ही त्याची जीवन-पद्धती आहे. भक्त सर्व काही सोडून देईल परंतु या गोष्टी तो सोडीत नाही. हे खरेच आहे की लीलामय भगवंताची आज्ञा किंवा आवड यानुसार सिद्ध अशा भक्ताला केव्हा केव्हा आपली जीवनपद्धति बदलणे भाग पडते; परंतु तो नियम नव्हे, तो अपवाद आहे. हे निश्चित आहे की तो भक्त कोणत्याही प्रकारची आसक्ती, ममता, कामना, वासना, अहंकार यामुळे अथवा मोहाला वश होऊन आपली जीवन पद्धती बदलत नाही. जेथे काहीतरी कारणाने कोणत्या तरी वेळी त्याची जीवन-पद्धती आणि त्याचा स्वाभाविक स्वधर्म असे भगवत्प्रेम यां दोहोमध्ये विरोध येताना दिसतो, तेथे भगवंताची आज्ञा घेऊन, तो भक्त आपल्या स्वधर्माच्या रक्षणासाठी आपली नीती सोडून देतो. अशा प्रकारची भरत, प्रह्लाद, विभीषण, श्रीगोपीजन इत्यादींची उदाहरणे सापडतात; त्यांनी भगवंतासाठी माता, पिता, भाऊ, आणि पती इत्यादींच्या आज्ञांचे उल्लंघन केले होते. परंतु तेथे सुद्धा नीट पाहिले तर दिसून येईल की सदाचार-नीतीचा त्याग झालेला नव्हता. प्रेमधर्माच्या पालनासाठी भक्तांनी प्राय: स्वत:च कष्ट सोसले आहेत. ज्या अवस्थेत सारे विधी आणि निषेध हे भगवंताच्या चरणी समर्पण होऊन जातात, त्या अवस्थेची गोष्ट वेगळी. परंतु हे लक्षात असावे की ते समर्पण हे आपोआप होते, ते केले जात नाही. विधि-निषेधांचे ओझे त्या वेड्या भक्ताच्या डोक्यावरून उतरवून घेतले जाते; तो ते जाणून बुजून उतरवत नाही. आणि त्या धुंदीमध्ये जर त्याच्या ठिकाणी काही दुर्गुण राहात असतील तर, ती गोष्ट येथे लक्ष्यात घेण्याचे कारण नाही. परंतु

येथे तर साधकाची चर्चा चालू आहे, आणि साधकाने फारच सावधपणे शास्त्रविहित सद्‌गुण आणि सदाचार यांचे रक्षण आणि पालन करावयास हवे. येथे सूत्रकाराने ज्या पाच गुणांचा नामनिर्देश केला आहे, त्यांचे स्वरूप संक्षेपाने असे समजून घ्यावयास हवे:-

**१. अहिंसा**- शरीर, मन आणि वाणी यांचेद्वारा कोणत्याही जीवाला कोणत्याही प्रकाराने, वर्तमानकाळी किंवा भविष्यकाळी दु:ख द्यायचे नाही, तर सदा सर्वांना सुखी ठेवण्याच्या क्रियेमध्ये गुंतून राहावयाचे.

**२. सत्य**- जसे पाहिले, ऐकले किंवा कळले असेल, बरोबर तसेच बोलणे, लिहिणे किंवा संकेत याद्वारे दुसऱ्याला समजावून सांगण्याची नीती पाळणे. वाणीने अशाच शब्दांचा उच्चार करावयाचा की जे सत्य असतील, मधुर आणि हितकारीसुद्धा असतील. काही लोक सत्य भाषण करताना कठोर भाषेचा उपयोग आवश्यक आहे असे मानतात, आणि अभिमानाला बळी पडून सांगत सुटतात की आम्ही सत्य बोलणारे आहोत, मग त्यामुळे कुणाचे हृदय दु:खी होवो अथवा सुखी होवो. परंतु ही गोष्ट योग्य नाही. द्वेष, वैर, निंदा, चहाडी इत्यादी गोष्टींपासून स्वत:ला दूर ठेवून, आपल्या आणि दुसऱ्याच्या हिताच्या दृष्टीने आपल्या वाणीला सदा माधुर्य आणि सत्य यांच्यामध्येच व्यवस्थित राखून ठेवावयास हवे. ज्याप्रमाणे चंद्राचे चांदणे हे प्रकाश देणारे असून त्याचे बरोबरच ते शीतलसुद्धा असते, त्याप्रमाणे भक्ताची वाणी ही सुद्धा सत्य आणि मधुर, प्रकाश देणारी तसेच शांतिदायक, असावयास हवी. ज्यामुळे दुसऱ्याचे अनहित होत असेल, ते सत्य सुद्धा योग्य नाही.

**३. शौच**- बाह्य व आभ्यंतर अशा दोन प्रकारच्या शुद्धीची आवश्यकता आहे.

**बाह्य शुद्धी**

**(क)** पाणी, माती, इत्यादींच्या वापराने शरीर स्वच्छ ठेवणे

**(ख)** दुसऱ्याची संपत्ती न लुबाडता, सत्यतापूर्वक निर्दोष पद्धतीने

द्रव्य कमावण्याची क्रिया करून धनाची शुद्धी संभाळायची.

(ग) शुद्ध ठिकाणी, शुद्ध स्नान केलेल्या मनुष्याने शुद्ध आणि निरामिष अन्नवस्तूंनी बनवले गेलेले पदार्थ भगवंताला अर्पण करणे (मग आपण खाणे अशी) ही भोजनाची शुद्धी सांभाळावी.

(घ) शुद्ध निष्कपट आणि प्रेमपूर्ण वर्तणुकीने व्यवहार शुद्ध राखावयाचा.

(ङ) अतिथिसत्कार आणि भगवंताच्या नामाचा ध्वनी यांचे द्वारा घर पवित्र ठेवायचे.

(च) शास्त्रविहित आचरण करून इतर सर्व बाह्य कर्मे शुद्ध ठेवायची.

**आंतर शुद्धी**

दंभ, वैर, अभिमान, आसक्ती, ईर्ष्या, द्वेष, शोक, पापाचे चिंतन, व्यर्थ विषयचिंतन इत्यादी दोष शक्य तितक्या प्रमाणात मनात येऊ न देता, सरळपणा, प्रेम, विनय, वैराग्य, द्वेषाचा अभाव, प्रसन्नता, सत्-चिंतन, आणि भगवत्‌चिंतन यांचे द्वारा मन पवित्र ठेवणे.

**दया** - एखादा दु:खी मनुष्य मग तो घरचा असो वा दुसरा कोणी असो, मित्र असो किंवा शत्रू असो, त्याची दु:खी दशा पाहिल्यावर, कोणत्याही प्रकारचा भेदभाव न करता, आपले मन व्याकुळ होऊन जाणे, आणि जमेल त्याप्रमाणे कष्ट सहन करून तसेच त्याग करूनसुद्धा त्याचे दु:ख दूर करण्याची कृती करणे म्हणजे दया. हा भाव सर्वच जीवांच्या बाबतीत असावयास हवा, आणि तो सर्वच काळांमध्ये असावयास हवा. ज्या कृतीमुळे जीवांचे अनहित होईल आणि त्यांना दु:ख पोहोचेल अशी कर्मे टाकून द्यावयास हवीत. याच प्रकारे देशामध्ये अथवा समाजामध्ये ज्या प्रथा किंवा कृत्ये- ज्यांमुळे जीवांचे अनहित असेल- त्या बंद करविण्याची कृती करावयास हवी.

**आस्तिकता** - ईश्वर आणि शास्त्रे हे प्रत्यक्ष असल्याप्रमाणे त्यांच्यावर पूर्ण विश्वास असावयास हवा. भगवंत आहे, तो सर्वव्यापी आहे,

तो सर्वांचा ईश्वर आहे. तो सर्वशक्तिसंपन्न आहे, सर्वज्ञ आहे, परम दया आहे, श्रेष्ठ सुहृद आहे, भक्तवत्सल आहे, दीनबंधू आहे,आणि तो सर्व विराजमान आहे, या गोष्टीवर विश्वास ठेवताच सारे पाप-ताप हे आपोआप नष्ट होऊन जातात. भगवंतावर विश्वास ठेवण्याची गरज ही सर्वांत प्रथम आणि सर्वांपेक्षा जास्त आहे. भगवंताचे अस्तित्व आणि त्याचा प्रभाव तसेच त्या गुण यांच्यावर विश्वास बसेल, तर मन हे स्वतःच भगवंताला चिकटून राहील मनुष्याला जे काही हवे असेल त्या सर्वांचे भांडार भगवंत आहे. ज्ञानाची इच्छा असेल, भगवंत ज्ञानस्वरूप आहे. प्रेम हवे असेल, तर भगवान् प्रेमम आहे. आनंद हवा असेल, भगवान् आनंदघन आहे; वैराग्य हवे असेल भगवंत हा श्रेष्ठ वैराग्यमय आहे; द्रव्य हवे असेल तर द्रव्याची मालकीण लक्ष्मी ही आपले चांचल्य सोडून, निरंतर त्या भगवंताची चरणसेवा करीत आहे ऐश्वर्य हवे असेल, तर सर्व जग हे त्या भगवंताच्याच ऐश्वर्याच्या एका कणाच प्रकाश आहे; यश हवे असेल तर, यशाचा प्रवाह त्या भगवंतापासूनच निघतो सारांश असा की संसारात आपण जे कोणतेही सौंदर्य, माधुर्य, प्रेम, ज्ञान वैराग्य, ऐश्वर्य, स्नेह, धन, भोग, सुख इत्यादी पाहात असतो आणि या स वस्तूंच्या बाबतीत आपली उच्च अशी कल्पना असते, ते सर्व काही भगवंताच्य एका क्षुद्र अंशामध्येच सामावून राहिले आहे. आपल्या या जगातील पदार्थ आणि त्या पदार्थांविषयींची आपली कल्पना हे भगवंताच्या त्या अखिल सौंदर्य, माधुर्य, ऐश्वर्य इत्यादी सद्गुण-सागराच्या एका थेंबाशीसुद्धा बरोबरी कर शकत नाहीत. जो कोणी माणूस अशा प्रकारे भगवंताला जाणून घेतो आणि त्यावर विश्वास ठेवतो तो मनुष्य भगवंताला सोडून क्षणभरही दुसरीकडे मन लावू शकत नाही, आणि तो जगातील क्षणिक भोगांचा उदय आणि विनाश यांचे बाबतीत हर्ष व शोक हे प्राप्त करून घेत नाही. आस्तिकतेवरचा विश्वास खरा असावयास हवा, हे निश्चित. भगवंताच्या अस्तित्वावरील विश्वासाचे संदर्भात आपण नेहमी प्रह्लादाचा इतिहास लक्षात घ्यावयास हवा.

हिरण्यकशिपूच्या आज्ञेने शेकडो, हजारो दुर्दांत असे दानव मोठ मोठी अस्त्रे-शस्त्रे घेऊन, प्रह्लादाला मारण्यास धावतात. तेव्हा तो सांगतो-

**विष्णुः शस्त्रेषु युष्मासु मयि चासौ व्यवस्थितः ।**
**दैतेयास्तेन सत्येन माक्रमन्त्वायुधानि च ॥**

(विष्णुपुराण १/१७/ ३३)

" अरे दैत्यांनो, माझा भगवान् विष्णू तुमच्या या शस्त्रांमध्ये सुद्धा आहे, तुम्हा लोकांतसुद्धा आहे, आणि माझ्यामध्येही आहे, तो सर्व ठिकाणी आहे. या श्रेष्ठ सत्याच्या प्रभावामुळे तुमच्या या शस्त्रांचा माझ्यावर काहीही परिणाम होणार नाही."

दैत्यांची शस्त्रे फुकट गेली; त्यांच्या आघाताने प्रह्लादाला थोडीसुद्धा वेदना झाली नाही.

विष धारण करणाऱ्या सर्पांमध्ये तसेच त्यांच्या विषांमध्ये, प्रचंड शरीर असणाऱ्या व माजलेल्या हत्तींमध्ये, आणि त्यांच्या वज्रासमान कठीण असणाऱ्या दातांमध्ये सुद्धा प्रह्लादाने आपल्या भगवंतास पाहिले. त्यांच्यामुळे प्रह्लादाचे काही नुकसान झाले नाही. प्रह्लादाला आगीत फेकले गेले तेव्हा त्याला अग्नीमध्ये भगवंताची नवीन नील कमलाप्रमाणे असणारी मूर्ती दृष्टीस पडली, त्याने म्हटले-

**तातेष वह्निः पवनेरितोऽपि**
**न मां दहत्यत्र समन्ततोऽहम् ।**
**पश्यामि पद्मास्तरणास्तृतानि**
**शीतानि सर्वाणि दिशाम्मुखानि ॥**

(विष्णुपुराण १/१७/४७)

" अहो पिताजी, वाऱ्याने प्रेरित असा हा अग्नीसुद्धा मला जाळीत नाही. मला तर सर्वही दिशांना असे शीतलत्व प्रतीत होत आहे की जणू माझ्या चारही बाजूंना कमळांचे पडदे टांगले आहेत."

प्रह्लादाला मारण्यासाठी पुरोहिताने 'कृत्या' उत्पन्न केली आणि जेव्हा प्रह्लादाला मारण्यास अयशस्वी ठरलेल्या त्या कृत्येने पुरोहितालाच ठार केले तेव्हा प्रह्लाद म्हणाला-

> यथा सर्वेषु भूतेषु सर्वव्यापी जगद्गुरुः ।
> विष्णुरेव तथा सर्वे जीवनत्वेते पुरोहिता : ।।
> यथा सर्वगतं विष्णुं मन्यमानोऽनपायिनम् ।
> चिन्तयाम्यरिपक्षेऽपि जीवन्त्वेते पुरोहिताः ।।

(विष्णुपुराण १/१८/४०- ४१)

" सर्वव्यापक जगद्गुरू असा भगवान् विष्णू सर्व प्राण्यांत व्याप्त आहे; या सत्याच्या सामर्थ्याने हे पुरोहित महाराज जिवंत होवोत. ज्याअर्थी मी सर्वगत आणि अक्षय अशा विष्णू भगवंताला मला मारण्याचे कृत्य करणाऱ्या प्राण्यांमध्येसुद्धा पाहात आहे, त्याअर्थी हे पुरोहित महाराज जिवंत होवोत."

प्रह्लादाच्या खंबीर आस्तिकतेमुळे पुरोहित जिवंत झाला. शेवटी हिरण्यकशिपूने विचारल्यावर, प्रह्लादाने अतिशय दृढपणाने, अविचल निश्चयाने, छातीवर हात ठेऊन सांगितले, "होय, माझा प्रभू सर्वत्र आहे. या खांबातसुद्धा आहे." आपल्या सेवकाचे हे वचन प्रत्यक्ष खरे करण्यासाठी भगवान् खांब फोडून प्रगट झाले. कसा हा निश्चय व कसा हा त्याचा अद्भुत परिणाम ! हीच आस्तिकता होय.

भक्ताने शक्य असेल त्याप्रमाणे आस्तिक होऊन राहाण्याची आणि आस्तिकतेमध्ये सतत पुढे जाण्याची क्रिया करावयास हवी.

सूत्रकाराने या सूत्रात **'आस्तिक्य'** या शब्दाबरोबर **'आदि '** हा शब्द जोडून, दैवी संपदेच्या प्रत्येक दैवीगुणाकडे संकेत केला आहे. श्रीमद्भगवद्गीतेमध्ये दैवी संपत्तीचे हे २६ गुण सांगितले गेले आहेत. भगवान् सांगतात-

> अभयं सत्त्वसंशुद्धिर्ज्ञानयोगव्यवस्थितिः ।

दानं दमश्च यज्ञश्च स्वाध्यायस्तप आर्जवम् ॥
अहिंसा सत्यमक्रोधस्त्यागः शान्तिरपैशुनम् ।
दया भूतेष्वलोलुप्त्वं मार्दवं ह्रीरचापलम् ॥
तेजः क्षमा धृतिः शौचमद्रोहो नातिमानिता ।
भवन्ति सम्पदं दैवीमभिजातस्य भारत ॥

(१६/१-३)

" हे अर्जुना, निर्भयता, अंत:करणाची शुद्धी, भगवंताच्या स्वरूपामध्ये निरंतर दृढ स्थिती, आस्तिकता, दान, इंद्रियसंयम, यज्ञ, स्वाध्याय, तप, सरळपणा, अहिंसा, सत्य, क्रोधाचा अभाव, त्याग, शांती, कुणाचीही चहाडी अगर निंदा न करणे, सर्व प्राण्यांवर दया, लोभरहित होणे, कोमलता, ईश्वर आणि शास्त्र यांचे विरुद्ध कर्मे करण्यास लाजणे, चांचल्याचा अभाव, तेज, क्षमा, धैर्य, शौच, अद्रोह, आणि अभिमानाचा अभाव- हे सर्व गुण दैवी संपदा प्राप्त करून घेतलेल्या पुरुषामध्ये असतात." ही दैवी संपत्ती भक्तामध्येच असते. म्हणून भक्तांना देव असे म्हटले गेले आहे.

द्वौ भूतसर्गौ लोकेऽस्मिन् दैव आसुर एव च ।
विष्णुभक्तः* स्मृतो दैव आसुरस्तद्विपर्ययः ॥

" या जगात दोन प्रकारचे जीव आहेत. एक देव आणि दुसरा आसुर. जे भगवंताचे भक्त आहेत, ते देव होत. जे भक्त नाहीत ते आसुर होत."

**सर्वदा सर्वभावेन निश्चिन्तितैर्भगवानेव भजनीयः ॥७९॥**

**७९ - सर्व काळी सर्व भावाने निश्चिंत होऊन, केवळ भगवंताचे भजन करावयास हवे.**

हे सूत्र फारच महत्त्वाचे आहे. यामध्ये देवर्षी नारदाने प्रेममार्गी भक्ताचा

---

* येथे विष्णुभक्त शब्दाने, शास्त्रानुसार भगवंताच्या कोणत्याही नाम-रूपाची भक्ती करणारा सात्त्विक भक्त समजावयास हवा. भगवंताच्या नाम-रूपात भेद मानणे हा तर अपराधच मानला गेला आहे.

भगवंताच्या भजनाचा फारच सुंदर प्रकार सांगितला आहे. खरे म्हणजे जो पुरुष भगवंताचे दिव्य गुण, रहस्य आणि प्रभाव यांना खऱ्याखुऱ्या स्वरूपात जाणून घेतो- जाणणे तर दूर राहो- तो संतांचे द्वारा ऐकून त्याचेवर विश्वास ठेवतो, तो पुरुष भगवंतास सोडून, कोणत्याही काळी मन-वाणी-शरीर यांचे द्वारा दुसरे काम करू शकत नाही. भगवान् शंकर सांगतात-

**उमा राम सुभाउ जेहिं जाना। ताहि भजनु तजि भाव न आना ॥**

"हे उमे, ज्याला रामाचा स्वभाव माहीत आहे, त्याला भजन सोडून दुसरा भाव नसतो."

दरिद्री माणसाला जर कुठे परिस मणी मिळाला तर तो दुसरीकडे का बरे पाहील ? एकमात्र भगवंत हाच परमतत्त्व आहे, भगवंत हाच सर्वांची गति आहे, भगवंत हाच सर्वांचा आधार आहे, भगवंत हाच सर्वशक्तिमान आहे, भगवंत हाच सर्व दिव्य गुणांचे निधान आहे. भगवंत हाच सौंदर्य, माधुर्य आणि ऐश्वर्य यांचा निधी आहे, भगवंत हाच ज्ञान आणि वैराग्य यांचे स्वरूप आहे, आणि आनंदाचा कंद हेच त्याचे शरीर आहे, आणि इतके सर्व असूनसुद्धा तो आपला परमसुहृद आहे; आपल्याला मिठी मारण्यास तो सदा हात पसरून उभ्या उभ्या आपली वाट पाहात आहे, ही गोष्ट कळून आल्यावर, सकामी किंवा अकामी, विषयी अथवा मुमुक्षू, साधक वा सिद्ध, यांपैकी कोण बरे असा पुरुष असेल की जो भगवंताला सोडून, एका अर्ध्या क्षणासाठी सुद्धा दुसऱ्याचा आश्रय घेईल ? आपण भगवंताचे भजन करीत नाही, याचे कारण हेच की आपण त्या भगवंताचा प्रभाव जाणलेला नाही, आणि भगवंताचा प्रभाव ऐकला असूनसुद्धा त्यावर आपण विश्वास ठेवलेला नाही. देवर्षी नारद सांगतात की विश्वास करा आणि निरंतर मन-वाचा-शरीर यांचे द्वारा केवळ त्याच परम प्रियतम भगवंताचे भजन करा, आणि मनातून साऱ्या चिंता दूर सारून द्या. समस्त चिंतांपासून चित्ताला मुक्त करा. ज्याप्रमाणे लहान शिशू आईच्या कुशीत जाऊन निश्चिंत होऊन जातो, त्याचप्रमाणेच दास होऊन

निश्चिंत होऊन जा. ज्याचा रक्षणकर्ता राम आहे, त्याने कशाला व कोणत्या गोष्टीची चिंता करायची ? सर्व काही सोडून, सर्वांची आशा टाकून देऊन, भगवंतासमोर सर्व गोष्टी तुच्छ आहेत असे मानून, त्या दिव्यातिदिव्य मधुर सुधारसापुढे जगातील सारे रस फिके आहेत, असे समजून, त्या कोटी कोटी मदनांच्या दर्पाचे दलन करणाऱ्या, सौंदर्याचे सार अशा श्यामसुंदर कृष्णाच्या स्वरूपापुढे जगातील समस्त रूप-राशींना नगण्य मानून, त्या भगवंताच्या भजनाला लागा; चित्ताला त्या कृष्णाचे ठिकाणीच अर्पण करून टाका; सर्व प्रकारे त्याच्यावरच अवलंबून राहा; मनाने त्याचेच स्मरण करा; बुद्धीने त्याचाच विचार करा; वाणीने त्याचेच गुणानुवाद गा. कानांनी त्याचेच गुण आणि लीला ऐका; जिभेने त्याच्याच प्रसादाची चव चाखा; नाकाने त्याच्याच पादरूपी पद्माच्या परागाचा वास घ्या; शरीराने सर्वत्र त्याच्याच स्पर्शाचा अनुभव घ्या, डोळ्यांनी त्या छविधामाच्या छबीला सर्वत्र सर्वदा पाहा; आणि हातांनी त्याची सेवा करा व तन-मन -धन हे सर्व त्यालाच अर्पण करून टाका.

जोपर्यंत तुम्ही जगातील पदार्थांना " आपले " असे मानत राहाल आणि त्यांच्या ठिकाणी ममत्व बाळगाल, तोपर्यंत तुम्ही कधीही निश्चिंत होऊ शकणार नाही; जगातील हे नाशवंत, क्षणभंगुर, सतत बदलण्याचा स्वभाव असणारे पदार्थ तुम्हाला कधी निश्चिंत होऊ देणार नाहीत. म्हणून त्यांच्यावरील ममत्व आणि आसक्ती दूर करा. हे पदार्थ ज्याची वस्तू आहेत त्याच्यावर त्या सोपवा; बघा, जेव्हा तुम्ही त्यांना भगवंताला समर्पण कराल तेव्हा तुम्ही निश्चिंत होऊन जाल. मग नाशाची भीती नाही, अभावाची चिंता नाही की कामनांची आग नाही म्हणजे कामनांमुळे जळणे नाही. आणि जेव्हा तुम्ही निश्चिंत होऊन भजनाला लागाल तेव्हा तुम्हाला त्या दिव्य, आनंद-माधुर्य-सौंदर्य यांच्या सागराची चमक मधून मधून दिसू लागेल. मग तुमच्या चित्तास दुसरीकडे जावे असे वाटणार नाही. ऐश्वर्याकडे तुमची दृष्टीसुद्धा जाणार नाही- आणि जर कुठे ऐश्वर्याची काही वासना समजा राहूनच गेली, तर संपूर्ण

ऐश्वर्यांचा खजिना हा त्या भगवंताच्या चरणांचे ठिकाणी तुम्हाला मिळेल. म्हणूनच विषयासक्तीरूपी व्यभिचार टाकून देऊन, तो एकमात्र, प्राण्यांना आराम देणारा, प्रियतम असा जो प्रभु त्याची लाडकी पतिव्रता पत्नी होऊन जा.

भगवान् स्वत: आज्ञा करतात-

**मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ।**
**मामेवैष्यसि सत्यं ते प्रतिजाने प्रियोऽसि मे ॥**
**सर्वधर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज ।**
**अहं त्वा सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुच: ॥**

(गीता १८/६५-६६)

"हे अर्जुना, तू माझ्या ठिकाणीच मन लाव, माझाच भक्त हो, माझीच पूजा कर, मलाच नमस्कार कर; मग निश्चितपणे तू मला प्राप्त करून घेशील, अशी मी तुझ्याजवळ सत्य प्रतिज्ञा करीत आहे; कारण तू मला अत्यंत प्रिय आहेस. दुसऱ्या साऱ्या धर्मांचा आश्रय सोडून, तू केवळ एक अशा मलाच अनन्यपणे शरण ये. सर्व पापांतून मीच तुझी सुटका करीन. तू चिंता करू नकोस."

भगवंताचे इतके प्रतिज्ञायुक्त आश्वासन मिळूनसुद्धा जर आपण सर्वदा सर्व भावाने निश्चिंत होऊन, भगवंताचे भजन केले नाही, तर आपल्यासारखा अभागी आणखी कोण असेल बरे ?

म्हणून या गोष्टीत आपले परम कल्याण आहे असे मानून, उठता-बसता, जागेपणी- झोपेत, सर्वदा सर्व कार्यांमध्ये, श्रीभगवंताच्या पवित्र अस्तित्वाचे दर्शन घेत घेत, हानि-लाभ, आणि जन्ममरणाची चिंता सोडून, आपण निश्चिंतपणे, अनन्य चित्ताने, श्रीहरीचे भजन- कीर्तन करावयास हवे.

* * *

# प्रेमभक्तीचे फळ आणि भक्तीची सर्वश्रेष्ठता

**स कीर्त्यमानः शीघ्रमेवाविर्भवति अनुभावयति च भक्तान् ॥८०॥**

**८०- प्रेमपूर्वक भगवंताचे कीर्तन झाल्यावर, तो भगवान् झटपटच प्रकट होतो, आणि भक्तांना आपला अनुभव करवून देतो.**

या सूत्रात अगोदरच्या सूत्रानुसार, अनन्य भजन केल्याने, भगवान् लौकरच साक्षात प्रकट होऊन, भक्ताला आपला अनुभव करवून देतो, असे सांगितले होते. या सूत्रात '**आविर्भवति**' या शब्दाने भगवंताचे संपूर्ण दिव्य सौंदर्य व माधुर्य यांच्या रसाचे सार असा भगवान् साकार रूपात प्रगट होतो, असे समजावयास हवे. खरे म्हणजे निर्गुण व सगुण आणि साकार व निराकार यांमध्ये कोणताही भेद नाही. तो भगवंत हाच मन आणि बुद्धीला अगोचर असणारे ब्रह्म आहे, तोच सृष्टिकर्ता सगुण निराकार विभू आहे, तोच जगाचा आत्मा आहे, तोच विराट पुरुष आहे; त्याच्यापेक्षा वेगळे असे काही सुद्धा नाहीच आहे. जेव्हा सात्त्विक आणि हट्टी अशा भक्ताच्या प्रेमाचे भगवंताला आकर्षण वाटते, तेव्हा तो आपल्या दिव्य आल्हाददायक शक्तीचे निमित्त करून, दिव्य चिन्मय वस्त्रे, माळा, गंध, आयुध, अलंकार इत्यादींनी सुसज्जित होऊन, सौंदर्य-निधीच्या रूपात प्रकट होऊन भक्ताला कृतार्थ करतो.

परंतु असे नव्हे की भगवंताचे रूप हे जग निर्माण करणाऱ्या मायेच्या द्वारा उत्पन्न होते. या रूपामध्ये सर्व गोष्टी या दिव्य शुद्ध, नित्य, चिन्मय, आणि भगवत्स्वरूप अशाच असतात. म्हणूनच या दिव्य रसमय स्वरूपाच्या समोर येताच आत्मज्ञानी मुनींची मेलेली मनेसुद्धा जिवंत होऊन, या स्वरूपातील

एक एका वस्तूवर मुग्ध होऊन जातात.

इंद्रियांच्या विकाररूप अशा ज्या रूप, रस, गंध, शब्द व स्पर्श यांमधून मुमुक्षु-अवस्थेत सुद्धा चित्त उपरत होऊन जाते, त्याच रूप, रस, गंध, स्पर्श यांच्या बाबतीत मुनी आणि आत्मज्ञानी हे आकृष्ट होतात, ही गोष्ट असे सिद्ध करते की भगवंताच्या दिव्य स्वरूपाचे गंध, शब्द, रूप,रस, स्पर्श इत्यादी विषय हे मायेचे कार्य असणाऱ्या तीन गुणांपासून उत्पन्न होत नाहीत. हे रूप इत्यादी हे सर्व-गुण-संपन्न आणि सदा निर्गुण अशा प्रभूचे स्वरूपच आहेत. म्हणून वेदांताचे प्रधान आचार्य श्रीशंकराचार्य हे भगवान श्रीकृष्णाच्या संदर्भात म्हणतात-

**ब्रह्माण्डानि बहूनि पङ्कजभवान् प्रत्यण्डमत्यद्भुतान्**
**गोपान् वत्सयुतानदर्शयदजं विष्णूनशेषांश्च यः।**
**शम्भुर्यच्चरणोदकं स्वशिरसा धत्ते स मूर्तित्रयात्**
**कृष्णो वै पृथगस्ति कोऽप्यविकृतः सच्चिन्मयो नीलिमा ॥**

"ज्याने ब्रह्मदेवाला अनेक ब्रह्मांडे दाखविली, ज्याने प्रत्येक ब्रह्मांडात वेगवेगळे ब्रह्मदेव दाखविले, ज्याने वासरांसह सर्व गोप दाखविले, तसेच विभिन्न ब्रह्मांडातील विष्णूची सर्व स्वरूपे दाखविली, ज्याचे चरणोदक श्रीशंभू आपल्या मस्तकावर धारण करतात, ती जी श्रीकृष्ण-मूर्ती ही (ब्रह्मांडामध्ये विभिन्न स्वरूपात अंमल चालवणारे अंशावतार असे ब्रह्मा- विष्णु- महेश), यांच्यापेक्षा वेगळाच असा काही विकारहित सच्चिदानंदमय असा नीलिमा (हा कृष्ण) आहे."

एकदा दिव्य वैकुंठ लोकात भगवान् श्रीमहाविष्णूच्या समीप, नित्य आत्मनिष्ठ असणारे सनक इत्यादी ऋषी उपस्थित झाले. ज्यावेळी ते भगवंताच्या समोर पोहोचले आणि त्यांनी त्या भगवंताच्या स्वरूपाकडे पाहिले, तेव्हाच ते मुग्ध होऊन गेले. भगवंताचे सौंदर्य पाहाता पाहाता, त्यांचे नेत्र कोणत्याही प्रकारे तृप्तच होत नव्हते. भगवंताच्या सौंदर्यानेच त्यांना फक्त मोहित केले असे नव्हे तर भगवंताला प्रणाम करतेवेळी, कमलनयन अशा श्रीहरीच्या

पादपद्माच्या परागांशी मिसळलेल्या तुलशी-मंजरीचा सुगंध हा वायूचे द्वारा नासिका मार्गाने ज्या क्षणीच मुनींच्या अंतरात पोचला, त्या क्षणीच, अचलरूपाने नित्य ब्रह्मानंदाचा अनुभव घेणाऱ्या त्या मुनींचे हृदय क्षुब्ध होऊन गेले, त्या सुगंधामुळे त्यांचे मन खेचले गेले, त्यावर त्यांचे मन मोहित होऊन गेले आणि आनंदाने त्यांच्या अंगावर रोमांच उभे राहिले-

**तस्यारविन्दनयनस्य पदारविन्द-**
**किञ्जल्कमिश्रतुलसीमकरन्दवायुः ।**
**अन्तर्गतः स्वविवरेण चकार तेषां**
**संक्षोभमक्षरजुषामपि चित्ततन्वोः ॥**

(श्रीमद्भागवत ३/१५/४३)

हीच अवस्था भगवान् श्रीराम व लक्ष्मण यांचे स्वरूप पाहिल्यावर, ब्रह्मवेत्त्यांमध्ये श्रेष्ठ असणाऱ्या, ज्ञानी- श्रेष्ठ अशा विदेहजनकाची झाली-

**प्रेम मगन मनु जानि नृपू करि बिबेकु धरि धीर ।**
**बोलेउ मुनि पद नाइ सिरु गदगद गिरा गभीर ॥**

जेव्हा राजा जनकाने राम- लक्ष्मण यांचे मधुर-मनोहर असे स्वरूप पाहिले तेव्हा तो विदेह राजा विदेही बनून गेला. त्या राम लक्ष्मणांच्या रूप-राशी दृष्टीपुढे येताच, विदेह जनकाचे ज्ञान जणू मूर्च्छित होऊन पडले, देहाची शुद्ध जाऊ लागली, आणि डोळ्यात अश्रू आले. जनकजींना वाटले " हे असे काय झाले? राम-लक्ष्मण या बालकांच्या सौंदर्यावर- नेत्रांच्या विषयांवर- जनकांच्या मनात मोह कसा निर्माण झाला ?" जनकाने विवेकाने व धैर्याने स्वतःला सावरले; त्याला विचारल्याशिवाय राहवले नाही. विश्वामित्रजींच्या चरणांना प्रणाम करून, राजा जनकाने बोलण्याची इच्छा केली, परंतु जनकाच्या हृदयाच्या द्रवीभूत स्थितीला त्याचा विवेक दूर करू शकला नाही. बोलता बोलता जनकाची वाणी गद्‌गद झाली आणि भारावून गेली. आपल्या स्थितीचे वर्णन करत राजा जनकाने विश्वामित्राला विचारले ते जरा ऐकावे,

**कहहु नाथ सुंदर दोउ बालक । मुनिकुल तिलक कि नृप कुल पालक ॥**

ब्रह्म जो निगम नेति कहि गावा । उभय वेष धरि की सोइ आवा ॥
सहज बिरागरूप मनु मोरा । थकित होत जिमि चंद चकोरा ॥
ताते प्रभू पूछउँ सति भाऊ । कहहु नाथ जनि करहु दुराउ ॥
इन्हहि बिलोकत अति अनुरागा । बरबस ब्रह्मसुखहि मन त्यागा ॥

"मुनिवर, हे दोन सुंदर बालक कोण आहेत. ते सांगा. मुनि कुलातील भूषण आहेत की राजकुलातील ? श्रुतींनी ज्याचे वर्णन 'नेति नेति' म्हणून केले आहे, ते ब्रह्मच या दोघांच्या वेषात आले आहे काय ? माझे वैराग्याने भरलेले मन यांना पाहून मुग्ध होऊन जात आहे. ज्याप्रमाणे चंद्राला पाहून चकोर पक्षी मुग्ध होऊन जातो, त्याप्रमाणे माझ्या मनाची अवस्था झालेली आहे. म्हणून हे मुनिवरा, सत्य भावनेने मी हे विचारत आहे; काहीही न लपविता मला सांगा. यांना पाहताना प्रेम उचळंबून येते आणि माझ्या मनाने ब्रह्म-सुखाचाही त्याग केलेला आहे." (मग असे का ?)

हसत हसत विश्वामित्र मुनीने राजाच्या अनुमानाचे समर्थन केले.

अशा प्रकारे जे स्वरूप वारंवार पाहिल्यावर सुद्धा ते पाहाण्याची इच्छा वाढतच राहाते, ते स्वरूप काही तरी विलक्षणच अशी वस्तू आहे. जगात कोणताही पदार्थ असा नाही की जो वारंवार पाहिल्यावरसुद्धा तो पाहण्याची इच्छा प्रबळ होते. अनुभव तर असे सांगतो की जी वस्तु पाहाण्याची इच्छा प्रबळ होते ती वस्तू प्राप्त झाल्यावर, प्रथम पाहताना तर फारच आनंद होतो; परंतु नंतर जसजसे त्या वस्तूचे दर्शन सुलभ होत जाते, तसतसेच त्या वस्तूच्या बाबतीतील आकर्षण कमी होत जाते. परंतु भगवंताचे सौंदर्य असे आहे की ते पाहता पाहता कधी तृप्तीच होत नाही. जसजसे प्रेमी भक्ताचे प्रेम प्रत्येक क्षणी वाढत राहाते, तसतसेच भगवंताची सौंदर्य-छटासुद्धा प्रतिक्षणी अधिकाधिक वाढतच राहाते. प्रत्येक पळाला नवीन नवीन सौंदर्य आणि अधिकाधिक माधुर्य दिसून येते. भगवंताचे ते स्वरूप मायिक असत नाही, ते संपूर्णपणे दिव्य असते, आणि ज्या क्षणी ते भक्ताचे समोर त्या भक्ताच्या प्रेमाच्या आकर्षणाने प्रगट होते, त्याच क्षणी त्या भक्ताला दिव्यभावापन्न करून, आपल्या

स्वरूपाचा अनुभव करवून देते. जोपर्यंत ते माधुर्य समोर राहाते, तोपर्यंत भक्त हा कोणत्यातरी दिव्य राज्यात राहातो. त्या भक्ताचे सर्व काही दिव्य होऊन जाते. त्या काळात भगवंताच्या माधुर्याशिवाय तो भक्त आणखी काहीही पाहात नाही व ऐकत नाही. तो तन्मय होऊन जातो आणि त्याला भगवंताचा खराखुरा अनुभव येतो.

**त्रिसत्यस्य भक्तिरेव गरीयसी, भक्तिरेव गरीयसी ॥८१॥**

**८१- तीन (कायिक, वाचिक, मानसिक) सत्यांमध्ये (अथवा तीन काळांत सत्य अशा भगवंताची) भक्ती हीच श्रेष्ठ आहे, भक्ती हीच श्रेष्ठ आहे.**

कायिक, वाचिक आणि मानसिक या तीन सत्यांना "त्रिसत्य" असे म्हणतात. तीन सत्यांपेक्षा भक्तीचे श्रेष्ठत्वाचा अनुभव देवर्षी नारदजींना आला होता. म्हणून ते वारंवार ही घोषणा करतात की भक्ती हीच श्रेष्ठ आहे आणि खरे तर गोष्ट तशीच आहे. उपनिषदांतसुद्धा अशा प्रकारची घोषणा केली गेली आहे-

**सर्वोपायान् परित्यज्य भक्तिमाश्रय । भक्तिनिष्ठो भव, भक्तिनिष्ठो भव । भक्त्या सर्वसिद्धय: सिद्ध्यन्ति भक्त्यासाध्यं न किञ्चिदस्ति ।** (त्रिपादविभूतिनारायणोपनिषद)

" सर्व उपाय सोडून देऊन, भक्तीचाच आश्रय घे. भक्तिनिष्ठ हो, भक्तिनिष्ठ होऊन जा. भक्तीमुळे सर्व सिद्धी सफळ होऊन जातात. अशी कोणतीही गोष्ट नाही की जी भक्तीमुळे प्राप्त होत नाही." भक्तीने मुक्तीसुद्धा मिळते, आणि मुक्ती देणारा भगवान् सगुण रूपानेसुद्धा भक्तांबरोबर खेळतो. स्वत: भगवंताच्या श्रीमुखातील वचन आहे-

**यथाग्नि: सुसमृद्धार्चि: करोत्येधांसि भस्मसात्।**
**तथा मद्विषया भक्तिरुद्धवैनांसि कृत्स्नश: ॥**

(श्रीमद्भागवत ११/१४/१९)

" हे उद्धवा, ज्याप्रमाणे सर्व बाजूंनी पेटलेला अग्नी हा काष्ठांच्या ढिगाला भस्म करून टाकतो, त्याप्रमाणेच माझी भक्ती सर्व (लहान मोठ्या)

पापांच्या समूहाला जाळून टाकते."

भक्ताच्या साधनाचे रक्षण भगवंत करतो आणि त्याचे फलस्वरूप असणारी आपली प्राप्ती स्वत:च भक्ताला करवून देतो; आणि सर्व माणसांचा या भक्तिसाधनेसाठी अधिकार आहे, म्हणून भक्तीपेक्षा अधिक श्रेष्ठ आणखी काय बरे असेल ? म्हणूनच श्रीमद्‌भगवद्‌गीतेमध्येसुद्धा जागोजागी भगवंताने भक्तीची प्रशंसा केली आहे; आणि बाराव्या अध्यायात तर त्याने भक्ताबद्दल 'युक्ततम' येथपर्यंत सांगून टाकले आहे. म्हणूनच येथे देवर्षी नारद टाळी वाजवून मुक्त कंठाने, वज्रगंभीर स्वराने घोषणा करीत आहेत की कायिक, वाचिक आणि मानसिक अशा तीन सत्यांमध्ये अथवा तीनही काळात सत्य असणाऱ्या अशा भगवंताची भक्ती हीच सर्व श्रेष्ठ आहे, भक्तीच सर्वश्रेष्ठ आहे.

**गुणमाहात्म्यासक्तिरूपासक्तिपूजासक्तिस्मरणासक्तिदास्या-सक्तिसख्यासक्तिकान्तासक्तिवात्सल्यासक्त्यात्मनिवेदनासक्ति-तन्मयतासक्तिपरमविरहासक्तिरूपा एकधाप्येकादशधा भवति ॥८२॥**

**८२- ही प्रेमरूप भक्ती एकच असूनसुद्धा- १. गुण- माहात्म्य-आसक्ती २. रूप- आसक्ती ३. पूजा-आसक्ती ४. स्मरण-आसक्ती ५. दास्य-आसक्ती ६. सख्य-आसक्ती ७. कांता-आसक्ती ८. वात्सल्य-आसक्ती ९. आत्मनिवेदन- आसक्ती १० तन्मयता- आसक्ती आणि ११. परम-विरह- आसक्ती या प्रकारांनी अकरा प्रकारची होते.**

जे कुणी महात्मे प्रेमरूप अशा पूर्णतेप्रत पोचतात, त्यांच्या ठिकाणी तर या सर्वच आसक्ती राहात असतात. व्रजगोपिकांमध्ये या आसक्ती होत्या. त्यांचे उदाहरण देवर्षी नारदजीने पूर्वीच दिले आहे. जेव्हा सर्व आसक्तींचा विकास होत नाही, तेव्हा आपापल्या आवडीनुसार या अकरा मधील एक किंवा अनेक भावांनी भगवंतावर प्रेम केले जाते. प्रेम ही वस्तू एकच आहे; म्हणून या भक्तांमध्ये प्रेमासक्तीच्या भेदानुसार मात्र कुणांमध्येही उच्च वा नीच अशी भावना करावयाची नाही.

या भिन्न भिन्न आसक्तींच्या द्वारा भगवंताला भजणारे असंख्य भक्त

होऊन गेले आहेत. उदाहरण म्हणून काही नावे पुढे दिली जात आहेत-

**१– गुण-माहात्म्य-आसक्त-भक्त:-** देवर्षी नारद, महर्षी वेदव्यास, शुकदेव, याज्ञवल्क्य, काक भुशुंडी, शेष, सूत, शौनक, शांडिल्य, भीष्म, अर्जुन, परीक्षित, पृथू, जनमेजय, इत्यादी.

**२– रूप-आसक्त-भक्त:-** मिथिला नगरीचे नर आणि नारी, राजा जनक, दंडकारण्यातील ऋषी, व्रजनारी, इत्यादी.

**३– पूजा-आसक्त-भक्त:-** श्रीलक्ष्मी, राजा पृथू, अंबरीष, श्रीभरतजी, वगैरे

**४– स्मरण-आसक्त- भक्त:-** प्रह्लाद, ध्रुव, सनक, इत्यादी

**५– दास्य-आसक्त-भक्त:-** श्रीहनुमान, अक्रूर, विदुर, वगैरे

**६– सख्य-आसक्त-भक्त:-** अर्जुन, उद्धव, संजय, श्रीदाम, सुदामा, इत्यादी

**७– कांता-आसक्त-भक्त:-** कृष्णाच्या आठ पट्टराण्या

**८– वात्सल्य-आसक्त-भक्त:-** कश्यप-अदिती, सुतपा-पृश्नी, मनु-शतरूपा, दशरथ-कौसल्या, नंद-यशोदा, वसुदेव-देवकी, इत्यादी

**९– आत्मनिवेदन-आसक्त-भक्त:-** श्रीहनुमान, राजा अंबरीष, राजा बली, विभीषण, शिबी, वगैरे

**१०– तन्मयता-आसक्त-भक्त:-** याज्ञवल्क्य, शुक, सनक, इत्यादी ज्ञानी लोकांचा समूह, किंवा कौंडिण्य, सुतीक्ष्ण इत्यादी प्रेमी मुनिगण

**११– परम-विरह-आसक्त-भक्त:-** उद्धव, अर्जुन, ब्रजातील नर आणि नारी.

गोपींच्यामध्ये अकराही प्रकारच्या प्रेमाचा विकास झाला होता.परंतु वर सांगितलेल्या भक्तांमध्ये फक्त एकेक प्रकारच्या प्रेमाचा विकास होता असे नव्हे, तर त्यांच्या ठिकाणी ज्या भावाची प्रधानता होती, त्या भावामध्ये त्याचे नाव दिले गेले आहे.

**इत्येवं वदन्ति जनजल्पनिर्भया एकमता: कुमारव्यासशुक**

**शाण्डिल्यगर्गविष्णुकौण्डिन्यशेषोद्धवारुणिबलिहनुमद्विभीषणादयं भक्त्याचार्याः ॥८३॥**

**८३- कुमार (सनत्कुमार इत्यादी), वेदव्यास, शुकदेव शांडिल्य, गर्ग, विष्णू, कौंडिन्य, शेष, उद्धव, आरुणी, बली, हनुमान विभीषण, इत्यादी भक्ति-तत्त्वाचे आचार्य-गण हे लोकांच्या निंदा-स्तुतीची काहीसुद्धा भीती न बाळगता, सर्वजण एक मुखाने असेच सांगतात की भक्ती हीच सर्वश्रेष्ठ आहे.**

भक्तितत्त्व जाणणाऱ्या प्रधान प्रधान आचार्यांचे मत देऊन, देवर्ष नारद हे आपल्या कथनाची पुष्टी करीत आहेत. हे सर्वच महापुरुष भक्तितत्त्वाचे ज्ञाते आणि आचार्य होते. सनत्कुमार नित्य "हरिः शरणं " या मंत्राचा जप करीत असत, आणि ते भक्ति-मार्गाचे प्रधान प्रवर्तक आहेत. भगवान् वेदव्यास यांनी अठराही पुराणांमध्ये भक्ती हीच मुख्य आहे, असे सांगितले आहे; त्यांचे श्रीमद्भागवत पुराण हे तर भक्तीची खाणच आहे. श्रीशुकदेवांच्या भक्तीबद्दल काय सांगावे ? भक्तिरस-प्रधान असे श्रीमद्भागवत पुराण हे त्यांच्याच मुखातून बाहेर पडलेला अमृताचा सागर आहे. महर्षी शांडिल्य यांचे भक्तिसूत्र हेच शांडिल्य हे भक्तितत्त्वाचे एक प्रधान आचार्य होते, हे सिद्ध करते. महर्षी गर्ग - यांच्या गर्ग संहितेमध्ये भक्तीचा प्रवाह वाहात आहे. महर्षी विष्णू हे एक मुख्य स्मृतिकार होते. विष्णुस्वामी हे भक्ति संप्रदायाचे प्रधान आचार्य झालेले आहेत. कौंडिण्य यांनी तन्मयता-आसक्तीमध्ये सिद्धी प्राप्त करून घेतली होती, असे मानले जाते. भगवान् शेषजी हे तर रात्रंदिवस आपल्या सहस्र मुखांनी हरिगुणांचे गायनच करीत असतात; ते दास्य भावाचे श्रेष्ठ आचार्य आहेत; दासरूप लक्ष्मणाच्या रूपात त्या शेषनागानेच अवतार घेतला होता. उद्धवजी महाराज हे भगवान् श्रीकृष्णाचे मुख्य मित्र होते. आरुणी हे निंबार्कांचे दुसरे नाव आहे असे मानले जाते; ते युगल स्वरूपाचे उपासक होते. राजा बली संपूर्ण आत्मनिवेदन-आसक्तीचे मूर्तिमंत स्वरूप आहे; त्या भक्तिबळामुळे भगवंताने आपणहूनच त्याचा द्वारपाल होणे स्वीकारले होते. प्रातःस्मरणीय भक्तराज

श्रीहनुमानजी यांचा दास्यभाव प्रसिद्ध आहे. महाभाग्यवान विभीषण यांनी भक्तीच्या सामर्थ्याने भगवान् श्रीरामचंद्रांचे सख्य प्राप्त करून घेतले होते. या सर्वच भक्तिशास्त्राच्या आचार्यांनी लोकांच्या निंदा-स्तुतीची कोणतीही पर्वा न करता, भक्तीचा महिमा गाईला, आणि आपल्या जीवनाचे द्वारा भक्तीची सर्वश्रेष्ठता सिद्ध केली आहे. यांच्याच मतानुसार श्रीनारदजी सुद्धा निर्भय होऊन, भक्तीचा डंका गाजवत आहेत.

**य इदं नारदप्रोक्तं शिवानुशासनं विश्वसिति श्रद्धते स प्रेष्ठं लभते स प्रेष्ठं लभत इति ॥८४॥**

**८४- जे कुणी नारदाने सांगितलेल्या या शिवानुशासनावर विश्वास आणि श्रद्धा ठेवतात, ते प्रियतम अशा भगवंताला प्राप्त करून घेतात, ते प्रियतम अशा भगवंताला प्राप्त करून घेतात.**

आत्तापर्यंत भक्तिशास्त्राचे स्पष्टीकरण करून झाल्यावर, आता सूत्रकार नारदजी त्याच्या फळाचे वर्णन करीत आहेत. देवर्षी नारद सांगतात की जे कोणी या मी सांगितलेल्या, श्रेष्ठ, कल्याणमय, उपदेशावर, किंवा भक्तितत्त्वाचे प्रथम आचार्य साक्षात भगवान् शिवजींनी केलेल्या उपदेशावर विश्वास आणि श्रद्धा ठेवतात, ते भगवंताला " प्रियतम" या स्वरूपात प्राप्त करून घेतात विश्वास आणि श्रद्धा असल्याशिवाय तर काहीसुद्धा होत नाही. संशयात्म्याचे तर पतनच होते- '**संशयात्मा विनश्यति**।' तसेच विश्वास आणि श्रद्धा ठेवण्यामुळेच त्या भक्तीचे साधन प्राप्त होते; म्हणून विश्वास आणि श्रद्धा ठेवून भक्ती करावयास हवी. इतर अन्य साधनांच्या द्वारा भगवंत हा इतर अन्य रूपात प्राप्त होतो; परंतु भक्तीच्या द्वारा मात्र तो "प्रियतम"(= सर्वात जास्त प्रिय या स्वरूपात मिळतो. हे प्रेम हेच अंतिम अथवा पाचवा पुरुषार्थ होय त्याच्यामध्ये मोक्षाचा सुद्धा संन्यास होऊन जातो. हेच जीवनाचे श्रेष्ठ फळ आहे.

बोला भक्ती, भक्त आणि भगवंत यांचा विजय असो.

* * *

॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥